# शिल्पप्रकाश

अनुवादक :
डॉ. र. पु. कुलकर्णी

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# शिल्पप्रकाश

(टिपा, आकृत्या व विस्तृत प्रस्तावनेसह)


## डॉ. र. पु. कुलकर्णी

बी.ई. (स्थापत्य), एम. टेक् (मृदयांत्रिकी व आधारभूमी स्थापत्य)
पीएच.डी. (स्थापत्य)


महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

## निवेदन

*" शिल्पशास्त्र " या विषयासंबंधी प्राचीन काळात काही अभ्यासपूर्ण ग्रंथ संस्कृत भाषेत लिहिले गेले. " शिल्पप्रकाश " हा ग्रंथ यापैकीच एक अपूर्व ग्रंथ समजला जातो. या ग्रंथात ओरिसा शैलीची देवालये कशी बांधावीत यासंबंधी विस्तृत आणि तपशीलवार माहिती मिळते. या ग्रंथाच्या केवळ चारच प्रती आज उपलब्ध असून त्यापैकी एका प्रतीच्या आधारे त्याचे इंग्रजीत भाषांतर झाले आहे. त्याचेच हे मराठीत भाषांतर आज मराठीतील अभ्यासकांसाठी उपलब्ध करून दिले जात आहे.*

*या " शिल्पप्रकाश " ग्रंथाचा विशेष हा की, एकाच विषयावर संपूर्ण सांगोपांग माहिती देणारा दुसरा ग्रंथ उपलब्ध नाही. ओरिसा शैलीच्या खोल्यांच्या बांधकामाविषयी आणि काही विशिष्ट प्रकारच्या मंदिरांची माहिती इतक्या बारकाव्यासह ग्रंथकर्त्याने दिली आहे की, या प्रकारची मंदिरे ग्रंथकाराने स्वतः बांधली असावीत, असे विद्वानांचे मत आहे. आपल्या शिष्यांना ओरिसा शैलीच्या या शिल्पशास्त्राची माहिती व्हावी आणि त्यांनाही ती देवालये त्या पद्धतीने बांधता यावीत म्हणूनच हा ग्रंथ लिहिला आहे, असे ग्रंथकर्त्यानेही स्वतः म्हटले आहे.*

*अशा या महत्त्वपूर्ण ग्रंथाचे भाषांतर आज मराठीत प्रसिद्ध होत आहे ही आनंदाची गोष्ट म्हटली पाहिजे. भाषांतरकारांनी त्यासाठी जे परिश्रम घेतले त्याबद्दल साहित्य आणि संस्कृती मंडळ त्यांचे आभारी आहे. या पुस्तकाच्या छपाईच्या कामात मुंबई येथील शासकीय मध्यवर्ती मुद्रणालयाने घेतलेल्या परिश्रमाबद्दल मंडळ त्यांचेही आभारी आहे.*

**द. मा. मिरासदार,**
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ.

एन ४१३३–१अ

# प्रास्ताविक

शिल्पप्रकाश हा ग्रंथ ओरिसा शैलीची देवालये कशी बांधावीत याबाबत सांगोपांग माहिती देणारा असून ओरिसा शैलीसंबंधी शिल्पशास्त्रावरील एक अपूर्व ग्रंथ आहे. भूर्जपत्रावर लिहिलेल्या या हस्तलिखितांच्या चार प्रती उपलब्ध झाल्या आहेत. त्यातील एक सचित्र आहे. यांपैकी तीन प्रतींचा वापर करून श्रीमती एलिस बोनर व पंडित सदाशिव रथ शर्मा यांनी मूळ संस्कृत श्लोक व त्यांचे इंग्रजी भाषांतर अशा स्वरूपात हा ग्रंथ इ.स. १९६६ साली प्रसिद्ध केला. या ग्रंथाला श्रीमती एलिस बोनर यांची विस्तृत प्रस्तावना असून प्रसिद्ध विद्वान श्री. वासुदेव शरण अग्रवाल यांचा विद्वत्तापूर्ण उपोद्घात आहे. श्री. अग्रवाल सुरुवातीलाच लिहितात की या ग्रंथाच्या हस्तलिखितांच्या तीन प्रती दिल्ली येथे भरलेल्या सव्वीसाव्या आंतरराष्ट्रीय प्राच्यविद्या संमेलनातील प्रदर्शनात ठेवलेल्या होत्या. त्यावेळेला या प्रतींचे विद्वानांनी व त्या विषयातील मर्मज्ञांनी निरीक्षण करून ही हस्तलिखिते खरी आहेत असा निर्वाळा दिला आहे.

आतापर्यंत उपलब्ध असलेले वास्तुशास्त्रावरील ग्रंथ हे प्रायशः वास्तुशास्त्रावरील कोशांप्रमाणे आहेत. त्यात राहण्यासाठी घरे, राजवाडे, किल्ले व देवालये तसेच मूर्तीकला, चित्रकला वगैरे शिल्पशास्त्रात समावेश होणाऱ्या बहुतेक सर्व विषयांची माहिती दिलेली असते. मयमत या द्राविड शिल्पावरील प्राचीन ग्रंथात केवळ अनेक मजली देवप्रासादांची माहिती दिली नसून अनेक देवांच्या मूर्तींची वर्णने, त्यांच्या अवयवांची मापे वगैरे मूर्तीकलेसंबंधी माहिती असून पुन्हा रथ, शिबिका, पालखी इत्यादी वाहनांचीही माहिती दिली आहे. इतर ग्रंथांच्या मानाने काहीशा अर्वाचीन असलेल्या शिल्परत्न या वास्तुशास्त्राच्या ग्रंथात या सर्व विषयांची माहिती दिली असून चित्रकलेविषयीदेखील माहिती दिली आहे. असेच काश्यपशिल्प, मानसार, शिल्परत्नाकर, समरांगणसूत्रधार इत्यादी शिल्पशास्त्रविषयक मान्यता पावलेल्या ग्रंथांसंबंधी म्हणता येईल. राजस्थानातील कुंभकर्ण राजाच्या काळी होऊन गेलेल्या सूत्रधार मंडनाने मात्र प्रासादमंडन नावाचा केवळ देवप्रासादांवर वेगळा ग्रंथ लिहिला आहे.

राजवल्लभ व रूपावतार हे त्याचेच दोन ग्रंथ अनुक्रमे राजवाडे व मूर्तीकला या विषयांवरती आहेत. विष्णुधर्मोतर पुराणांत केवळ चित्रकलेविषयी सांगोपांग माहिती देणारे चित्रसूत्र नावाचे काही अध्याय आहेत. तेव्हा केवळ एकाच विषयास वाहून घेतलेले शिल्पशास्त्रविषयक ग्रंथ अगदी नाहीतच असे नाही, परंतु शिल्पप्रकाश या आता मराठीत भाषांतरीत केलेल्या ग्रंथाप्रमाणे एकाच विषयावर संपूर्ण, सांगोपांग माहिती देणारा दुसरा ग्रंथ उपलब्ध नाही हेही तितकेच खरे. प्रासाद मंडनात देवालयांविषयी माहिती दिली आहे, परंतु प्रासादाच्या कोणत्या अंगावर कशी नक्षी असावी तसेच निरनिराळ्या प्रकारच्या प्रासादांमध्ये त्यांचे वेगळेपण दाखविणारे बारकावेदेखील प्रासाद मंडनात दिलेले नाहीत जे ओरिसा शैलीच्या देवालयांविषयी माहिती देणाऱ्या या शिल्पप्रकाशात मिळतात. शिल्पप्रकाशात या देवालयांच्या बांधकामाविषयी व काही विशिष्ट प्रकारच्या मंदिरांची इतकी बारकाव्यांसहित माहिती दिली आहे की या प्रकारची मंदिरे ग्रंथकाराने स्वतः बांधली असावीत यात शंका वाटत नाही. एव्हढेच नव्हे तर या माहितीच्या आधारे दुसरा वास्तुशिल्पीदेखील तशी देवालये बांधू शकेल. हा ग्रंथ लिहावयाचा ग्रंथकाराचा हाच हेतू आहे. आपल्या आवडत्या शिष्यांना ओरिसा शैलीच्या शिल्पशास्त्राची माहिती व्हावी, तशा तऱ्हेची देवालये शिष्यांना बांधता यावीत म्हणूनच हा ग्रंथ लिहिला आहे असे लेखकाने दुसऱ्या प्रकाशाच्या सुरुवातीस (श्लोक २.१) व पुन्हा अखेरीस स्पष्ट म्हटले आहे (श्लोक २.७९३).

श्रीमती एलीस बोनर व पंडित सदाशिवरथ शर्मा यांना या ग्रंथाच्या चार प्रती उपलब्ध झाल्यात. यांपैकी तीन प्रतींचा उपयोग त्यांनी इंग्रजी भाषांतरासाठी केला आहे. या भूर्जपत्रावर लिहिलेल्या तीन हस्तलिखित प्रती संस्कृत भाषेत व उडिया लिपीत लिहिलेल्या आहेत. यांपैकी पहिली प्रत पुरी येथील अेमेर मठाच्या रघुनन्दन ग्रंथालयात उपलब्ध आहे. ही प्रत काकटपूर जवळ असलेल्या भिलदेवळी मठाच्या बाबाजी लक्खनदास यांनी या ग्रंथालयास १९४१ साली दिली. दुसरी प्रत आन्ध्र प्रदेशातील मञ्जुषा शहरात मिळाली. या प्रतीचे वैशिष्ट्य म्हणजे तीत श्लोक स्वरूपात दिलेल्या माहितीचे स्पष्टीकरण यथायोग्य आकृत्या देऊन केलेले आहे. तिसरी प्रत आन्ध्र प्रदेशातच चिककोले या गावी मिळाली. ह्या प्रतीतील शब्द पहिल्या दोन प्रतींपेक्षा अधिक शुद्ध लिहिलेले आढळले, त्यामुळे पहिल्या दोन प्रतींत जेथे जेथे एखादा शब्द काय असावा याबद्दल शंका निर्माण झाली तेथे तिचे निरसन या तिसऱ्या प्रतीच्या उपलब्धतेमुळे होऊ शकले. शिवाय या प्रतीमुळे अनेक परिच्छेदांतील माहितीवर अधिक प्रकाश पडू शकला. चौथी प्रत ओरिसा राज्यातील पुरी जिल्ह्यामधल्या निमपाडा या गावाच्या अरिसंध मठाचे श्री. गोस्वामी यांच्याकडे आहे. इंग्रजी भाषांतरासाठी या प्रतीचा उपयोग केलेला नाही.

इंग्रजी भाषांतर करताना काही ठिकाणी अव्याकरणीय संस्कृत भाषा, स्थानिक बोलीभाषेतील शब्द तसेच सध्या प्रचलित नसलेले वास्तुशास्त्रीय शब्द वगैरेंमुळे भाषांतर करणे बरेच अवघड झाले. परंतु हे भाषांतर करताना चैतनगोप येथील अर्त महारण तसेच पुरी येथील बाबाजी महारण व अपर्ति महापात्र या तिघांची बरीच मदत झाली. या तिघांनीही पुरी व पुरीच्या जवळील स्थळांवर अनेक मंदिरे बांधलेली असल्याने वास्तुशास्त्रीय शब्दांचा अचूक अर्थ त्यांच्याकडून समजून घेता आला. याशिवाय इंग्रजी भाषांतरकारांना ओरिसात दोन देवालये अशी सापडली की ती या ग्रंथात दिल्याप्रमाणे हुबेहूब बांधलेली होती. यामुळे देवालयांच्या निरनिराळ्या अवयवांविषयी जी माहिती ग्रंथात दिलेली आहे ती समजण्यास या दोन देवालयांमुळे बरीच मदत झाली. यातील भुवनेश्वर येथील जवळ जवळ मोडकळीस आलेले तीर्थेश्वराचे मंदिर हे पद्मगर्भ प्रकारचे असून चौरासी येथील वाराहीचे देवालय कामगर्भ प्रकारचे आहे. याशिवाय या लेखकद्वयांनी ओरिसातील इतर देवालये जी शिल्पप्रकाशात वर्णिलेल्या निरनिराळ्या देवालयांप्रमाणे आहेत ती ही शोधून काढलीत. या इंग्रजी भाषांतरीत पुस्तकाचे वैशिष्ट्य हे की याचे एक हस्तलिखित सचित्र असून त्या चित्रांत दिल्याप्रमाणे निरनिराळ्या प्रकारांची देवालये आजदेखील ओरिसात आहेत. त्यांच्याशी जे जे साधर्म्य दिसून आले ते दर्शविण्यासाठी त्यांची छायाचित्रे घेऊन ती भाषांतराच्या पुस्तकात घातली आहेत. अशा रीतीने हस्तलिखितात संस्कृत श्लोकरूपाने दिलेली माहिती, त्या माहितीचे स्पष्टीकरण करणाऱ्या आकृत्या व हे शास्त्र संपूर्णपणे जिवंत असून त्याप्रमाणे प्रत्यक्षतः बांधलेल्या निरनिराळ्या देवालयांच्या अंगोपांगांची, मूर्तींची, नक्षींची छायाचित्रे या इंग्रजी भाषांतराच्या पुस्तकात दिली आहेत. हा अवघड विषय समजून घेण्यास त्यांचा फार उपयोग झाला आहे. या ग्रंथाचे मराठीत भाषांतर करावयाचे हे एक प्रमुख कारण आहे. इतर भारतीय अथवा परकीय भाषांत या ग्रंथाचे भाषांतर झालेले पाहण्यात नाही.

ओरिसात नवव्या ते बाराव्या शतकांत तांत्रिक पूजा प्रचलित होती व हा ग्रंथ लिहिणारा लेखक हा तांत्रिक असून शक्तीचा भक्त असल्याने या ग्रंथाचा काळही श्रीमती एलिस बोनर यांच्या मताने नववे ते बारावे शतक, त्यातल्या त्यात बाराव्या शतकाच्या जवळ, असावा. मात्र यासाठी त्यांनी दिलेली इतरही कारणे फारशी सबळ नाहीत. याबाबत अधिक संशोधन होणे आवश्यक आहे. या ग्रंथाची भूर्जपत्रावरील पहिली हस्तलिखित प्रत इ.स. १७३१ साली, दुसरी प्रत १७९३ साली व तिसरी प्रत १७९१ साली लिहिली गेली असे ती ती प्रत ज्यांनी उतरवून घेतली त्यांनी लिहिले आहे. ज्याअर्थी अठराव्या शतकातही या ग्रंथाच्या हस्तलिखित प्रती तयार केल्या जात होत्या त्यावरून हे पुस्तक बरेच प्रसिद्ध व शिल्पीवर्गात त्याची बरीच चलती असली पाहिजे, असे म्हणता येते.

या ग्रंथाचा लेखक रामचंद्र भट्टारक हा ओरिसा शैलीच्या वास्तुशास्त्राचा जाणकार आहे. याच्या वडिलांचे नाव कुलेश्वर व आईचे संज्ञामयी आहे. धौमी मंडलातील उद्गाता कुलात व तांत्रिक समाजात त्याचा जन्म झाला. भार्गवी नदीची उपनदी मुशली हिच्या काठी असलेल्या तांत्रिकांच्या गावी तो राहत असे. त्याचे वाडवडील ओरिसाच्या राजांचे आश्रित होते व तो स्वतः ऐरावत मंडळाचा राजा वीरवर्मन् याच्या आश्रयाखाली होता. तो कौलाचार मताचा तांत्रिक असल्याने पुरी येथील जगन्नाथाची दक्षिण कालिका या स्वरूपात भक्ती करतो. ग्रंथकाराने वास्तुशास्त्रीय माहिती देताना सौधिकागम नावाच्या ग्रंथातील आधार दिले आहेत. सौधिकागम हा तांत्रिक वास्तुशास्त्रविषयक ग्रंथ असावा. आज हा ग्रंथ उपलब्ध नाही.

शिल्पप्रकाश ग्रंथाच्या कर्त्याविषयी असे म्हणता येईल की तो स्थपति (engineer) नसून शिल्पशास्त्री (architect) असावा. संपूर्ण ग्रंथ वाचल्यानंतर लक्षात येते की प्रासादाचे निरनिराळे प्रकार, त्यांचे निरनिराळे अवयव, त्यांच्यावर खोदावयाच्या निरनिराळ्या तऱ्हेच्या नक्षी तसेच अनेक प्रकारच्या मूर्ती कोठे असाव्यात याची माहिती, एवढेच नव्हे तर मूर्तीबाबत अलसा कन्यांपासून भैरव, विराल यांच्या मूर्ती तयार करताना लागणारी निरनिराळी मूर्तीयंत्रे यांचीही माहिती ग्रंथकार खुलासेवार देतो; मात्र प्रासादांच्या प्रकारानुसार त्यांच्या रुंदी व उंची यांचे प्रमाण काय असावे, निरनिराळ्या अंगोपांगांची मापे काय असावीत यांची फारशी माहिती दिलेली नाही. प्रासादाचे शिखर, त्याची उंची जशी वाढत जाते त्याप्रमाणे त्याची रुंदी कशी कमी होत जाते; किंवा मस्तकाच्या निरनिराळ्या अवयवांची मापे वगैरे स्थापत्यशास्त्रीय माहिती ग्रंथकर्त्याने दिलेली नाही. ही माहिती मिळविण्यासाठी ओरिसा शैलीतील प्रासादांवर लिहिलेल्या दुसऱ्या प्रसिद्ध ग्रंथाची, ' भुवन प्रदीप ', याची मदत घ्यावी लागते.

प्रस्तुत शिल्पप्रकाश या ग्रंथातील मूळ संस्कृत श्लोकांचे मराठीत भाषांतर केले आहे. त्यासाठी अर्थातच इंग्रजी भाषांतराचे खूपच सहाय्य झाले आहे. इंग्रजी भाषांतरात दिलेल्या आकृत्या तसेच छायाचित्रे ही जशीच्या तशी या मराठी भाषांतराच्या पुस्तकात घेतलेली आहेत. इंग्रजी भाषांतरात वास्तुशास्त्रीय शब्दांचा अर्थ देणारा सचित्र कोश आहे तसेच तेथे टिप्पणीही दिल्या आहेत. त्याचेही मराठी (स्वैर) भाषांतर येथे दिले आहे. इंग्रजी भाषांतराच्या ग्रंथाप्रमाणे मराठी भाषांतराचे हे पुस्तक शक्यतो परिपूर्ण असावे अशी काळजी घेतली आहे.

'' शिल्पप्रकाशा ''चे मराठी भाषांतर करावयाची तसेच इंग्रजी भाषांतराच्या आकृती व छायाचित्रे या पुस्तकात वापरावयाची अनुमती इंग्रजी पुस्तकाचे प्रकाशक इ. जे. ब्रिल, लायडन, नेदर्लेंड्स यांनी दिली याबद्दल लेखक त्यांचा आभारी आहे.

भाषांतर करताना मुख्यतः दुसऱ्या हस्तलिखिताचा वापर केला आहे. महिरपी कंसात जेथे अर्थ दिला आहे तेथे तिसऱ्या हस्तलिखितावरून भाषांतर केले आहे. जेथे पहिल्या हस्तलिखितावरून भाषांतर केले आहे तेथे तसा स्पष्ट उल्लेख केला आहे.

शिल्पप्रकाश हा ओरिसा शैलीच्या वास्तुशिल्पाविषयीचा ग्रंथ असल्याने या शैलीतील प्रासादांविषयी प्राथमिक माहिती येथे देणे अप्रस्तुत होणार नाही.

ओरिसा शैलीतील देवालयांचे चार प्रमुख प्रकार आहेत : रेखा, भद्र, खाकरा व गौरीय. या सर्व प्रकारच्या देवालयांचे अधोच्छंद चौरस असतात. याहून वेगळा प्रकार म्हणजे आयताकार देवालयांचा. हा वैताल प्रकारचा प्रासाद असून याचे शिखर लंबगोलाकृती व काहीवेळा मागच्या बाजूला हस्तिपृष्ठाकार असते.

**आकृती अ–पंचांग रेखा प्रासाद**

रेखा प्रकारच्या देवालयाचे सहा प्रमुख भाग असतात (आकृती अ). सगळ्यात खाली पीठ (पिष्ट) असते. त्यावर भिंत असते, तीस उडिया भाषेत बाड म्हणतात. त्यावर

शिखराचा भाग येतो. भिंतीच्या वरपासून वेदि (बेकि) पर्यंतच्या भागाला शिखर किंवा गंडि म्हणतात. त्याच्यावर वेदि व वेदिवर मस्तक असते. मस्तकाचे आमला व खपुरि हे प्रमुख भाग असतात. त्यांच्यावर सहावा भाग म्हणजे कळस असतो. या कळसावर, गर्भगृहांत ज्या देवतेची स्थापना केलेली असते तिचे आयुध असते. विष्णु मंदिरावर चक्र, शंकराच्या मंदिरावर त्रिशूळ असे आयुध असते. त्या आयुधावरून देवालयांत कोणत्या देवमूर्तीची आराधना केली जाते ते चटकन समजते. रेखा प्रासादाचे त्र्यंग, पंचांग, सप्तांग व नवांग किंवा त्रिरथ, पंचरथ, सप्तरथ व नवरथ असे पुन्हा उप प्रकार आहेत. देवालय चौरस असते म्हणजे त्यास फक्त कोपरे (कर्ण) असतात. त्यास चारी बाजूंना चार भद्र ठेवलेत, म्हणजे दोन भद्र व एक कर्ण असे तीन प्रमुख अंग (रथ) असल्याने त्या प्रासादास त्र्यंग प्रासाद म्हणतात. कर्णाच्या दोन्ही बाजूंना दोन उपरथ असले म्हणजे प्रासाद पाच अंगांचा बनतो व म्हणून त्यास पंचांग (पंचरथ) प्रासाद म्हणतात. याप्रमाणे सप्तांग व नवांग प्रासाददेखील कर्णाच्या दोन्ही बाजूंना उपरथांची संख्या वाढवून मिळतात. नागर, द्राविड इत्यादी शैलींच्या प्रासादांचेही त्र्यंग, पंचांग इत्यादी प्रकार होतात. मात्र उडिया शैलीतील रेखा प्रकारच्या प्रासादाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे प्रासादाच्या अंगाच्या संख्येप्रमाणे बाड म्हणजे भिंतीचेही उंचीने तितकेच विभाग पडतात. त्र्यंग प्रासादात अधोच्छंदांत जसे तीन अवयव असतात तसेच ऊर्ध्वच्छंदांत भिंतीचे पाभाग, जांघ व वरण्ड असे तीन भाग होतात. पंचांग प्रासादाच्या भिंतीचे पाच भाग असतात, ते म्हणजे पाभाग, तलजांघ, बंधना, उपरजांघ व वरण्ड (आकृती अ).

**आकृती आ–भद्र प्रासाद**

भद्र प्रकारच्या देवालयाचे शिखर जणू काही अनेक पायऱ्यांनी बनविलेले असते (आकृती आ). कोणार्क येथील सूर्य मंदिराच्या मुखशालेचे शिखर या प्रकाराचे आहे. याच्या प्रत्येक पायरीला पिढा म्हणतात व मस्तकाला मुण्डि म्हणतात, म्हणून या प्रकारच्या देवालयाला पिढामुण्डि असेही म्हणतात. भद्र प्रासादाचे

आठ प्रमुख प्रकार आहेत : भद्र, महाभद्र, विजयभद्र, नलिनीभद्र, मेदिनी, विजय, महाद्रविड, केसरी व केसर. पिढांच्या निरनिराळ्या संख्यांवरून हे प्रकार होतात.

आकृती इ–खाकरा प्रासाद

खाकरा प्रकारच्या प्रासादाची कल्पना आकृती इ वरून येईल. याचेदेखील उंचीमध्ये सहा विभाग होतात. सगळ्यात खाली पिष्ट असते, त्यावर भिंत (बाड) असून नंतर शिखर (गंडि) असते. नंतर वेदि (बेकि) असून तिचे कान्धमुचुलि, कांटि व स्त्राहि हे उपविभाग आहेत. त्यावर मस्तक म्हणजे खाकरा व त्यावर कळसाची स्थापना केलेली असते. याचे द्राविड, वडभी व कोसली असे तीन प्रकार आहेत.

ओरिसा शैलीच्या प्रासादाचा चौथा प्रकार गौरीय, याची फारशी माहिती उपलब्ध नाही. हा प्रासाद कसा असतो त्याची कल्पना आकृती ई वरून येऊ शकेल.

आकृती ई–गौरीय प्रासाद

प्रस्तुतच्या ग्रंथातील छायाचित्र २-आ मध्ये गर्भगृह व मुखशाला यांचा अधोच्छंद दिला आहे. त्यात गर्भगृहाच्या आतला भाग चौरस न दाखविता आयताकृती दाखविला आहे. या आयताच्या पूर्व व पश्चिम बाजू उत्तर व दक्षिण बाजूंपेक्षा लहान लांबीच्या आहेत म्हणजे गर्भगृहाची आतली रुंदी ही लांबीपेक्षा जास्त असून त्यांचे प्रमाण २ : १ आहे. ही आकृती श्लोक १.६४ ते ७० वरून तयार केलेली आहे. भारतीय शिल्पशास्त्राप्रमाणे गर्भगृह चौरसाकृती असणे उत्तम. ते आयताकार असल्यास त्याची रुंदी लांबीच्या दीड पटीहून जास्त असू नये. दुसऱ्या प्रकाशात गर्भगृहाचे जे निरनिराळे पद्मपीठ, भद्रपीठ वगैरे अधोच्छंद दिले आहेत ते सर्व चौरसाकृती आहेत. वैताल प्रकारच्या देवालयाचा अधोच्छंद मात्र आयताकार असतो. मात्र तेथे (छायाचित्र ३६ आ व इ) गर्भगृहाची पूर्व-पश्चिम लांबी ही उत्तर-दक्षिण रुंदीपेक्षा जास्त आहे. तेव्हा या बाबतीत ग्रंथकाराने दिलेला गर्भगृहाचा अधोच्छंद व वैताल प्रकारच्या देवळाचा अधोच्छंद हे एकमेकासदृश नाहीत.

प्रस्तुतच्या मराठी भाषांतरकाराने 'काश्यपशिल्पम्' या संस्कृत भाषेतील वास्तुशास्त्रीय ग्रंथाचे मराठीत 'काश्यपशिल्प' हे भाषांतर लिहिले असून ते पुस्तक महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने मार्च १९८७ साली प्रकाशित केले आहे. संस्कृत भाषेतील मूळ ग्रंथ श्री. कृष्णराय वझे यांनी संपादित केला असून तो आनंदाश्रम संस्कृत ग्रंथावलि क्र. ९५, १९२६ प्रकाशित झालेला आहे. मराठी भाषांतरात हा संस्कृत ग्रंथ अंतर्भूत केलेला नाही. या शिल्पप्रकाशात मात्र मूळ संस्कृत श्लोकदेखील दिले आहेत. हे पुस्तकदेखील महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाच्या वतीनेच प्रसिद्ध होत आहे.

काश्यपशिल्प हा द्राविड शैलीच्या वास्तुशास्त्रावरील ग्रंथ आहे. शिल्पप्रकाश हा ग्रंथ ओरिसा शैलीच्या वास्तुशास्त्रावर आहे. प्रासादमंडन हा नागर शैलीच्या वास्तुशास्त्रावरील ग्रंथ आहे. त्याचे मराठी भाषांतर महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाला प्रकाशनार्थ सादर केले आहे. ते भाषांतर जर प्रसिद्ध झाले तर भारतातल्या तीनही प्रमुख वास्तुशैलींच्या ग्रंथांचा परिचय मराठी वाचकांस होऊ शकेल.

२६-१०-९१

**र. पु. कुलकर्णी**

# अनुक्रमणिका


| | पृष्ठे |
|---|---|
| प्रास्ताविक . . . . . . | पाच ते बारा |
| भाषांतराची अनुक्रमणिका . . . . . . | पंधरा ते एकवीस |
| मराठी भाषांतर . . . . . . | १ ते १३७ |
| टिप्पणी . . . . . . | १३९ ते १४२ |
| शब्दकोश . . . . . . | १४३ ते १६१ |
| मूळ संस्कृत ग्रंथ . . . . . . | १६३ ते २८३ |
| छायाचित्रे . . . . . . | क्र. १ ते ७२ |

# अनुक्रमणिका

## पहिला प्रकाश


| | श्लोक |
|---|---|
| विश्वकर्म्याच्या मूर्तीचे ध्यान . . | १ |
| यंत्रकालिकेचे स्वरूप . . | ४ |
| शिल्प (विद्येचे) प्रकार . . | ६ |
| जमिनीची निवड . . | ११ |
| जमिनीचे गुणधर्म . . | १३ |
| दिशा निश्चित करणे . . | १९ |
| वास्तूच्या जमिनीची परीक्षा . . | २४ |
| वास्तूच्या जागेचे (आकारानुसार) प्रकार . . | ३९ |
| जमिनीच्या शुद्धीकरणाची रीत . . | ४७ |
| नागबन्ध . . | ५५ |
| पायाच्या अधोच्छंदाच्या (गर्भयंत्राच्या) आखणीची माहिती . . | ६१ |
| मुखशालेच्या तलच्छंदाची माहिती . . | ८१ |
| योगिनी यंत्र . . | ९१ |
| (मुख–) शालेची माहिती (तोरणाची निर्मिती) . . | १०७ |
| वज्रमस्तकांचे प्रकार . . | १२० |
| (अ) किरीट . . | १२१ |
| (आ) वृत्त . . | १३३ |
| (इ) लतावज्र . . | १४७ |
| (मुखशालेच्या) भिंतीच्या भागाची (निर्मिती) . . | १५३ |
| भैरवयंत्र . . | १५८ |
| तोरण लक्ष्मी यंत्र . . | १७२ |
| तोरण बन्ध . . | १९५ |
| मुखशालेची समोरची भिंत . . | २०३ |
| पीठाची माहिती . . | २०९ |
| खांबांची माहिती . . | २२२ |
| नागस्तंभ . . | २३० |

## अनुक्रमणिका---पुढे चालू


| | | श्लोक |
|---|---|---|
| कोणकाची माहिती | . . | २३४ |
| अनर्थ खांबाची माहिती | . . | २४८ |
| आवरण देवता | . . | २५७ |
| शक्तियंत्र | . . | २६१ |
| उभ्या मूर्ती | . . | २७८ |
| वेलबुट्टींच्या नक्षींचे (वल्लभींचे) निरनिराळे प्रकार | . . | २८४ |
| कुञ्चिता | . . | २८८ |
| हंसा | . . | २९३ |
| वर्तुला | . . | २९६ |
| आगमा | . . | २९९ |
| रतिकेरा | . . | ३०१ |
| गुम्फना (किंवा सगुंफा) | . . | ३०५ |
| कुटिला | . . | ३०७ |
| समभागिका | . . | ३०९ |
| पल्लवा | . . | ३१० |
| कलिकायुक्ता | . . | ३१२ |
| मेघा | . . | ३१४ |
| फुलांची नक्षी | . . | ३१७ |
| रंगणी | . . | ३२० |
| चातुकी | . . | ३२१ |
| पंकजा | . . | ३२५ |
| उत्पला | . . | ३२८ |
| मुखशालेचा अनुराह | . . | ३३४ |
| भारकेन्द्राधिपांची माहिती | . . | ३४३ |
| युगला | . . | ३४७ |
| एक | . . | ३५० |
| सिंह | . . | ३५५ |
| विराला | . . | ३५९ |
| कौतूहल | . . | ३६१ |
| गवाक्ष (खिडकी) बांधावयाची पद्धत | . . | ३६५ |

## अनुक्रमणिका—पुढे चालू


| | | श्लोक |
|---|---|---|
| शिक्षादानमूर्ती यंत्र | . . | ३७६ |
| अलसांची माहिती | . . | ३९१ |
| अलसा यंत्र | . . | ४०२ |
| अलसा | . . | ४०७ |
| तोरणा | . . | ४१० |
| मुग्धा | . . | ४१२ |
| मानिनी | . . | ४१४ |
| डालमालिका | . . | ४१८ |
| पद्मगंधा | . . | ४२३ |
| दर्पणा | . . | ४२८ |
| विन्यासा | . . | ४३४ |
| केतकीभरणा | . . | ४३९ |
| मातृमूर्ती | . . | ४४६ |
| चामरा | . . | ४५० |
| गुंठना | . . | ४५५ |
| नर्तकी | . . | ४६१ |
| शुकसारिका | . . | ४६५ |
| नूपुरपादिका | . . | ४६९ |
| मर्दला | . . | ४७३ |
| लहराभाग | . . | ४८२ |
| छप्पराचे बांधकाम | . . | ४९९ |
| राजबन्ध | . . | ५०७ |
| पाटशिला | . . | ५२१ |
| कुंभांचे प्रकार | . . | ५३९ |
| पूर्णकुम्भ | . . | ५४१ |
| पर्णकुम्भ | . . | ५४२ |
| मकरमालिनी | . . | ५४६ |
| मिथुनबन्ध | . . | ५४८ |
| पाटशिला ठेवण्याची पद्धत | . . | ५५४ |
| ग्रंथकर्त्याचा परिचय | . . | ५६५ |





एन ४१३३–२

## अनुक्रमणिका--पुढे चालू

### दुसरा प्रकाश


| | | श्लोक |
|---|---|---|
| (देवालयाच्या) विमान भागाची माहिती | . . | १ |
| प्रासादांचे प्रकार | . . | ३ |
| मञ्जुश्री | . . | ९ |
| रत्नसार | . . | १३ |
| मृदंगा | . . | १७ |
| वसुश्री | . . | २१ |
| महामेरू | . . | २३ |
| कैलाश | . . | ३० |
| वैताल | . . | ४५ |
| रथयुक्त | . . | ६८ |
| भैरवयंत्र | . . | ६९ |
| भैरवांचे प्रकार | . . | ९० |
| हेमकूट प्रासाद | . . | १०० |
| शिखराच्या निरनिराळ्या अवयवांची सामान्य माहिती | . . | १०६ |
| कोणक भाग | . . | १०६ |
| अनुराह भाग | . . | ११६ |
| अनर्थबन्ध | . . | १२५ |
| राहपाग | . . | १३६ |
| राहावरील मूर्ती | . . | १५२ |
| विमानमालिनी | . . | १६३ |
| गर्भशंकराची पूजा | . . | १८० |
| वामदेवाचे ध्यान (नाटाम्बर १) | . . | १८७ |
| नाटाम्बराचे ध्यान २ | . . | १९२ |
| नाटाम्बर ध्यान ३ | . . | १९९ |
| नाटाम्बर यंत्र | . . | २०३ |

## अनुक्रमणिका—पुढे चालू


| | श्लोक |
|---|---|
| नाटाम्बर – १ . . | २०९ |
| नाटाम्बर – २ . . | २१९ |
| नाटाम्बर – ३ . . | २२९ |
| मार्जन (शुद्धीकरण) विधी . . | २३९ |
| प्रासाद बांधावयाची पद्धत . . | २४३ |
| पद्मगर्भ (शंकराचे देवालय) व कामगर्भ (देवीचे देवालय) यातील फरक. . | २५५ |
| पद्मगर्भाच्या पंचकर्माची वेगळी पद्धत . . | २६२ |
| कामगर्भासाठी पंचकर्म . . | २६६ |
| पद्मगर्भ कोणक . . | २७० |
| अनुराह (पद्मगर्भाचा) . . | २८१ |
| नागमातांचे प्रकार . . | २९३ |
| अनुरथ (पद्मगर्भाचा) . . | २९७ |
| शंकराच्या आवरण देवता— | |
| सद्योजात . . | ३०४ |
| तत्पुरुष . . | ३०६ |
| श्रीकण्ठरूद्र . . | ३०७ |
| घोर . . | ३११ |
| मृत्युंजय . . | ३१२ |
| विरूपाक्ष . . | ३१४ |
| राहा . . | ३३० |
| तालगर्भिका . . | ३३७ |
| निशाभाग . . | ३४५ |
| पार्श्वदेवतांचे ध्यान— | |
| हेरम्ब . . | ३५६ |
| अम्बिका . . | ३६० |
| कार्तिकेय . . | ३६४ |
| ऊर्ध्वगर्भिका . . | ३७० |
| भित्तिबन्धना (पद्मगर्भाच्या भिंतीवरील वेलबुट्टी) . . | ३७९ |
| हत्ती, घोडे तसेच राजबन्धाची माहिती . . | ३८८ |




एन ४१३३–२अ

## अनुक्रमणिका---पुढे चालू


| | | श्लोक |
|---|---|---|
| राहाचा वरचा भाग | . . | ३९२ |
| विमानमालिनी | . . | ४०९ |
| पंचकर्म | . . | ४१८ |
| कोणक | . . | ४२५ |
| खालची बन्धना | . . | ४३७ |
| वरची बन्धना | . . | ४४२ |
| शिखर (विमान) भागांतील कोणक | . . | ४४९ |
| अनुराह | . . | ४६६ |
| भुजंगबन्ध | . . | ४७७ |
| अनर्थ | . . | ४९४ |
| कामकलातत्त्व | . . | ४९८ |
| कामकलायंत्र | . . | ५०८ |
| महाकामकलेश्वरीचे ध्यान | . . | ५३० |
| कामकलेश्वर शिव | . . | ५३३ |
| राहा | . . | ५४२ |
| राहाचे शिखर | . . | ५४७ |
| पार्श्वदेवता | . . | ५४९ |
| राहभाग | . . | ५८५ |
| गर्भगृह व मुखशाला यांच्या संधीचा भाग (मिलन स्थल) | . . | ५९५ |
| दुसरा थर | . . | ६०० |
| गर्भक देश | . . | ६११ |
| खर्परभेद | . . | ६२३ |
| केरकर्म | . . | ६३९ |
| मुद्रकभाग | . . | ६४६ |
| निराळ्या प्रकारचे छप्पर | . . | ६४९ |
| सिंहांचे प्रकार | . . | ६६३ |
| सिंहयंत्र | . . | ६७५ |
| कळसांचे प्रकार | . . | ६८४ |
| यूप | . . | ६८७ |

## **अनुक्रमणिका**––पुढे चालू


| | श्लोक |
|---|---|
| कुंभ . . | ६९३ |
| शिखराचा अन्य प्रकार . . | ६९७ |
| प्रासादाची स्तुती . . | ७०६ |
| तोरणाची कामे . . | ७१३ |
| प्रतिमेचे माप . . | ७१८ |
| नक्षीचे खोदकाम . . | ७२२ |
| देवालय बांधल्याने मिळणारे पुण्य . . | ७२८ |
| पीठाची लक्षणे . . | ७३९ |
| रत्नगर्भ . . | ७४५ |
| आसनांचे प्रकार . . | ७५० |
| कणिपीठ . . | ७५२ |
| पद्मपीठ . . | ७५६ |
| मूर्तींचे प्रकार . . | ७६३ |
| शक्तीच्या मूर्ती . . | ७७६ |
| मूर्तीच्या स्थापनेनंतरची कामे . . | ७८४ |
| शिल्पशास्त्राची स्तुती . . | ७८८ |
| ग्रंथकाराचा परिचय . . | ७९८ |
| लेखनिकाची ओळख . . | ८०७ |

**श्री गणेशाला नमस्कार असो**

**ॐ विश्वकर्मा याला नमस्कार** **श्री नीलाद्रिनाथाला नमस्कार**

## शिल्पप्रकाशांतील प्रकाश पहिला

### विश्वकर्म्याच्या मूर्तीचे ध्यान

ऐरावतावर आरूढ झालेला, निरनिराळ्या रत्नांनी भूषविलेला, चौसष्ट कला व विद्या यात प्रवीण असलेला, कांतीमान चेहऱ्याचा, (१)

पीतांबर नेसलेला, केयूर व हार यांनी भूषविलेला, चार हातांचा व अत्यंत शांतीपूर्ण चेहरा असलेला, असा महान् देव, (२)

दोन्ही हातांत छिन्नी (व हातोडा)[1] व इतर (दोन) हातांत मापाचा गज (व मोजणी करण्यासाठीची दोरी)[1] धारण केलेला अशा त्या महान तेजस्वी विष्णूला मी नमन करतो व हे विश्वकर्म्या तुलाही नमस्कार असो. (३)

### यंत्रकालिकेचे स्वरूप

महाकाली ही मूर्तीच्या यंत्राच्या स्वरूपात असून तिच्यामध्ये सर्व विद्यांचा अंतर्भाव झालेला आहे; ती मूर्तीमंत शिल्प (शास्त्र) असून सर्व प्रकारचा आनंद देणारी आहे. (४)

सर्व विघ्नांचा नाश करणाऱ्या यंत्रकालिका देवीला मी नमस्कार करतो. (४ $^1/_2$)

### शिल्प (विद्येचे) प्रकार

शिल्प ही महत्त्वाची विद्या असून तिच्या अंतर्गत पाच (उप) विद्या सर्वांत उत्तम आहेत. (५)

(त्या म्हणजे) लाकूड काम, दगड काम, लोहार काम, सोन्यासंबंधीची कामे त्याचप्रमाणे चित्रकारी. जहाजे बांधणे, घराच्या आधारासाठीचा लाकडी सांगाडा उभारणे हे लाकूड कामासंबंधीचे व्यवहार आहेत. (६)

प्रासाद, मण्डप, किल्ले, तटबंदीची शहरे बांधणे यासाठी दगडाशी संबंधित (विद्येचा उपयोग होतो.) प्रासादाच्या रक्षणासाठी, युद्धासाठी व नांगर तयार करण्यासाठी लोहार कामाची (गरज असते.) (७)

शुद्ध सोने, सुखवस्तू तयार करण्यासाठी, दागिन्यांसाठी, नाणी पाडण्यासाठी, मूर्ती तयार करण्यासाठी, तसेच पत्र्यावर सोनेरी अक्षरे रेखण्यासाठी, लागते. (८)

---

[1] सौधिकागमात दिलेल्या विश्वकर्म्याच्या ध्यान स्वरूपावरून.

चित्रकारी ही लाकडावर, पाषाणांवर, भांड्यांवर किंवा तोरणांमधील (दारांमधील) अंतरात असलेल्या भिंतीवर करतात. अनेक भाव, भावना दर्शविणारी चित्रकारी ही त्या विद्येत सुंदर समजतात. (९)

येथे, मी उत्तम अशा प्रासाद - शिल्पाची माहिती सांगतो, ती ऐक. प्रासाद बांधावयाची सर्व माहिती देणारा असा हा ' शिल्प-प्रकाश ' नावाचा ग्रंथ आहे. (१०)

**जमिनीची निवड**

प्रासाद बांधताना (बांधण्यापूर्वी) प्रमुख चौकशी त्याच्यासाठी लागणाऱ्या जमिनीची व प्रदेशाची करावयास हवी. ज्या प्रदेशात नदी नसेल ती जागा वर्ज्य समजावी; तसेच जेथे मातीत दगड (-गोटे) जास्त आहेत (अशीही जागा वर्ज्य असते.) (११)

प्रासादाच्या पायासाठी वाळूचे प्रमाण जास्त असलेली जमीन श्रेष्ठ समजतात. दलदलीची जागा त्याज्य असून प्रेते जाळतात ती (स्मशानाची) जागा टाळावी. (१२)

**जमिनीचे गुणधर्म**

हे (वर सांगितलेले) निरनिराळ्या प्रदेशांचे प्रकार असून त्यांची ग्राह्याग्राह्यता विचार करून ठरवावयास हवी. मातीच्या धुलीकणांनी बनलेली, जिचा रंग मोत्यांच्या चूर्णाप्रमाणे चमकदार आहे, (१३)

(व) जिचा गंध मधुर आहे अशी ही जमीन ' ब्राह्मण ' (पृथ्वीवरील देव) प्रकारची असते. ज्या जमिनीचा रंग तांबडा आहे किंवा शुद्ध रक्ताप्रमाणे लाल आहे, (१४)

जिला आंबट वास येतो, अशा जमिनीस ' क्षत्रीय ' म्हणतात. वाळूचे प्रमाण जास्त असलेली, पिवळ्या रंगाची, चिखलाप्रमाणे ओली (दलदलीची) असलेली, (१५)

काहीशी मंद (अळणी) किंवा काहीशी तिखट (अशा चवीची) व मिठाप्रमाणे वास असलेली अशी जमीन शिल्पशास्त्रानुसार ' वैश्य ' म्हणून सांगतात. (१६)

जी जमीन दलदलीची आहे, ज्या मातीचा रंग काळा आहे व जेथील जागेचा सडल्याप्रमाणे गंध येतो तीस ' शूद्र ' असे संबोधतात. (१७)

ब्राह्मण व क्षत्रिय प्रकारची व सौम्य (चवीची) जमीन प्रासादासाठी शुभदायक असते. इतर (प्रकारच्या जमिनी) नेहमीच वर्जनीय असतात. आता (जमिनीच्या) परीक्षांवरून (तिच्या ग्राह्याग्राह्यतेचा) निर्णय कसा घेतात ते ऐक. (१८)

आकृती १–दिशा निश्चिती

**दिशा निश्चित करणे** (आकृती १)

प्रथम (प्रासादाचा) मध्यभाग जेथे येतो ती जागा निश्चित करून तेथे गर्भाच्या यंत्राची आखणी करावी. (त्या जागेच्या) मध्यबिंदूपासून तिची सोळा भागांत विभागणी करावी. (१९)

पूर्व (दिशेस) इन्द्राची स्थापना करावी, तसेच आग्नेय्येकडे अग्नी देवाची. दक्षिणेकडे दंडधारीची (यमाची) व नैर्ऋत्येकडे मनुष्य ज्याचे वाहन आहे त्याची (निर्ऋतीची स्थापना) करावी. (२०)

पश्चिमेकडे वरूणाची व वायव्येकडे वायूची नेहमी कल्पना करावी. उत्तर दिशेला कुबेराची व ईशान्येला ईशाची (शंकराची) (स्थापना करावी.) (२१)

केन्द्रस्थानाच्या खाली अनन्त व वरच्या (दिशेला) ब्रह्मदेव असतो. यमाच्या बाजूला पिशाच व वायुदेवतेच्या बाजूला गुह्यक असावा. (२२)

किन्नर नैऋत्य दिशापालाच्या व गंधर्व शंकराच्या (बाजूला); यक्ष व सिद्ध हे दोघे वायुदेवाच्या (बाजूला) व समोरच्या (बाजूला असतात.)[१] (२३)

**वास्तूच्या जमिनीची परीक्षा**

(जमिनीच्या) मध्यभागाच्या केन्द्रस्थानी करंज तेलाने भरलेला तांब्याचा दिवा ठेवावा व ज्योत पाजळून ज्योतीस्वरूप देवीची पूजा करावी. (२४)

(या दिव्यासाठी लागणारी) वात तरूण व कुमारी मुलीने डाव्या हाताने तयार करावी, व अशा प्रकारच्या पेटविलेल्या दिव्याच्या ठायी ज्वलनाम्बर (देवीची) पूजा करावी. (२५)

[अग्निज्वालांप्रमाणे लखलखते कपडे घातलेल्या व भयंकर दिसणारे वस्त्र नेसलेली देवी. ही त्रिपुरसुंदरीची १४ वी शक्ति समजतात.]

हाडांची माळ धारण करणाऱ्या, तलवार व कवटी हातात धारण करणाऱ्या देवीची ॐ ऱ्हां ऱ्हीं ऱ्हूं ऱ्हैं ऱ्हः या मन्त्राने पूजा करावी. (२६)

पूजा झाल्यानंतर उडीद, तीळ, साखर व दर्भाच्या मुळांजवळील माती यांना तूप चोपडून त्यानंतर त्यांचा बली सर्व दिशांना द्यावा. (२७)

यानंतर दिव्याच्या सुंदर ज्योतीचे निरीक्षण करावे. जर ज्योत ऊर्ध्वाभिमुख असेल तर (ती जागा) नेहमीच आनंद देणारी असते. (२८)

ज्योत जर कुबेराच्या (उत्तर) दिशेला झुकलेली असेल तर (ती जमीन) कीर्ती व वैभव यांची भरभराट करणारी असते. जेथे ज्योत अस्थिर (कोणत्याही एका दिशेकडे न झुकता भिरभिरणारी) असेल तेथे प्रासाद बांधू नये. (२९)

ज्योत जर यक्ष (व/किंवा) सिद्ध (यांच्या दिशेकडे झुकलेली असेल) तर हानी पोचते म्हणून ती जमीन नेहमीच त्यागावी. ज्योत जर आखूड झाली व तिचा रंग पांढरट (पांडुर) असेल– (३०)

तर त्या जागी नक्कीच हाडे (पुरलेली) असतात यात काहीच संशय नाही. (ती जागा वर्ज्य समजावी). जेथील ज्योत सोनेरी रंगाची असेल व तिचे अग्र क्षणोक्षणी दक्षिणेकडे झुकत असेल – (३१)

तर त्या भूमीच्या गर्भात धन असून ती यश व किर्ती यांची वृद्धी करणारी असते. ज्या जमिनीवर वाईट कामे केली गेली आहेत अशी अशुभ जागा (कृच्छ्रभूमी) नेहमीच

---

[१] टिप्पणी पहा.

अधम असते व तिच्यामुळे (धन्यास) दारिद्र्य येते. जेथे ज्योतीचा रंग धुरासारखा असतो व ज्योतीच्या वरच्या टोकापाशी धुराचे वलय असते तेथील जमीनीच्या गर्भात मेलेल्यांना आधार दिलेला असतो; अशी जागा नेहमीच त्याज्य असते. अशी जमीन प्रेतासह असते असे सांगोपांग माहिती दिलेल्या शास्त्रात सांगितले आहे. (३२, ३३)

दिव्याच्या ज्योतीने अचानक जमिनीकडे झेप घेऊन तिचे चुम्बन घेतले तर त्या जमिनीस 'निष्फला' म्हणतात व ती मंदिर इत्यादींसाठी वापरू नये. (३४)

ज्योतिषशास्त्रानुसार (प्रासाद) बांधण्यासाठी जे निरनिराळे मुहूर्त व त्यांची निरनिराळी फले ही ऐक. रिक्त व वर्ज्य तिथी तसेच अशुभ करण इत्यादी नेहमीच वगळावेत. (३५)

[रिक्त तिथी – चतुर्थी, नवमी व चतुर्दशी या तिथी. करण – चांद्रमास ११ करणांमध्ये विभागतात प्रत्येक करण २-३ दिवसांचा असतो.]

राजा, सचिव, शिल्पी, लोहार व पुरोहित हे सर्व जेथे उपलब्ध असतील तेथे प्रासादाची निर्मिती शक्य असते. (३६)

शिल्पी व पुरोहित हे वास्तू बांधावयाच्या कामात प्रमुख असतात. प्रथम (योग्य) जागेची निवड करावी व तीस (अनुरूप) अशा वास्तूच्या प्रकाराची (नंतर) निवड करावी. (३७)

जागेच्या प्रकारामुळे वास्तूचा कोणता प्रकार निवडावा याबाबत मतभिन्नता दिसून येते. मी मात्र केवळ शास्त्राला अनुसरून याबद्दलची माहिती सांगतो. (३८)

**वास्तूच्या जागेचे (आकारानुसार) प्रकार** (छायाचित्र १)

चौरसाप्रमाणे चारी बाजू समान असलेली, आयताप्रमाणे असमान बाजू असलेली, वर्तुळाप्रमाणे वक्र सीमा असलेली, गाडीप्रमाणे (एका बाजूला) अरुंद असलेली, (३९)

ध्वजाप्रमाणे (त्रिकोणी) आकार असलेली जमीन, तसेच वज्राच्या आकाराची 'वज्र भूमी' असते. बाणाप्रमाणे व छत्राप्रमाणे दोन भागांत विभागलेली भूमी, (४०)

त्यानंतर विंझणाप्रमाणे आकार असलेली जमीन, दोन मुखे व शीर्षांची, माशाच्या आकाराची, कासवाच्या पाठीप्रमाणे, शंखाच्या आकाराची (व) अर्धचन्द्राप्रमाणे (अर्धवर्तुळाकृती) शोभणारी, (४१)

पूर्ण कुंभ तसेच तलवार अथवा कमळ इत्यादींच्या आकाराची असे वास्तूचे (जागेच्या आकाराप्रमाणे) सोळा प्रकार निश्चित केलेले आहेत. (४२)

जी जमीन कासवाच्या पाठीच्या आकाराची तसेच कुंभ, शंख यांच्या आकाराची असते ती विष्णू तसेच शिवमंदिरांसाठी योग्य असते; तसेच कमळाच्या आकाराची जमीन देखिल.(४३)

आयाताकार, माशाच्या आकाराची त्याचप्रमाणे वज्र व तलवारीच्या आकाराची वास्तू देवी - (मंदिरा-)साठी योग्य असते. तिला यंत्रवास्तु[१] म्हणतात. (४४)

इतर देवांच्या प्रासादांच्या प्रकारांसाठी मध्यम प्रकारच्या जागांची निवड करतात. (जागेच्या प्रकाराप्रमाणे) वास्तूचा प्रकार असावा; हे आवश्यक काम आहे यात संशय नाही.(४५)

या (आकारांमध्ये) चौरस जमीन धन व धान्य यांच्या वाढीस कारणीभूत होते; श्रेष्ठ वाराहाच्या (वाराह संहितेच्या) मताने अशी जमीन ' सिद्धभूमि ' म्हणून प्रख्यात आहे. (४६)

**जमिनीच्या शुद्धीकरणाची रीत** (छायाचित्र २ अ)

वास्तूच्या जागेची निश्चिती केल्यानंतर ती जमीन स्वच्छ व शुद्ध करावयास हवी. दोरीच्या सहाय्याने आखणी करण्यासाठी जागेच्या केन्द्रस्थानी शंकूची स्थापना करावी. (४७)

जागेच्या केन्द्रस्थानी असलेल्या बिंदूपाशी बारा अंगुले खोल खड्डा करून तेथील पोकळीत लाकडाचा किंवा बांबूच्या तुकड्याचा केलेला शंकू रोवावा. (४८)

[शंकू २४ अंगुले लांबीचा असून त्यातील १२ अंगुले लांबी जमिनीत पुरलेली असते व १२ अंगुले लांबीचा भाग जमिनीवर असतो.]

केंद्रस्थानी तितक्याच (म्हणजे १२ अंगुले लांबीच्या) तसेच ३२ मुष्टी लांबीच्या दोरीच्या सहाय्याने दोन, मंडल व वेष्टनी ही, वर्तुळे रेखावीत[१]. (४९)

विश्वकर्मा (म्हणजे स्थपती) व ब्राह्मणश्रेष्ठ (पुरोहित) यांनी शंकूच्या बाजूपाशी व वेष्टनीपाशी, विघ्नांचा नाश करणाऱ्या देवतास्वरूप नृसिंहाची[१] आराधना करावी. (५०)

(वर्तुळ आखताना त्याच्या) त्रिज्येवर असलेल्या दोरीची (लांबी) जर वाढली तर (धन्यास) कीर्तीचा लाभ होईल यात काडीचीही शंका नसावी. (५१)

(मात्र) जर त्या जागी दोरी आखूड झाली तर ते अशुभकारक असून त्या जमिनीचा तेव्हा काहीही विचार न करता त्याग करावा. (५२)

दोरीने आखणी करीत असताना जर भयानक स्वर निर्माण झाला (ऐकावयास आला) तर ती जमीन काहींही विचार न करता त्यागावी. (५३)

---

[१] टिप्पणी पहा.

**आकृती २–नागबंध**
**१.५५–५८**

(आखणी करण्यासाठी) दोरीला ताण देत असताना जर चांगला सुगंध सुटणे इत्यादी (शुभ शकुन) झाले असल्यास ती जागा प्रासादासाठी शुभकारक असून मनोज्ञ समजतात. (५४)

**नागबन्ध**[१] (आकृती २)

वास्तु-शंकुच्या आजुबाजूची जागा स्वच्छ व शुद्ध करावी. ते (काम) संपल्यानंतर नागाच्या स्थापनेचा शास्त्रानुसार असलेला विधी ऐक. {नागबन्धाच्या अनुक्रमाने दाराच्या दिशेबद्दलचा निर्णय विधिपूर्वक घ्यावा.} (५५)

पूर्व दिशेकडील तोरण सर्वसाधारणपणे यश (सिद्धी) देणारे असते. वास्तूची (जमिनीची) पूजा इत्यादी श्रावण तसेच भाद्रपदात (या महिन्यांत) करू नये. (५६)

मार्गशीर्ष व पौष (महिन्यात) नागाचे डोके दक्षिणेकडे असते. हा शास्त्राच्या मताने यथायोग्य शुभ काल असतो. त्यावेळी, (५७)

नागबन्धाला अनुसरून शंकूची स्थापना करणे उत्तम असते. त्यानंतर प्रासादाच्या भिंतींची स्थापना करण्यासाठी (पायासाठी) खड्डा खोदावा. (५८)

शिखराची जी लांबी (उंची) असणार आहे त्याच्या एक-तृतीयांश इतक्या खोलीपर्यंत जमीनीच्या गर्भात (पायासाठी) खड्डा खोदावा. हा खड्डा (म्हणजे त्याच्या बाजू) जमिनीत निस्संशय तिरपा खणावा. (५९)

खोदलेल्या जमिनीत (गर्भपीठे) पायाची (गर्भभूमी) सुंदर आखणी करावी; व त्या आखणीप्रमाणे त्या खड्ड्यात पाया बांधून तो खड्डा भरावा. {त्या आखणीप्रमाणे पायाच्या भिंतींच्या दगडांनी तो खड्डा भरावा.} (६०)

१ टिप्पणी पहा.

आकृती ३––मंदिराचा पाया
१.५९–६० व १.७८–८०

आकृती ३अ–गर्भगृहाचे तलदर्शन
१.६१–६७

[देवालयाच्या पायासाठी आकृती ३ मध्ये दिल्याप्रमाणे खड्डा खणून त्यात पायरीपायरीने वर चढत जाणारा व अरुंद होत जाणारा भरीव पाया बांधतात.]

**पायाच्या अधोच्छन्दाच्या (गर्भ-यंत्राच्या) आखणी बद्दलची माहिती** (छायाचित्र २आ) (आकृती ३अ)

आता पायाच्या अधोच्छन्दाच्या आखणीबद्दलची माहिती सावधान चित्ताने ऐक. जागा चौरस अथवा आयाताकार असावी, मात्र ती नेहमीच चौकोनी असावी. (६१)

(वास्तूच्या) क्षेत्राचे दोन (उभ्या व आडव्या) मध्यरेषांनी (चार) भाग करून त्यांचे पुन्हा (प्रत्येकी) तीन भाग करावेत. रुंदीच्या दोन्ही शेवटांना अर्ध्या भागाने अनुक्रमाने वाढ करावी. (६२)

अशा रीतीने आयाताकार तलदर्शन मिळते. मागच्या बाजूचे तीन भाग करून त्यांना लांबीच्या बाजूने छेद द्यावा. (६३)

मध्यभागातील दोन कोष्ठ गर्भगृहासाठी निश्चित करतात. [१]{त्या दोन भागांच्या मध्यभागी पवित्र देवस्थान असावे.} रुंदीच्या मध्यावरील बिंदूपासून (म व म[१] बिंदू पासून), सारख्या अंतरावर, त्यानुसार व त्याप्रमाणे दोन्ही बाजूंना रेघा

[१] टिप्पणी पहा.

(ट ढ व ठ ड) वाढवाव्यात. त्यांच्या (रेघांच्या) दोन्ही बाजूंना (रुंदी) दोन अर्ध्या भागांनी वाढवावे म्हणजे खालच्या व वरच्या बाजूंना रुंदी दोन भाग होईल. (६४, ६५)

दोन्ही बाजूंना (दक्षिण व उत्तरेकडील) काढलेल्या रेघा (कज व गझ) अर्ध्या भागावर निश्चित कराव्यात (कख = गघ = चज = छझ = $^1/_2$ भाग.) आड रेघेपासून (अई व आइ) सुरुवात करून गर्भरेघेपर्यंत (पब व फभ) असतात. (आयत कखघग व आयत चजझछ यांची रुंदी पफ इतकी असते.) मध्यरेघेच्या दोन्ही बाजूंना आयताकार (कखघग व चजझछ) मिळतात. लांबीच्या दोन्ही बाजूंना लांबी सारखी वाढवून आयत (टठडढ व तथदध) मिळतात; त्यात शंका नसावी. (६६, ६७)

याप्रमाणे अर्धे भाग करून त्यांची पूर्वीप्रमाणेच दोन्ही बाजूंना योजना करावी. त्रिच्छेदांची (१ ते ८) गर्भगृहाशी व त्याच्या खालच्या बाजूला जोडणी करावी. (६८)

वरच्या बाजूला (गर्भगृहाच्या) बाजूच्या एक चतुर्थांश लांबीची बाजू गर्भगृहापासून पुढे योजावी (म्हणजे त्रिच्छेद १ ते ८ मिळतील.) (६९)

{याप्रमाणेच मधल्या दोन्ही रेघा, सारख्या मापांनी वाढवून दोन्ही बाजूंना त्यांना अनुसरून क्षेत्र मिळते. (६६)

[पफ व बभ या मधल्या दोन रेघा मागे वाढवून टठडढ हा आयत मिळतो. याची लांबी (ढड) दोन भाग व रुंदी (टढ) अर्धा भाग असते.]

आडरेघेपासून (अआ, आइ, इई व ईअ या आडरेघांपासून) सुरूवात करून, गर्भक्षक्षेत्राच्या प्रमाणात लहान क्षेत्र (कखगघ व त्याचप्रमाणे दुसऱ्या बाजूला), नियमाप्रमाणे, गर्भरेघेपाशी योजावीत. (६७)

[खच, घछ तसेच तढ व थड यांना गर्भरेघा म्हणतात कारण त्यांच्यामुळे पबभफ हे गर्भगृह मिळते.]

त्यांच्या (कख व गघ यांच्या) दोन्ही बाजूंना कोनांप्रमाणे व अर्ध्या भागांचे असे गर्भगृहाला जोडलेले असे आठ क्षेत्र होतात. (१ ते ८ लहान आयत) (६८)

तीन निरनिराळ्या खंडांत, बुद्धीमान शिल्पीने (राह इत्यादी) घराचे भाग स्थापावेत. पूर्वी सांगितल्याप्रमाणे ते (भाग) गर्भगृहाला बाहेरच्या बाजूने जोडावेत. (६९)}

[1] टिप्पणी पहा.

{हे तिन्ही खंड सारख्या भागांचे असून ते नियमांनुसार (विधिपूर्वक) गर्भगृहाला जोडावेत.} हे तीन्ही खंड सारख्या भागांचे असून त्यांची (गर्भगृहाच्या) खालच्या (पूर्वेकडील) बाजूला योजना करावी. यामुळे लांबीचे सहा भाग व रुंदीचे पाच भाग होतात. (७०)

हे विमान अथवा शिखर यांच्या तलच्छन्दाचे विभाग आहेत. (आता) येथे मी मुखशालेच्या तलच्छन्दाची संपूर्ण माहिती देतो. (७१)

[एतानियंत्रभेदानि -- याचे अक्षरशः भाषांतर असे हे तलच्छन्दांचे प्रकार आहेत असे होईल. पण येथे एकाच तलच्छन्दाचे वर्णन केलेले आहे; तेव्हा यंत्रभेद या शब्दाचा अर्थ तलच्छन्दाचे निरनिराळे विभाग असा केला आहे.]

समोरील पूर्वेकडील बाजूकडे मुख्य क्षेत्राची वाढ करावी. (या क्षेत्राची) लांबी व रुंदी ही (गर्भगृहासाठी वापरलेल्या) लांबीच्या एककानुसार घेतात. (७२)

गर्भगृहाच्या दाराच्या भागाची माहिती मी प्रयत्नपूर्वक सांगतो. दाराच्या भागाचे चार विभाग करून त्यातील दोन भाग (रुंदीचे) दार उत्तम असते. (७३)

[यत्नतः = प्रयत्नपूर्वक, हा शब्द येथे दारांच्या रुंदीबद्दल जो नियम सांगितला आहे तो काळजीपूर्वक पाळावा या अर्थी घातला आहे.]

दाराच्या (दोन) विभागातून उरलेल्या बाजूच्या [प्रत्येकी एक] विभागाची रुंदी अर्ध्या भागाने वाढवावी. अशा रीतीने तेथे जे क्षेत्र मिळते त्यास ' संधिस्थान ' म्हणतात. (७४)

{दाराच्या भागाच्या दोन्ही कडेच्या रेघा तोरणापर्यंत वाढवाव्यात. दोन्ही बाजूंना जे क्षेत्र मिळते त्यास ' संधिस्थान ' म्हणतात. (७४)}

दरवाज्याच्या दुसऱ्या पायरीच्या सभोवार ' संधि ' तीन भागांचा असतो; त्याच्या खाली अर्धचन्द्राच्या आकाराच्या दोन पायऱ्या असतात. (७५)

पहिली पायरी ही तोरणाच्या भिंतींमध्ये असते. संधिबिंदूपासून (मुखशालेची) रुंदी (दोन्ही बाजूंना) लांबीच्या तीन एककांनी वाढवावी. (७६)

गर्भगृहाची जी रुंदी त्याच्या दुप्पट (मुख-) शाला असावी. त्यापासून (मुखशालेच्या लांबी-रुंदीची) निश्चिती करून ती चार भाग असावी. (७७)

[गर्भगृहाच्या आतील रुंदीच्या दुप्पट मुखशालेच्या आतील भागाची रुंदी असावी. गर्भगृह दोन भाग रुंदीचे आहे तेव्हा मुखशालेची भिंतीच्या आतून रुंदी चार भाग असावी.]

शेवटी, (मुखशालेचा) मध्यबिंदू, गर्भगृहाच्या मध्यबिंदूस मिळवावा. पायातील शुभदायक भिंती (पूर्ण भीत्ती) अत्यंत मजबूत अशा बांधाव्यात. (७८)

पायाची पातळी जमिनीपर्यंत आल्यानंतर तसेच (मजबूत) शुभदायक असे पीठ बांधावे. जमिनीची (खड्ड्याची) बाजू व तसेच गर्भमंदिराच्या भिंतींची बाजू यांच्यामधील रिकामी जागा भरून काढावी. (७९)[१]

जमिनीतील खड्डा वाळू, माती किंवा उत्तम मजबूत दगड यांनी भरावा व तो भरताना दृढीकरण करून मजबूत होईल असा भरावा. (८०)

**मुखशालेच्या तलच्छन्दाची माहिती**

आता मुखशालेच्या भिंती बांधणे इत्यादी कामांची माहिती ऐक. तिच्या (मुखशालेच्या) मध्यबिंदूपासून इतर सर्व मोठ्या विभागांची आखणी निश्चित करावी. (८१)

संधिबिंदूपासून सुरुवात करून, समोरील दाराच्या भागापासून दोन्ही बाजूंना योग्य क्रमाने रेघांच्या सहाय्याने विभाग पाडावेत. (८२)

तेथून (गर्भगृहाच्या दरवाज्याच्या) लक्ष्मीस्थानापासून सुरुवात करून (या) रेघा, पूर्व दिशेकडील तोरणापासून (म्हणजे गर्भगृहाच्या तोरणापासून मुखशालेच्या) तोरणापर्यंत, अशा वाढवाव्यात. (८३)

शेवटी (मुखशालेच्या) रुंदीचे विभाग करणाऱ्या सात रेघा आखाव्यात; तसेच एका कोपऱ्यापासून दुसऱ्या (समोरच्या) कोपऱ्यापर्यंत अशा दोन रेघा आखाव्यात. (८४)

[मुखशालेची आतली रुंदी चार भाग व आतली लांबी (सात रेघांनी झालेल्या) सहा भागां इतकी असते. यावरून गर्भगृहाच्या विभागांच्या लांबीच्या एककावरून मुखशालेची लांबी-रुंदी कशी निश्चित करावयाची ते सांगितले. नंतर तयार होणाऱ्या आयताच्या समोरासमोरील बाजू सारख्या लांबीच्या आहेत तसेच त्यांचे कोपरे अचूक काटकोनात आहेत याचा पडताळा येण्यासाठी समोरासमोरील कोपरे कर्णांनी जोडावेत; यासाठी हे कर्ण परस्परांना मध्यबिंदूपाशी छेदावयास हवेत.]

रुंदीच्या मध्यभागातील रेघेशी दोन त्रिकोण (भिंतीच्या) जाडीमध्ये जोडतात. ह्या खिडकीच्या जागा असून त्यांना ' शालारन्ध्र ' म्हणतात. (८५)

पुढच्या बाजूच्या अग्रभागी मोठे तोरण बांधतात. तेथे प्रयत्नपूर्वक मजबूत अशा दोन पायऱ्या कराव्यात. (८६)

तीन भाग केलेल्या (मुखशालेच्या लांबीचे) दहा किंवा त्याहून अधिक संख्यांचे विभाग पाडावेत. बुद्धीमान शिल्पीने चारी कोपऱ्यांशी त्रिकोणांची योजना करावी. (८७)

[कोपऱ्यांपाशी त्रिकोणी कमान बांधून त्यांना मजबूती देता येते.]

---

[१] टिप्पणी पहा

**आकृती ४––योगिनीयंत्र**
१.९०–१००

शिल्पशास्त्राला अनुसरून अशा रीतीने कोणक इत्यादी करावेत. त्यानंतर अनर्थ, अनुराह इत्यादी अवयव निश्चित करावेत. (८८)

एकमेकांच्या सारख्या स्थानी मनोहर अशी निरनिराळी कामे करावीत. प्रत्येक आडव्या रेघेच्या मूळस्थानी तीन यव रुंदीची फट (खान्दि) ठेवावी. (८९)

अशी प्रत्येक खांबाशी प्रत्येक भागी खांदि किंवा विश्रांतीस्थानांची (याप्रमाणे) योजना करावी. शक्तीच्या (देवीच्या) देवालयाच्या पायात ठेवावयाच्या श्रेष्ठ अशा योगिनीयंत्राची माहिती ऐक. (९०)

**योगिनीयंत्र** (छायाचित्र २ इ व आकृती ४)

तंत्रशास्त्राला अनुसरून प्रमुख योगिनी पीठाची (यंत्राची) माहिती अशी-जमिनीवर सारख्या अंतरावर तीन बिंदू ठेवावेत. (९१)

[हे बिंदू पूर्व-पश्चिम की उत्तर-दक्षिण ठेवावेत याची माहिती दिलेली नाही.]

मूळ बिंदूपासून दोन त्रिकोण आखावेत. हा सत्त्व त्रिकोण असून त्याच्या जवळ राजस त्रिकोण असतो. (९२)

या बिंदूतून जाणारी जी रेघ तिला ' रजोरेखा ' म्हणतात. या रेघेच्या टोकापासून सुरुवात करून तमसाची (त्रिकोणाची) तेथे योजना करावी. (९३)

तमोगुणाच्या या रेघेच्याखाली उलटा त्रिकोण आखावा. नंतर सत्त्वगुणाच्या मध्यभागातून रेघ आखणे उत्तम असते. (९४)

याप्रमाणेच तमस त्रिकोणात खालच्या बाजूला, खाली जाणारी रेघ आखावी. रजोबिंदूपासून (मध्यबिंदूपासून) दोन त्रिकोणांची योजना करावी. (९५)

सर्वोत्तम यंत्र वर व खाली (मिळून) पाच त्रिकोणांनी बनते. शेवटी, दोन्ही बाजूंवर (उजवी व डावीकडे) वरीलप्रमाणेच रजोबिंदुपासून (निघणारे प्रत्येकी) एक त्रिकोण आखावेत. (९६)

(यंत्राच्या) मध्यभागी, सर्व यंत्राचे समअक्ष विभाग करणारी योगिनीरेखा असते. दंडाप्रमाणे (सरळसोट असून) ती सर्व त्रिकोणांच्या बिंदूंना छेदून जाते. (९७)

तंत्रपीठाला अनुसरून हे श्रीयोगिनीयंत्र आहे. जेथे हे ' प्रासाद योगिनी ' यंत्र आहे तेथे सर्व (मनोकामना) सिद्धीस जातात हे निश्चित. (९८)

योगिनीबिंदूंच्या आश्रयाने सोळा मातृकांचे यंत्र होते. प्रत्येक बिंदू चार योगिनींनी आक्रमिलेला असतो. (९९)

गर्भगृहाच्या आतमध्ये ठेवलेले हे यंत्र महान शक्तिमान असते. देवीच्या (देवीमूर्तीच्या) पीठाच्या मापाइतके असलेले हे यंत्र गर्भगृहाच्या मध्यभागी ठेवतात. (१००)

[गर्भगृहाच्या मध्यभागी जेथे देवीच्या मूर्तीचे पीठ असते तेथे, त्याच्या खाली, व त्याच्या मापांत केलेले हे यंत्र ठेवले असता ते महान शक्तिमान होते. ]

दक्षिण, उत्तर दिशांकडे व यंत्राच्या पूर्व-पश्चिम बाजूस चाणाक्ष शिल्पीने गर्भगृहाच्या जमिनीच्या मध्यभागी यंत्राची स्थापना करावी. (१०१)

[गर्भगृहाच्या मध्यभागी यंत्र असे स्थापावे की ते दक्षिण, उत्तर तसेच पूर्व व पश्चिम दिशांकडे सारखेच (सममिती अक्ष) असेल.]

**योगिनी यंत्र** (हस्तलिखित क्र. ३ प्रमाणे.)

{ तांत्रिक देवालयाच्या पायासाठी जे योगिनीयंत्र कल्पिले आहे, ते तू ऐक. (९०)

तंत्रशास्त्राला अनुसरून प्रमुख असलेले योगिनीपीठ (यंत्र सांगतो.) जमिनीवर तीन बिंदू रेखून दोन समभुज त्रिकोण आखावेत. (९१)

मध्यभागी असलेल्या रेघेला अनुसरून (त्रिकोणांच्या) सर्व रेघा तेथून आखाव्यात, खालच्या बाजूला ऊर्ध्वमुख असलेल्या त्रिकोणाच्या क्षेत्राला ' वन्हि ' समजतात. (९२)

वरच्या बाजूला त्याच आकाराचे (मात्र खालच्या बाजूला मुख असलेली त्रिकोणाकृती) ' पय ' क्षेत्र आखावे. बाजूंना असलेल्या दोन बिंदूंपासून वरती व खालीदेखिल वरीलप्रमाणेच त्रिकोण आखावेत. (९३)

एकमेकांपासून दूर गेलेले, त्याच आकाराचे (म्हणजे त्रिकोणाकृती) दोन लहान क्षेत्रे, मध्यबिंदूपासून योजावेत. उत्तम पिण्डिस्थलाच्या मध्यभागी हा मध्यबिंदू असतो. (९४)

[पिण्डिस्थल – देवी मूर्तीच्या पीठाची जागा]

पुन्हा दक्षिणेकडे एकच प्रमुख त्रिकोण असून त्याला दोन लहान (त्रिकोणाकृती) क्षेत्रे जोडलेली असतात व त्यांच्यावर त्रिकोण ठेवलेला असतो. (९५)

मागे, पुढे, तसेच बाजूंना, नियमांप्रमाणे तसा आकार (त्रिकोणाकृती) असावा. पूर्व, पश्चिम व मध्यभागी त्रिकोणाकृती आखाव्यात. (९६)

मध्यबिंदूंच्या जागी दोन त्रिकोणांचे अग्र अनुक्रमाने ठेवावेत. अशा एकंदर सात त्रिकोणाकृती असून त्यांपैकी (उजव्या व डाव्या) बाजूंना पाच त्रिकोणाकृती असतात. (९७)

पूर्वेकडे व पाठीमागे (पश्चिमेकडे), तिन्ही बिंदूंच्या आश्रयाने असणारे दोन त्रिकोण असतात. पहिला (त्रिकोण) सत्त्व तसेच मध्यभागातील राजस व खाली तामस (त्रिकोण) असतात. (९८)

(देवमूर्तीच्या) पीठाच्या भागानुसार केलेले असे हे श्रीयोगिनीयंत्र आहे. या यंत्राची प्रासादात पूजा केल्याने (सर्व मनोकामना) निश्चितच सिद्धीस जातात. (९९)

येथे सोळा मातृका असून बिंदुरूपांत योगिनी असतात. प्रत्येक बिंदूच्या आश्रयाला चार योगिनी असतात. (१००)

पूर्व, पश्चिम तसेच उत्तर व दक्षिण दिशांकडे, गर्भगृहाच्या जमिनीत चाणाक्ष शिल्पीने या यंत्राची स्थापना करावी. (१०१) }[१]

---

[१] दोन्ही हस्तलिखितांप्रमाणे योगिनी यंत्राचे पूर्ण वर्णन येथे दिले आहे, कारण ते आखावयाच्या रीती निरनिराळ्या आहेत. मात्र आखलेले यंत्र सारखेच आहे.

ब्राह्मणाने दोरीच्या व इतर साहित्याच्या (खुंटी वगैरे) सहाय्याने या यंत्राच्या रेघांची आखणी करण्यासाठी रक्तचन्दनाच्या गंधामध्ये मिश्रित केलेल्या अगरू व कुंकू यांचा उपयोग करावा. यंत्राची अशी स्थापना करून राजाच्यासह त्याची पूजा करावी. यंत्राच्या प्रत्येक बिंदूवर असलेल्या योगिनींचीदेखील तशीच पूजा करावी. (१०२, १०३)

बिंदूंच्या जागी असलेले खळगे निरनिराळी रत्ने व मुळे यांनी भरावीत; तसेच तेथे धातूंच्या मूर्तीही ठेवाव्यात. (अशा रीतीने) गर्भगृहाच्या बिंदूंची महापूजा करावी. (१०४)

[योगिनींची चिन्हे, उदाहरणार्थ कमळ, त्रिकोण इत्यादी धातूंची करून त्या धातूमूर्ती निरनिराळ्या बिंदूंपाशी ठेवाव्यात.]

पूजा झाल्यानंतर बलि द्यावा व त्यानंतर पायाचा हा भाग झाकून टाकावा. या यंत्रराजाची पूजा केल्याने सर्व विघ्नांचा नाश होतो. (१०५)

राजाची युद्धातील विजयाची इच्छा व सर्व प्रकारच्या मनोकामना पुऱ्या करणारी तसेच पीठाची व जागेची शुद्धी (या पुजेमुळे) होते यात शंकाच नाही. (१०६)[१]

### (मुख-)शालेची माहिती (तोरणाची निर्मिती)

(छायाचित्र **३ अ, आ, इ** व आकृती **५**)

यंत्राची पूजा केल्यानंतर (मुख-)शाला व (गर्भगृहाचे) शिखर यांच्या उत्तम निर्मितीस सुरुवात करावी. (मुख-)शाला व इतर (तिचे अवयव) यांची माहिती ऐक. (१०७)

सर्व प्रथम तोरणद्वाराच्या जवळच्या भागाचे काम करावे. देखण्या (दिव्य) अशा तोरणाच्या घटकांची विभागणी (लक्षणे) वगैरे माहिती ऐक. (१०८)

**आकृती ५—द्वारबन्ध**
१.११३–११९

[१] टिप्पणी पहा

तोरणाची जागा पूर्व दिशेकडे असते, त्याहून निराळे क्वचितच करतात. जागेची विभागणी काही वेळेला, त्यातल्यात्यात विशेषतः रुद्राच्या (शंकराच्या) मंदिरासाठी, वेगळ्या तऱ्हेने केलेली असते. (१०९)

त्याचप्रमाणे विष्णुमंदिरासाठी दोन भागांचे तोरण असावे; मात्र काही ठिकाणी त्याचे पाच किंवा वेळेला सात विभाग करतात. (११०)

दोन भागांचे तोरण असल्यास त्याच्या मध्यभागी चार द्वारपाल (योजतात. मात्र) जेथे तीन भागांचे तोरण करतात तेथे विशेषाने तीन मुखे (द्वारपालांचे) असतात. (१११)

नाहीतर दाराच्या (चौकटीच्या) खालच्या बाजूला दोघांची (दोन द्वारपालांची) स्थापना करतात. तेथे दोन भागांच्या दाराच्या निरनिराळ्या चौकटींचे वर्णन ऐक. (११२)

(संपूर्ण) दाराच्या क्षेत्राच्या रुंदीचे व उंचीचे, तसेच खालच्या भागाचे तीन-तीन रेघांनी सोळा संख्यांच्या भागांमध्ये विभागणी करावी. (११३)

[ आकृती **५** ]

(वरील) दुसरा व तिसरा विभाग उंचीत असे विभागावेत की त्यांचे चार भाग होतील. तेरावा व सोळावा हे खालचे विभाग (आडवे) रुंदीत दोन भागांत विभागावेत. (११४)

तेराव्या व सोळाव्या (खालच्या) अर्ध्या भागात द्वारपालांची स्थापना करावी व (त्यांच्या) वरच्या भागात वज्रमुण्डाची स्थापना करावी, याबाबत कोठलीही शंका असू नये. (११५)

पहिला, चवथा, पाचवा, आठवा व बाराव्या विभागापर्यंत ग्रह वगैरेंची घरे इत्यादींसह उत्तम छंद[१] करावा. (११६)

[छंद –– दरवाजाच्या चौकटीचे विभाग करून त्यांच्यावर केलेली अति मनोहर नक्षी.]

दुसऱ्या विभागाच्या निम्म्या भागी व तिसऱ्या विभागाच्या निम्म्या भागी (दोन्ही मिळून होणाऱ्या एक भागात) निरनिराळ्या प्रकारचे द्वारपाल निरनिराळ्या यंत्रांच्या सहाय्याने रेखावेत. (११७)

[यंत्र –– कुठलीही मूर्ती करताना जी सर्वसाधारण चौकट आखतात तीस त्या मूर्तीचे यंत्र म्हणतात. पुढे भैरवयंत्र वगैरेंची माहिती पहावी.]

तेथे भैरव, नागराज तसेच (शरीर मनुष्याचे मात्र) मुख वाघ अथवा सिंहाचे, दोन किंवा चार हातांचे (अशा मूर्ती) अनेक शास्त्रांना अनुसरून कोराव्यात. (११८)

जे यंत्र केवळ शास्त्राला अनुसरून असते तेच (मनोकामना) सिद्धीस नेणारे असते. तेव्हा त्यास (शास्त्रास) अनुसरून मी यंत्राची येथे माहिती सांगतो, ती समजून घे. (११९)

[१] टिप्पणी पहा

**वज्रमस्तकांचे प्रकार** (छायाचित्र ४ व ५)

प्रथम वज्रमण्डलाची लक्षणे सांगतो ती ऐक. वज्राच्या संरक्षणासाठी (टिकावूपणासाठी) निरनिराळ्या प्रकारच्या यंत्रांची योजना करतात. (१२०)

[विद्युत्पातापासून रक्षण होण्यासाठी असे इंग्रजी भाषांतर आहे ते योग्य वाटत नाही. वज्राच्या संरक्षणासाठी म्हणजे टिकावूपणासाठी असा अर्थ होऊ शकेल.]

(अ) **किरीट——**दोन वर्तुळे, एक वर्तुळ किंवा तीन वर्तुळे सुंदर दिसतील अशी खोदतात. प्रथम (वज्रमस्तकाचे) क्षेत्र निश्चित करून त्याची चार भागांत विभागणी करावी. (१२१)

पहिल्या आडव्या विभागात मनोहर अशी पट्टिका खोदावी. नंतर उभ्या मध्यवर्ती रेघेवर वज्रबिंदू (मध्यबिंदू) ठेवावा. (१२२)

तेथे दगडावर दोन वक्राकार (बलि) वर्तुळाकृतींमध्ये (एका वर्तुळाला वेष्टून दुसरे वर्तुळ याप्रमाणे) खोदावेत. ज्या पहिल्या रेघेवरती हे वक्राकार आखले जातात त्या जागेला ' बलि संधी ' म्हणतात. (१२३)

दोन्ही वक्राकारांच्या (बलिंच्या) किंचित वर व मध्यभागी कळीचा आकार द्यावा. आडव्या रेघेपासून (तिसऱ्या) वक्राकाराला सुरुवात करून (प्रथम काढलेल्या दोन बलिंच्या) दोन बाजूंना व वरच्या बाजूला (म्हणजे दोन्ही बलिंना वेष्टून) असा वक्राकार खोदावा. (१२४)

तिसऱ्या बिंदूपासून वरची बलि वक्राकार घेते. तिच्या खालच्या बाजूस खाली (लोंबणारी) पाने व वरच्या बाजूला विशेषतः कळी असावी. (१२५)

त्याच्या (दुसऱ्या वक्राकाराच्या) वरच्या भागी चंद्रकोरीच्या आकाराची पाने कोरावीत. शेवटच्या पाचव्या बिंदूपासून सुरुवात करून खालच्या दिशेला येणारी बलि (वक्राकार) तिसऱ्या आडव्या रेघेपर्यंत नेहमीच अर्धवर्तुळाकृती असते. तिसऱ्या बिंदूंच्या (दोन्ही) कोपऱ्यात किन्नर इत्यादींची (त्यांच्या मूर्तींची) स्थापना करावी. (१२६, १२७).

शिल्पीने बलि (वक्राकार) तसेच त्यांचे अलंकरणार्थ फुले खोदावीत. ही सर्व कामे शास्त्रानुसार असून, नेहमीच समजून उमजून केली पाहिजेत. (१२८)

त्याच्या ज्ञानाप्रमाणे (कुवतीप्रमाणे) शिल्पीने अलंकाराचे निरनिराळे प्रकार विमान, अनर्थ व भिंत (बाड) यावर खोदावेत. (१२९)

कुंभ, खुर व खालच्या भागी (अंलकारणाची) पद्धती वेगळी असते. त्यांचे प्रकार तसेच वज्रमस्तकावरील रेघांची आखणी यांची माहिती ऐक. (१३०)

कोणत्या कोणत्या प्रकारांनी किरीटाचे (या प्रकारच्या वज्रमस्तकाचे) तोरणाच्या अर्ध्या भागात, राहामध्ये तसेच शिखरावर (जे) भेद असतात (ते ऐक.) (१३१)

वृत्तवज्राने शिखरावरील कोनाड्याच्या (निशेच्या) वरच्या भागाचे अलंकरण करावे. लता वज्रमुखी ही खुरप्रदेशाच्या खालच्या बाजूला फार शोभून दिसते. (१३२)

(आ) **वृत्त**––द्वार भागावरील किंवा विशेषतः स्तंभभागावरील रेघा व तसेच दुसरी वृत्त-वज्रांगाची नक्षी खोदण्याची (माहिती) ऐक. (१३३)

तीन रेघांनी केलेल्या विभाजनाची निराळी पद्धत आहे. ती शिखराच्या मध्यभागी, कोनाड्याच्या वरच्या बाजूच्या चौरस क्षेत्रात वापरतात. (१३४)

येथे चौरसाचे दोन विषम भाग (एक भाग लहान व एक मोठा) करून (पहिल्या भागाच्या रेघेच्यावर) खालच्या भागात पट्टी व लताक्षेत्र (लतेची नक्षी असलेली पट्टी) असावी. (१३५)

वरील विभागाचे लांबीने (आडव्या रेघांनी) तीन सम भागांत विभाग करावेत. पहिली बलि दोन भागांत असून तिसरी (बलि) तिच्या खाली असावी. (१३६)

[पहिल्या दोन भागांत बलि असून त्याच्यावर दुसरी बलि असते.]

तिच्यावर, बुद्धिमान शिल्पीने, तिसरी दिव्य आकाराची बलि करावी. तसेच त्याच्या वरच्या भागात उभ्या मध्य रेघेवर सिंहमुख असावे. (१३७)

पहिल्या वर्तुळाची पातळी सर्वांहून उंच असते. सर्व बलि वर्तुळाकार असून नियमाप्रमाणे त्या सर्व भूमिप्रदेशापासून निघतात. (१३८)

[बलिच्या या व्याखेवरून तिचा अर्थ वळी असा करता येईल. पण हां शास्त्रीय शब्द असल्याने भाषांतरात तसाच ठेवला आहे. वळी लंबगोलाकृती असते.]

वरच्या बाजूला, दृष्टि खालच्या बाजूस वळलेले असे सिंहमुख करावे. त्याची खालची बाजू तिसऱ्या बलिच्या जवळ आलेली असावी. (१३९)

खालच्या बाजूस लोंबती माळ (आलम्ब) असून त्याच्या तळभागी पुन्हा लोंबती माळ असते. अलंकरणासाठी असे खोदकाम करून ते सर्व दृश्य उत्तम प्रेक्षणीय करावे. (१४०)

शेवटी तिसऱ्या वर्तुळाच्या जवळ खोदून दोन बलि कराव्यात (?). त्रिकोणाकार पीठावर (सर्वांत खालच्या विभागात) विधिवत् लतेची (नक्षी) खोदावी. (१४१)

ती लता वर्तुळाच्या जवळ असून तिच्या दोऱ्या (देठ?) भूमीला (खालच्या पायाभूत रेघेला) स्पर्श करतील अशा असाव्यात. वज्रबिंदूच्या जागी कीर्तिमुखाचा चेहरा खोदावा. (१४२)

शेवटी एक बलि खोदून तिच्या वरपासून आलम्ब लोंबताना दाखवावा, तसेच वर जाणाऱ्या दोन रेघांच्या संधींमध्ये सुंदर दिसणारी लता कोरावी. (१४३)

शेवटी चौरस क्षेत्रात निरनिराळ्या प्रकारच्या लता असाव्यात. मधल्या वर्तुळापासून त्यांची सुरुवात असून (सिंह-) मुखाच्या शेवटापर्यंत ती (लता) कोरलेली असते. (१४४)

तसेच दुसऱ्या (तिसऱ्या) रेघेला (खालच्या बलिला) जोडून लता करावी. वरच्या बाजूला श्रेष्ठ शिल्पीने दिव्य किन्नरींची स्थापना करावी. (१४५)

वज्रमस्तकांतील प्रकारांमध्ये हा ' वृत्त ' प्रकार आहे. खुर भागावर असणाऱ्या व सुंदर दिसणाऱ्या लता-वज्र-मुंडाची माहिती ऐक. (१४६)

(इ) **लता वज्र---**खुर भागावरती मनोहर अशी वज्रांगिनी लता करावी. कीर्तिमुखाच्या जागी नन्दिकामुख खोदावे. (१४७)

खुराच्या तळभागावरील पृष्ठभागावर (पीठे) छातीपर्यंत नन्दिका असावी किंवा मध्यभागी तिचे केवळ डोकेच स्थापन करावे. (१४८)

नंतर आखलेल्या मध्यरेघेच्या वर लांबीच्या दिशेने वाढ करावी. तळाला स्पर्श करील व (वरच्या) तीन भागांपर्यंत जाईल असे वर्तुळ खोदावे.**{**वर्तुळ असे आखावे की त्यात तीन भागांचा समावेश असून ते तळाला स्पर्श करील (हस्तलिखित ३, श्लोक १५१)**}** (१४९)

त्याच्या (वर्तुळाच्या) दोन्ही बाजूंना पंखाचा आकार दिलेले अर्धचंद्राकार असावेत. त्याच्या (वर्तुळाच्या) मध्यभागी गळ्यापर्यंत असलेले नन्दिकेचे शुभदायक मुख नंतर करावे. (१५०)

दोन्ही दलांमध्ये (पंखांमध्ये) मनोहर लतेची नक्षी खोदावी. वर्तुळाच्या वर खुराच्या वरच्या भागाला स्पर्श करील असा देखणा मोरपिसाचा डोळा (चन्द्रिका) करावा. (१५१)

लतावज्रांगाच्या खोदाईचे असे निरनिराळे शिल्पप्रकार आहेत. यानंतर दिव्य शाला निर्माण करावयाच्या प्रकारांची माहिती ऐक. (१५२)

**(मुखशालेच्या) भिंतीच्या भागाची (निर्मिती)** (छायाचित्र **८ अ, ब, क**)

भागकर्म, छेदकर्म तसेच पंचकर्म हे भिंतीच्या (खालच्या) अर्ध्या भागाच्या रुंदीत व जाडीत करतात. (१५३)

[भागकर्म = कोठलीही नक्षी काढावयाची असल्यास तेथील जागेची जी विभागणी करतात त्यास म्हणतात.

छेदकर्म = नक्षी खोदाईचे काम, व

पंचकर्म = प्रासादाच्या सर्वांत खालच्या भागाचे जे पाच अवयव असतात, ज्यांना पाभाग म्हणतात, ते करणे.]

भिंतीची अर्धी बाजू (आतली) अच्छिद्र (म्हणजे कुठलीही खोदाई न केलेली) असून दुसरी अर्धी बाजू (बाहेरील) अनेक अलंकरणांनी भूषविलेली असते. प्रत्येक पार्श्वभिंत ही अनर्थ इत्यादी अवयवांसाठी तीन भागांत विभागावी. } (१५४)

प्रत्येक विभागाच्या प्रत्येक पार्श्वभागी उत्तम खान्दि (फट) असावी. मध्यभागी मजल्यांच्या (संख्येच्या) अनुसार (भून्यनुसारेण) बुद्धीमान शिल्पीने दोन राह (प्रत्येक बाजूला एक याप्रमाणे) करावेत. (१५५)

दोन्ही बाजूंना (कोपऱ्यांना) कोणक पूर्वी सांगितल्याप्रमाणे करावेत. खान्दिच्या मध्यभागी अर्ध्या खोलीपर्यंत गुण–रेखा खोदाव्यात. (१५६)

फक्त अनर्थाच्या दोन्ही बाजूंना व शिखरावरती ही (गुणरेखा) खोदू नये. अनर्थाचा वरचा भाग चित्रविचित्र वेलींच्या गुंफण्याच्या नक्षीने भूषवावा. (१५७)

**भैरवयंत्र** (छायाचित्र **३ ई** व आकृती **६ अ**)

(वज्रमस्तकाच्या) खालच्या अर्ध्या भागात तोरण भैरव असावा. (१५८)

आयताकार पाषाणाच्या चांगल्या पृष्ठ भागाचे उभे आणि आडवे तीन रेघांनी (प्रत्येकी चार) विभाग करावेत. (१५९)

कोपऱ्यांपासून सुरुवात करून परस्परांना उलट असे मुख असलेले (दोन) त्रिकोण (अऊआ व ईउइ) रेखावेत. कोपऱ्यांना विभागणारे कर्ण (अम, इम, आम व ईम) मध्य-भागील रेघेवरील मध्यबिंदूला (म) स्पर्श करतात. (१६०)

**आकृती ६––भैरवयन्त्र**
१.१५८–१६०

(भैरवाचे) डोके प्रमुख मध्यरेघेवर वरच्या भागी ती (रेघ) मध्यभागी असेल अशा रीतीने स्थापन करावे. मस्तक व जटाभार ही त्रिकोणाचा पाया (त्रिकोणपीठे) व त्याचे (त्रिकोणाचे) शीर्ष यांच्यामध्ये करावे. (१६१)

पहिल्या आडव्या रेघेपाशी (भैरवाचा) कण्ठ असून दुसऱ्या (आडव्या रेघेपाशी भैरवाची) नाभि असते. (या दोघांच्या मधली) पाठ (रुंदीच्या) एक तृतीयांशाइतकी ती फार मनोहर दिसेल अशी खोदावी. (१६२)

खालच्या बाजूच्या रेघांतील अंतराइतके (उंचीचे) पाय असून ते परस्परांच्या उलट दिशांना वळलेले असतात. उजव्या हातात त्रिशूल असून त्याची आखणी उभ्या रेघेवर करावी. (१६३)

वरचा पुढील हात हादेखील त्याच्याप्रमाणे उभ्या रेघेच्या जवळ रेखावा. खालचा डावा हात मध्यभागी (व) त्रिकोणाच्या बाजूच्या जवळून गेलेला असतो. (१६४)

बुद्धीमान शिल्पीने उजवीकडील वरचा हात वर सांगितल्याप्रमाणे त्रिकोणाचे दोन बिंदू आणि त्यांना जोडणारी रेघ यांच्यामध्ये कोरावा. (१६५)

(उजवा) गुडघा दुसऱ्या आडव्या रेघेपाशी त्रिकोणाच्या मध्यभागी असतो. डावा पाय हा किंचित तिरपा असून तो तिसऱ्या त्रिकोणात असतो. (१६६)

तिसऱ्या आडव्या रेघेपासून सुरुवात करून आणि तिसऱ्या उभ्या रेघेला स्पर्श करणारा असा उजव्या पायाचा भाग असून तो विशेषतः अर्ध्या त्रिकोणावर असावा. (१६७)

अशा रीतीने भैरवश्रेष्ठाची मूर्ती त्याच्या शक्तीसह तेथे करावी. त्याने एका हातात त्रिशूळ धारण केलेला असून दुसऱ्या हातात पानपात्र असते. (१६८)

[पानपात्र – दारू पिण्याचे भांडे]

जर नन्दीभैरवाची उग्र मूर्ती कोरावयाची असेल तर त्यास चार हात दाखवावेत. त्याच्या हातात (वर सांगितलेल्या उपाधींसह) खट्वांग व पाश शास्त्रात दिल्याप्रमाणे दाखवावेत. (१६९)

त्याचे तोंड विकट व भयंकर असून जटाभाराने अलंकारिलेले असते. अशा रीतीने दाराच्या चौकटीच्या खालच्या बाजूस (भैरवाची) भव्य मूर्ती खोदावी. (१७०)

किंवा त्याच्या दोन्ही बाजूंना खालच्या भागात निम्म्या उंचीपर्यंत दोन सुंदर शक्ती कराव्यात. (खालच्या) पहिल्या रेघेपर्यंत डाव्या व उजव्या बाजूंना त्या असतात. (१७१)

{ बाजूंवरील बिंदूवर असणाऱ्या चार त्रिकोणांच्या जागेमध्ये चार हात हे वरच्या त्रिकोणांच्या जवळ करावेत, (१७०)

व मध्य रेघेला अनुसरून खालच्या भागात दोन पाय रेखावेत. डावा पाय हा (मध्य) रेघेच्या डाव्या बाजूला काहीसा तिरपा असा असावा } (हस्तलिखित १)[१] (१७१)

---

[१] शंकराच्या देवालयात पूजा सुरू करण्यापूर्वी या दोन्ही भैरवांची पूजा करणे आवश्यक समजतात. पहिल्यास भृकटीभैरव व दुसऱ्यास नंदिकेश्वरभैरव म्हणतात.

**तोरणलक्ष्मी यंत्र** (छायाचित्र ६ व आकृती ७)

**गजलक्ष्मी**

१.१८१–१९३

**शुभलक्ष्मी**

१.१७२–१८५

आकृती ७

वत्सा, यंत्राबद्दलची सुस्पष्ट माहिती सांगतो ती ऐक. दाराच्या मध्यभागी असलेल्या तोरणाच्या(उत्तरंगाच्या) मध्यभागी हे यंत्र (स्थापितात). (१७२)

लक्ष्मी तोरणासाठी तोरणाच्या दोन प्रकारांची योजना करता येते. गजलक्ष्मी व शुभलक्ष्मी अशा या लक्ष्मी सर्व प्रकारच्या शुभ गोष्टींना देणाऱ्या असतात. (१७३)

मनोहर दिसणाऱ्या पाषाणाच्या पृष्ठभागावर चौरस आखावा. पाषाणाचा सोळावा भाग हा तोरणाचा आधार (चौकट) असतो. (१७४)

(पाषाणाच्या) पृष्ठभागाच्या लांबीचे तसेच रुंदीचे पाच रेघांनी (सहा) विभाग करावेत. कोपरे विभागणारे दोन कर्ण मध्यबिंदूपर्यंत आखावेत. (१७५)

दुसऱ्या रेघेने केलेल्या विभागांचे चार कोपरे (तिरप्या रेघांनी, कर्णांनी) विभागावेत. मध्यभागी दोन अथवा चार हातांची महामाया (महालक्ष्मी) रेखावी. (१७६)

मधल्या रेघेवर दुसऱ्या (आडव्या) रेघेने केलेल्या मधल्या विभागात (मूर्तीचे) मस्तक असते. मान व छाती ते खाली नाभीपर्यंतचा भाग हा मध्यबिंदूच्या अवतीभवती असावा. (१७७)

डावे आणि उजवे हात दुसऱ्या विभागात असावेत. (त्यातील) आणि पुढचे हात वरच्या विभागात उभे असून ते छेदबिंदूपर्यंत गेलेले असतात. (१७८)

[छेदबिंदू — कर्ण उभ्या व आडव्या रेघांना जेथे छेदतात ते बिंदू]

या बिंदूच्या जवळच्या भागी सुंदर कमळ असून त्यांच्यावर दोन हत्ती कोरावेत. त्यांच्या सोंडा (लक्ष्मीच्या) मस्तकाच्या वरपर्यंत आलेल्या असून त्या वरच्या (आडव्या) रेघेला समांतर असतात. (१७९)

तिसऱ्या (आडव्या) रेघेपासून सुरुवात करून परत चवथ्या (आडव्या) रेषेला स्पर्श करील असे वर्तुळाकृती (?) खालचे दोन हात अभय व वरद मुद्रेत असतात. (१८०)

पुढचे हात समोरच्या बाजूला असून भक्तांना अभय देणारे असतात. जेव्हा एक पाय जमिनीला स्पर्श करीत असतो तेव्हा तिला ' भूदेवी ' म्हणतात. (१८१)

मध्यबिंदूपासून सुरुवात करून, दोन आसन (दोन दुमडलेले पाय) हे दोन कर्णांवर पसरलेले असतात. पायांचे घोटे, त्यांच्या बाजू पहिल्या आडव्या रेघेवर येतील, असे कोरतात. (१८२)

पायांच्या जंघेची खालची रेघ, तिसरा बिंदू, (व) मध्यभागील त्रिकोणाचा मध्य भाग येथे उत्कृष्ट वस्त्र दाखवावे. (१८३)

सगळ्यात खालच्या भागी सोळा किंवा दहा पाकळ्यांचे (पद्मासन) असावे. यास महायंत्र म्हणतात. राजाच्या (कोणत्याही) उपक्रमासाठी ते उत्तम असते. (१८४)

किंवा शिल्पशास्त्राला अनुसरून तोरणलक्ष्मी कोरावी. तसेच याहून वेगळ्या आकाराची (लक्ष्मीची) मूर्ती (जशी ध्यान श्लोकांत दिलेली असेल त्याप्रमाणे) कोरावी. (१८५)

शुभलक्ष्मीची मूर्ती चौरस जागेवर करतात. (त्यासाठी ती चौरस जागा) उभ्या व आडव्या पाच रेघांनी (सहा भागांत) विभागतात. (१८६)

डाव्या व उजव्या कोपऱ्यांपासून दोन रेघा (म्हणजे कर्ण) काळजीपूर्वक रेखाव्यात; नंतर विशेषाने वरच्या भागी दोन सारखे कोपरे करावेत. (१८७)

[आकृती ७ मध्ये दाखविल्याप्रमाणे कोपऱ्यातील लहान चार चौरसांचे उरलेले कर्ण आखावेत असा या श्लोकाच्या दुसऱ्या चरणाचा अर्थ असावा.]

रेघांचे मध्यबिंदू वर व खाली योजावेत (की ज्यामुळे) नंतर मध्यभागी एक मोठा चौरस त्याच्या कोपऱ्यावर (कोणपीठ, कोणवर्ग) उभा असलेला मिळेल. (१८८)

[या श्लोकाचा अर्थ स्पष्ट नाही.]

मध्यबिंदूला स्पर्श करील अशी छातीची योजना उत्तम असते. मूर्तीच्या मस्तकाचा भाग वरच्या बाजूला मध्यभागी असावा. (१८९)

नाभि व योनि मुख्यतः (खालून) तिसऱ्या विभागात असावी. मध्यरेषेपासून सुरुवात करून गुडघे डाव्या व उजव्या बाजूंकडे गेलेले असावेत. (१९०)

डावा पाय खालच्या भागात विभाग पाडणाऱ्या (आडव्या) रेघेवर असावा व उजवा पाय (सर्वांत) खालच्या (आडव्या) रेघेच्या मध्यभागी असावा. (१९१)

डावा व उजवा हात मोठ्या (आडव्या) मध्यभागील रेघेवर असावेत व तिसऱ्या बिंदूजवळ तळहात समोर येतील असे दाखवावेत. (१९२)

बुद्धीमान शिल्पीने वर मस्तकाच्या (दोन्ही) बाजूंना कमळ कोरावे व खालच्या बाजूला गजराजाने सुंदर दिसणारे असे दिव्य आसन करावे. (१९३)

शुभदायक अशा शुभलक्ष्मीच्या (मूर्तीच्या) यंत्राची माहिती सांगितली.

**तोरणबन्ध** (छायाचित्र ७)

वत्सा, दाराच्या चौकटीवरील विशेषतः नक्षीची माहिती सांगतो, ती ऐक. (१९४)

(निरनिराळे) नक्षींचे बंध (तसेच) मूर्तीचे प्रकार यांची माहिती संक्षेपाने मी सांगतो. (चौकटीच्या) पहिल्या पट्टीवर दोन किंवा जास्त नाग असतात. (१९५)

प्रथम दोन रेखा असून दुसरी उत्तम खान्दि असावी. (या दोघांच्या मध्ये) सापांच्या दोन रेघा असून त्या नागांच्या जोडीने भूषविलेल्या असतात. (१९६)

[नागांची ही जोडी एकमेकांत गुंफलेली असते.]

वरीलप्रमाणेच (चौकटीची) तिसरी पट्टी मनुष्यांच्या गटांच्या नक्षीने भूषवावी. नंतर (चौथ्या पट्टीवर) वेलींच्या कांडांसह वेलींच्या आकारात खेळणाऱ्या स्त्रियांच्या (गेलव नारी) मूर्तींची नक्षी असावी. (१९७)

उत्तम प्रकारची खेळकर स्त्री, (गेलव नारी) डाव्या हाताने वेलीचा कांड धरलेला, उजवा हात छातीवर व (एक) पाय अर्ध्या कुंभाच्या आकाराचा (पाय वर उचलून लतेला लपेटलेला असा) अशी असते. (१९८)

काही शिल्पी मध्यभागी राम, कृष्ण व इतर (देवता मूर्ती) कोरतात. त्यांच्या बाजूला रंगिणीच्या फुलांची सुंदर नक्षी दोन बलिंच्या मध्ये असते. (१९९)

शिल्पीश्रेष्ठाने, चौथी पट्टी, तेथील बलिच्या अर्ध्या भागापर्यंत सुंदर दिसणाऱ्या जलपत्रांनी अलंकारावी. (२००)

[जलपत्र = कमळाची पाने]

अर्धचन्द्राच्या आकाराच्या पीठावर लहान उभ्या दोन रेघा आखून त्यांच्यामध्ये दाखविण्यात येणारी पाने सारख्या अंतरावर कोरावीत. (२०१)

त्यांच्या बाजूला, बाहेरच्या कडेला कमळांच्या फुलांची (ओळ) कोरावी. ही तोरणाच्या सर्वोत्कृष्ट अलंकरणाची माहिती झाली. (२०२)

**मुखशालेची समोरची भिंत** (छायाचित्र ८ व ९ अ)

मुखशालेच्या पुढच्या बाजूला ज्या निरनिराळ्या रेखा असतात त्या रेखांचे प्रकार, तसेच तिचे विभाग (छेद), वेलींची नक्षी (वसन्त) व कंगणी (फेणी) इत्यादींची माहिती ऐक. (२०३)

प्रथम (शिल्प-) शास्त्राला अनुसरून मनोहर दिसणारे पीठ करावे. शिष्या, त्याच्यावरती जे विभाग (भेद) असतात त्यांची माहिती निःशंकपणे ऐक. (२०४)

तोरणाची जाडी ही (मुखशालेच्या पुढच्या भागाच्या) एक-अष्टमांश असावी. त्यातील मधल्या चार भागांइतकी दरवाजाची रुंदी (जाडी ?) असावी.

[भिंतीची जाडी = $^{1}/_{८}$ मुखशालेची रुंदी.]

याला तोरणबन्ध किंवा ' अलसा - चय ' असे नाव आहे. त्या भिंतीच्या आतल्या (पृष्ठभागावर) कोठलीही मूर्ती अथवा निरनिराळ्या वेलींची नक्षी खोदू नये. (२०६)

त्यानंतर मूल (मुख्य-)मंडपाच्या पुढच्या भागाच्या (दरवाज्याच्या पलीकडील दोन्ही बाजूंच्या) रुंदीचे (प्रत्येकी) सोळा भाग पाडावेत. (२०७)

(अलसा-चयाच्या पुढ्यातील) स्तंभाच्या बाजूला एक भाग (रुंदीची) खांदि असावी. त्यानंतर पुढच्या भागाच्या भिंतीची दोन्ही बाजूंना सारखीच सुरुवात करावी. (२०८)

**पीठाची माहिती** (छायाचित्र ८ इ)

भिंत बांधावयास सुरुवात करण्यापूर्वी कोणत्या प्रकारचे पीठ सुंदर दिसेल ते ठरवावे. श्रेष्ठ पीठाचे पाच प्रकार आहेत. कणि, वीथी व कुंभिका, (२०९)

सिंहपीठ व कूर्म (पीठ). ते शिल्पशास्त्रास अनुसरून आहेत. त्यांच्यामध्ये कूर्मपीठ तीन थरांनी होते. (२१०)

(सर्वांत) खालचा थर जसा आहे तसाच (सर्वांत) वरचा थर ठेवावा. मधला थर, बुद्धीमान शिल्पीने, कासवाच्या पाठीच्या आकाराप्रमाणे करावा. (२११)

गौण प्रकारच्या इतर पीठांची माहिती सांगतो. बाजूंचे (खालचा आणि वरचा) थर हे सिंहासनाला असतात त्याप्रमाणे असावेत. मधला थर भिंतीसारखा असावा. (२१२)

' रेखा ' देवालय किंवा ' रथ ' देवालय यांच्याकरीता असे सिंहपीठ सांगितले जाते. दोन्ही बाजूंचे (खालचा आणि वरचा) थर हे दोन थरांत असून त्यांच्या मध्ये कुंभाच्या आकाराचा थर असतो. (२१३)

असे कुंभाच्या आकाराचे पीठ असून ते प्रासादास (देवालय अथवा राजवाडा) यांना शोभून दिसते. ज्यावरती नक्षीकाम केलेले नसते आणि ज्याला पायाभूत थर नसून जे सरळ जमिनीवर आधारलेले असते. (२१४)

जे केवळ मजबूत पाया (सारखे) असते त्याला वीथीपीठ म्हणतात. कणिकाकार पीठ कुंभपीठासारखे असून तेथे (कुंभाच्या जागी) कणिकेसह असते. (२१५)

वरती व खाली ते कासवाप्रमाणे (कूर्मपीठाप्रमाणे) असून मध्यभागी सुंदर दिसणारी कणी असते. या सर्व पीठांमध्ये वीथी व सिंहपीठ ही प्रमुख आहेत. (२१६)

किंवा कूर्म (पीठ) हे (सर्वांत) श्रेष्ठ असून इतर पीठांची जरुरीच (मातब्बरीच) काय? शिल्पांगाच्या मताप्रमाणे, पीठ (मुखशालेच्या) चारही बाजूंना असावे. (२१७)

खालच्या थराच्या दुप्पट उंचीचा कूर्मथर असतो व कूर्माच्या वरच्या थराची उंची त्याच्या निम्मे असावी, असे खूप मजबूत पीठ चारी बाजूंना बांधावे. (२१८)

पीठाशिवाय (प्रासाद बांधल्यास) प्रासादाची फार मोठी हानी होते. शेवटी तोरणाच्या पुढच्या बाजूस दोन गोल पायऱ्या (वृत्तद्वय) कराव्यात. (२१९)

या पायऱ्या अर्धचंद्राच्या आकाराच्या असून त्यांची उंची सारखीच असावी. तोरणाच्या दोन्ही बाजूंना सुंदर दिसणारी खान्दि असावी. (२२०)

(यानंतर) शेवटी, शोभादायक दिसणाऱ्या नागस्तंभांची (दरवाज्याच्या दोन्ही बाजूंना) स्थापना करावी. भिंतीच्या उंचीइतकी या खांबांची उंची असून ते तोरणाच्या (रुंदीच्या) एक-चतुर्थांश (रुंदीचे) असतात. (२२१)

**खांबाची मााहिती** (छायाचित्र ९ व आकृती ८)

**आकृती ८—कुंभस्तंभ**
१.२२३

वत्सा, खांब बांधावयाची पद्धत मी सांगतो, ती ऐक. खांब दोन प्रकारचे सांगतात, नागांनी भूषविलेला व कुंभांनी भूषविलेला. (२२२)

त्यांच्या (त्या दोघां-)मध्ये नागांनी अलंकारिलेले स्तंभ श्रेष्ठ व कुंभांनी भूषविलेला स्तंभ गौण प्रकारचा समजतात. (कुंभ-स्तम्भात) वरच्या बाजूला कुंभ असतो तसाच खालच्या बाजूला असतो व मध्यभागी सुंदर खांब (खांबाचा दण्ड) असतो. (२२३)

कुंभाच्या मध्यभागी नेहमीच कळ्या व इतर यांच्यासह सुंदर वेलबुट्टी असते. वास्तूच्या अवयवाचे सौंदर्य वाढविणारा नागस्तंभ नेहमीच श्रेष्ठ असतो. (२२४)

नागनायिका धनं, धान्य व सौभाग्य हे देणारी असते. कुंभाच्या (कुंभस्तंभाच्या) उंचीचे आडवे चार भाग करावेत. (२२५)

दोन भाग खांबाचा दण्ड असून (प्रत्येकी) एक भाग पाय (पाद) व मस्तक (शीर्ष) असते. कुंभाच्या जागेचे (उंचीत) पाच आडवे विभाग करावेत, सर्वांत खाली पाद थर करावा. (२२६)

पहिल्या थराच्या वर कुंभ-थर दोन भाग (उंचीचा) असतो. खालच्या अर्ध्या भागात कंबर (कटि = अरुंद भाग) असून वरच्या (अर्ध्या) भागात वेलबुट्टी असते. (२२७)

{खांबाचा दण्ड दोन भाग असून, पादापासून वरपर्यंत तो भींतीवर असतो. पादभागात शुद्ध पंच कर्म करावे. (२२६)

प्रथम पाद, नंतर दोन भाग कुंभ, त्याच्या शेवटास वेल, त्याच्यावर मण्यांची माळ, आलम्ब (लोंबत्या मोत्यांच्या माळा) वगैरे हे यथायोग्य नियमांप्रमाणे करावे. (२२७)}

ही पाद तसेच कुंभाची माहिती झाली. पट्टाच्या (डोरीच्या) मध्यभागी वेलबुट्टी असते. वरच्या भागात जशी इच्छा असेल त्याप्रमाणे रेघा प्रयत्नाने रेखाव्यात. (२२८)

मध्यभागी लहानशा आकाराची फुलांनी शोभायमान दिसणारी नागर प्रकारच्या स्त्रीची मूर्ती असते. खालच्या पट्टीवर लता कोरलेली असते. नाग प्रकारच्या खांबांचे विभाग वर सांगितल्याप्रमाणे (कुंभ प्रकारच्या खांबाप्रमाणे) असतात. (२२९)

**नागस्तंभ**

खांबाच्या (सर्वांत) वरच्या भागावर आलम्ब असतो तो (मोत्यांच्या) तीन माळांनी भूषविलेला असतो. आलम्बाच्या खाली असलेल्या भागात अर्धचन्द्राप्रमाणे असलेला सर्प (सर्पाची फणा) असतो. (२३०)

सर्पाच्या या फणा सात किंवा पाच असतात. मध्यभागी असलेल्या फणेच्या (दोन्ही) बाजूंना इतर फणा असतात. (२३१)

{मधली फणा काहीशी मोठी व बाजूंना असलेल्या फणा लहान असतात. (२३१)}

त्याच्या खाली अर्धा नाग व अर्धा मनुष्य अशी अनन्ताची {मध्यभागी महान शेष अनन्त याची} मूर्ती असते. (त्याच्या हातांत) दिव्य नांगर व मुसळ (धारण केलेले) असतात किंवा (दोन्ही हात) नमस्काराच्या मुद्रेत (बद्ध अंजलिः) असतात. (२३२)

नागाच्या शरीराच्या खाली दोन किंवा तीन वेढे दाखवितात, मात्र नागाच्या शेपटीचा वेढा निश्चितपणे (खांबाच्या) पुढच्या भागी आलेला असतो. (२३३)

**कोणकाची माहिती** (छायाचित्र १० अ)

तिच्या (मुखशालेच्या) शेवटाला पुढे तसेच बाजूला (चारी कोपऱ्यांच्या जागी) कोणकाचे स्थान असते. तू कोणकाच्या जागी असलेले विभाग, प्रकार तसेच लक्षणे ऐक. (२३४)



एन ४१३३-४

(कोणकाच्या) भिंतीचा भाग हा भिंतीप्रमाणे असून त्याचे (उंचीचे) प्रामुख्याने दोन भाग होतात. (अर्ध्या उंचीपर्यंत) बंधनाच्या (थरा-) पर्यंत जंघा (भिंत) असते. (२३५)

खालच्या बाजूला मनोहर व बारीक नक्षी (इत्यादीं) सह पंचकर्म करावे. वरील भिंतीचा भाग जंघेप्रमाणे करावा. (२३६)

कोणकाच्या खालच्या बाजूला असलेल्या पंचकर्माच्या थरविभागाचा अनुक्रम असा : सगळ्यात खाली एक भाग खुर, (नंतर) कुंभ व त्यावर पट्टीची जागा असते. (२३७)

कुंभाच्या (घटाच्या) वर असलेली जागा खूप अंतर्गमन असल्याने (निम्नगा) (बारीक) कमरेप्रमाणे असलेल्या डमरूसारखी असते. त्याच्यावरील भाग बाहेरच्या बाजूस निर्गमित झालेला असून त्यावर सुंदर पट्टी असते. (२३८)

पट्टीच्या मध्यभागी लांबीवर मनोहर वेलीची नक्षी असते. पट्टीच्या खालच्या भागी चाफ्याचे सुंदर पान असावे. (२३९)

चाफ्याचे पान (पट्टीच्या) खालच्या बाजूला व विशेषतः कुंभाच्या मध्यभागी असते. पट्टीच्या वर पुन्हा कणिकेच्या आकाराची डमरू-भूमी असते. (२४०)

या (कणिकेच्या) जागी समान भागांचा कोणाकार असून त्याच्या पाच भागांपैकी एका भागात फणसाच्या काट्याची नक्षी करावी. (२४१)

[कणिका थराचे तीन सारखे भाग करून त्यात कणिकेचा पुढे आलेला भाग एक भागाचा असतो या पुढे आलेल्या भागाच्या उंचीचे आडवे पाच भाग करून त्यातील मधल्या एका भागावर फणसाच्या काट्यांची नक्षी असते.]

खोल भागांच्या वर व कणिकेवर (उभ्या) दोन रेघा रेखाव्यात आणि त्यांच्यामध्ये अनेक प्रकारच्या नक्षींनी वसन्त रेखा भूषवावी. (२४२)

(कोणकाच्या जंघा भागाच्या) वरच्या (पंचकर्माच्या वरच्या) भागाच्या अर्ध्या (उंचीचे) चार समभाग करावेत व रुंदीचे तीन किंवा पाच समभाग करावेत. (२४३)

वरच्या अर्ध्या भागातील (रुंदीच्या) मध्यभागाने परिमित झालेल्या भागी एका खालोखाल एक पंचकर्माचे थर विभाग करतात. (२४४)

[कोणकाच्या पायथ्यापाशी प्रथम पंचकर्म केले. त्यानंतर कोणकाच्या उंचीच्या खालच्या एक-चतुर्थांश भागात, कोणकाच्या रुंदीच्या मध्यभागील एक-तृतीयांश भागात, तितक्या रुंदीचे पुन्हा पंचकर्म खोदतात. छायाचित्र **१० अ** पहा.]

कोणकाच्या निर्मितीतील कौशल्याची व त्याच्या निरनिराळ्या विभागांच्या स्वरूपाची अशी माहिती दिली. खुराच्या जागी वज्रशीर्षात (अलसा-) नायिका तसेच नन्दिका असते. (२४५)

आता (कोणकाच्या) भिंतीच्या भागाची माहिती ऐक. तिच्या मध्यभागी वेलींची नक्षी असते. त्याच्या इतर (म्हणजे बाजूंच्या) भागी रेघा व फुले खोदलेली असतात. (२४६)

भिंतीच्या पायापासून तिच्या शेवटापर्यंत करावयाची कामे सांगितली. कोणकांचे प्रकार व त्यांच्यावरील सुंदर नक्षींचे भेदही सांगितले. (२४७)

**अनर्थ खांबाची माहिती** (छायाचित्र १० अ)

भिंतीच्या आकाराप्रमाणे, तिच्या उंचीइतका, त्याच्या शिखरापर्यंत असलेल्या अनर्थ पागाची माहिती सांगतो ती ऐक. (२४८)

[अनर्थ खांबाच्या वरच्या बाजूला लहान शिखराकृती कोरलेल्या असतात, त्या शिखरांचा उल्लेख येथे आला आहे.]

अनर्थ पागाच्या लांबीचे तीन व रुंदीचे चार (समान) भाग करावेत. (लांबीच्या) मध्यभागी जेव्हढा कोनाड्याचा भाग (निशाभाग) असेल तेव्हढे बुद्धीमान शिल्पीने तीन भाग करावेत. (२४९)

[अनर्थ पागाच्या लांबीच्या एक-तृतीयांश लांबीचा (उंचीचा) कोनाडा करावा.]

वरती शिखर भाग असून त्याच्या खाली मध्यभागी (कोनाड्याचा) मोकळा भाग (गव्हर) असतो. खाली व बाजूंना रेघा असलेले असे हे सुंदर घर (कोनाडा) करावे. (२५०)

(सर्वांत) खालच्या भागी (रुंदीच्या) तीन भागांत पंचकर्म काळजीपूर्वक करावे. जंघेच्या (रुंदीच्या) एका भागाची निशा (मोकळा कोनाडा) असते, (व त्याच्या दोन्ही बाजूंना उरलेल्या दोन भागांचे) दोन खांब असून त्यांच्यावर वेलींची नक्षी असते. (२५१)

(कोनाड्याच्या) वरती त्याचप्रमाणे वेली असलेली पट्टी खोदावी. त्याच्यावरती शिखराचा भाग असून तो नेहमी डमरू-भूमीच्या आकाराचा असतो. (२५२)

[शिखराचा भाग अनर्थ खांबाच्या वरपर्यंत गेलेला असतो.]

त्याच्यावरती पट्टीच्या स्वरूपात वसन्त व वल्लभी कोरलेले असतात. वसंताच्या विभागा इतक्याच विभागाने वरती शिखराची योजना करावी. (२५३)

[वसन्त = पाने, फुले यांचे नक्षीकाम. वल्लभी = वेलबुट्टीची नक्षी.]

तेथे वरच्या बाजूला वळलेल्या कमळाच्या पाकळ्या खोदाव्यात. त्याच्यावर वसन्त इत्यादी कोरलेली व समान विभागाची सुंदर पट्टी खोदावी. (२५४)

त्याच्यावरती भिंतीच्या भागावर वज्रमस्तक कोरावे. मध्यभागी जेथे कोनाडा (निशागृह) आहे तेथे मूर्ती वगैरेंची स्थापना करावी. (२५५)

हे (अनर्थ -) बंधाचे निरनिराळे विभाग आहेत. (आता) अत्यंत गुप्त माहिती ऐक. दिक्पाल किंवा महाविद्या-बन्ध या नावाने ती (माहिती) सांगितली जाते. (२५६)

**आवरण देवता** (छायाचित्र **१० आ**)

विष्णूच्या मंदिरात इन्द्र इत्यादी दिक्पाल (या कोनाड्यात) असतात. शिवमंदिरात भैरव मूर्ती असावी व चंडीच्या घरात भैरवी असते. (२५७)

आता प्रामुख्याने शक्तीच्या घरासाठी उत्कृष्ट अशी महाविद्या इत्यादींची यंत्रे व त्यांच्या अनुसार मूर्तींची माहिती सांगतो. (२५८)

देशाच्या भेदाप्रमाणे व (त्या त्या) देशाच्या आवडीप्रमाणे (प्रचलीत शास्त्राप्रमाणे) अनर्थातील सुंदर अशा कोष्ठात (कोनाड्यात) महाविद्या, गौरी इत्यादी (किंवा) दहा मातृका यांची स्थापना करावी. (२५९)

आता हे महायंत्र व त्यानुसार मूर्ती तयार करण्याची पद्धती, हे चाणाक्ष (शिष्या) ऐक. या एकाच यंत्राच्या विभागांनी (सर्व प्रकारच्या) मूर्ती कराव्यात. (२६०)

**शक्तियंत्र** (छायाचित्र **१० आ, इ, ई** व आकृती **९**)

**आकृती ९—शक्ति यंत्र**
१.२६१–२६८

तेथील तयार केलेल्या निशागृहाच्या मापाची शिला घेऊन तिच्यावर निरनिराळ्या शक्तींच्या मूर्तीसाठी हे महायंत्र सांगितलेल्या पद्धतीने आखावे. (२६१)

या यंत्राच्या सहाय्याने कात्यायनी, शूली, उग्रा, चण्डा, विभीषिणी या नांवाच्या (व) भयंकर नवदुर्गा कराव्यात. (२६२)

चौरस किंवा आयत जशी (कोष्ठात) जागा असेल त्याप्रमाणे आखून त्याचे {रुंदी व लांबीचे तीन (तीन) रेघांनी (चार, चार) विभाग करावेत.} (२६३)

उंची आणि रुंदी यांच्यात अशा रेघा आखाव्यात की सारख्या (रुंदीचे व लांबीचे) भाग होतील. शेवटले चारी कोपरे विभागणाऱ्या रेघा (कर्ण) आखाव्यात. (२६४)

त्यामुळे छेदबिंदू तसेच मध्यभागील मध्यबिंदू हे जोडले जातात. मध्यभागील लांबीची रेघ ही दुसऱ्या आडव्या रेघेला स्पर्श करणारी असते. (?) (२६५)

प्रत्येक रेघेपाशी दोन-दोन रेघांनी पुन्हा विभाग पाडावेत. डाव्या व उजव्या तसेच खालच्या व वरच्या कोपऱ्यांना विभागणाऱ्या रेघा (कर्ण) आखावेत. (२६६)

[श्लोक २६५ व २६६ चा एकूण अर्थ असा की चौरसाचे किंवा आयताचे कर्ण काढावेत व तसेच प्रत्येक लहान विभागांचेही दोन्ही कर्ण आखावेत.]

या सर्व रेघा आखून वेगळे वेगळे विभाग केल्यानंतर खालच्या (वरच्या, हस्तलिखित १ प्रमाणे) छेदबिंदूपासून आडव्या मध्य रेघेपर्यंत, (२६७)

या वरच्या निम्म्या भागांत दोन्ही कडेच्या रेषांना स्पर्श करील असे अर्धवर्तुळ आखावे. खालच्या आणि वरच्या भागी चार त्रिकोण असतात. (२६८)

निम्म्या त्रिकोणांच्या मध्यभागी दहा मातृगण असून त्यांच्यावरती मध्यभागी अर्धवर्तुळाकृती निम्मे तोरण असते. (२६९)

वरच्या त्रिकोणांतील मध्यभागी अलंकारिलेले मस्तक असते. दुसऱ्या बिंदूपर्यंत गळ्याचा भाग भूषवावा, (२७०)

व तिसऱ्या मध्य बिंदूपाशी नाभीचे स्थान सांगतात. तेथून खालच्या बाजूला नेहमी पायांची स्थापना करावी. (२७१)

त्या (यंत्राच्या) अनुसाराने मूर्तीचे अनेक हात खाली तिसऱ्या आडव्या रेघेपर्यंत व दोन उभ्या रेघांच्या मध्ये करावेत. (२७२)

विद्वान शिल्पीने चार हातांची, क्वचित् दहा हात असलेली, दोन हातांची किंवा (कधी कधी) आठ हातांची मूर्ती करावी. (२७३)

(मधल्या दोन आयताकार विभागांमध्ये असलेले) वरचे हात छाती व खांदे यांच्या रेषेत असावेत; पुढचे हात व तळवे वरती असलेल्या वर्तुळाकृती रेघेला स्पर्श करणारे असावेत. (२७४)

जसे ध्यान (–श्लोक) असेल तशीच मूर्ती, जशी शास्त्राला सम्मत व शास्त्रात सांगितली असेल तशी करावी. (नाहीतर) मूर्ती दोषपूर्ण होऊन ती नाशदायक व विघ्नकर्ती होते. (२७५)

आता मी (मूर्तीच्या) खालच्या भागाची माहिती सांगतो ती ऐक. आसने निरनिराळ्या प्रकारची असून ती रेघांना अनुसरून करावीत. (२७६)

पायांचे भाग रेघांशिवाय (रेघांना न अनुसरून) कदापीही करू नयेत. असे हे यंत्राचे विभाग असून (त्याच्या सहाय्याने) निरनिराळ्या प्रकारच्या गौरी आणि इतर (देवींच्या मूर्ती) कराव्यात. (२७७)

**उभ्या मूर्ती**

काठीप्रमाणे (ताठ) उभ्या मूर्तीच्या पायांची ठेवण कशी असावी ते ऐक. एक पाय लांबीत सरळ (-सोट) असून दुसरा कांहींसा तिरपा असतो. (२७८)

नियमांप्रमाणे, एक पाय मध्यभागी ठेवावा व दुसरा पाय वाकलेला व निरनिराळ्या भागांमध्ये (वाकांमध्ये) असावा. (२७९)

(बसलेल्या) मूर्तीचे दोन्ही पाय (आडव्या) रेघांना जास्तीत जास्त अनुसरून असावेत. मूर्तीच्या आसनापर्यंत सुंदर कमळ कोरावे. (२८०)

बसलेल्या स्वरूपाच्या मूर्तीसाठी मनोहर पीठ करावे. देवता ज्या स्वरूपाची असेल (ते दाखविणारे) वाहन खाली दाखवावे. (२८१)

[गौरीसाठी बैल, कुमारीसाठी मोर इत्यादी वाहन दाखवावे.]

वाहनाच्या स्वरूपाची मूर्ती मध्यरेषेवर असावी. (डोक्यावरील) किरीट, (कानांतील) कुंडले (व गळ्यातील) हार हे सुंदर व मनोहर असावेत. (२८२)

(मूर्तीवरील) वस्त्रे व दागिने ही प्रफुल्ल दिसतील अशी छिन्नीने कोरावीत. प्रासादाला अनुरूप होईल अशी ही मूर्ती करावी. { ही मूर्ती वेलींनी व इतर नक्षींनी सजवावी. } (२८३)

**वेलबुट्टीच्या नक्षींचे (वल्लभींचे) निरनिराळे प्रकार** (छायाचित्र १४ व १५)

फुले असलेल्या वेलींच्या महान वल्लभी इत्यादी, तसेच वल्लभींचे प्रकार, त्यांचे निरनिराळे आकार व त्यामधील अंतर (यांची माहिती) ऐक. (२८४)

या नक्षी कोणत्या स्वरूपाच्या यंत्राच्या सहाय्याने केल्या असता सुखाने (कष्ट न पडता) कोरता येतात (यांची माहिती ऐक). कुंचिता, लता, हंसा, वर्त्तुला तसेच आगमा, (२८५)

रतिकेरा, सगुम्फा व कुटिला, समभागिका, पल्लवा, कलियुक्ता व मेघा असे ११ (नक्षींचे प्रकार) सांगितले आहेत. (२८६)

अनुक्रमाने एकेक (प्रकारासाठी) लागणाऱ्या यंत्राची, वेगळ्या वेगळ्या आकृतींनी, आखणीची (माहिती) सांगतो. शिल्पीने (त्या नक्षी त्या त्या) यंत्राला अनुसरून कोराव्यात. (२८७)

**कुञ्चिता**

आता वेलींचे प्रकार, त्यांचे वैशिष्ट्य, रेघा तसेच सपाट जागेवर दंडाप्रमाणे उभ्या किंवा (आडव्या) पट्टीवर ही नक्षी काढावयाची (माहिती) ऐक. (२८८)

ज्या जागेवर वेल कोरावयाची तेथे ती तिरपी (वर चढती किंवा खाली उतरती) असू नये. (यासाठी) प्रथम शिलेच्या मध्यभागावर तिच्या लांबीवर रेघ (सममिती अक्ष रेघ) आखावी. (२८९)

लांबीवर तसेच रुंदीवर (सारख्या अंतरावर) रेघा आखाव्यात व त्यानंतर पाने कोरावीत. पाने नेहमी जोडीने असून त्यांचे देठ वक्राकार असावेत. (२९०)

कुञ्चिता प्रकारच्या वेलबुट्टीच्या नक्षींचे प्रकार पहाणाऱ्यास आनंद देणारे असतात. प्रत्येक पानाच्या पुढच्या भागापाशी देठ असतो व त्यावरील अर्ध्या भागात पाने असतात. (२९१)

(प्रासादाच्या) भिंतीच्या अवयवावर कुञ्चिता लता ही सर्वोत्कृष्ट (नक्षी) असते. उत्कृष्ट, सुंदर व वसंत (भागी) असणारी ' हंसलता ' ऐक. (२९२)

**हंसा**

कठीण व सूक्ष्म कणांनी बनलेल्या दगडावर हंसाची आकृती कोरावी. सुंदर हंस नेहमीच पानाच्या आकाराप्रमाणे शेपटी असलेला कोरावा. (२९३)

आयताकार चौकटीत हंसाचे शरीर पुढच्या बाजूस असून पानांचे अलंकरण असलेला भाग (मागे) असावा. यास हंस असे म्हणतात. (२९४)

दोन्ही पंख व पाठीमागील बाजू डोक्याच्या (वरच्या) बाजूला जाणारे असे वक्राकार असतात. ते वेलीच्या पानांच्या आकाराचे असून (हंसाच्या) डोक्याच्या तसेच मानेच्या वर जातील असे असावेत. (२९५)

**वर्तुला**

नियमानुसार खोदलेल्या वर्तुला (नक्षीची) लक्षणे ऐक. चौरसाकृती जागेवर वर्तुळाकृती देठ खोदावेत. (२९६)

देठ वर्तुळाकृती रेघांना अनुसरून काढावेत व मध्यभागी पाने असावीत. प्रत्येक कोपऱ्यापाशी कळीच्या स्वरूपाच्या रेघा खोदाव्यात. (२९७)

ही वर्तुळाकार उत्कृष्ट व शोभादायक वेलबुट्टी नेहमीच श्रेष्ठ असते. लांबट जागेसाठी ती उत्कृष्ट असून जंघेच्या मनोहर अलंकरणार्थ (योग्य) असते. (२९८)

**आगमा**

प्रथम जागा सारख्या चौरसाकृतींमध्ये आखावी. एका (चौरसात) वर्तुळ, दुसऱ्यात (वरच्या किंवा शेजारच्या) त्याच जागे इतका चौरस (असे एकावर एक किंवा शेजारी एक) नियमाप्रमाणे कोरावे. (२९९)

नुकत्याच अंकुरलेल्या पानांप्रमाणे, मोहरीच्या पानांप्रमाणे, वरच्या जागेत पाने असावीत. आगमा (प्रकारची नक्षी) जांघेला भूषविण्यासाठी (योग्य असते). (३००)

**रतिकेरा**

वरच्या बाजूस शिखराकडे जाणाऱ्या, आयताकार जागेच्या मध्यापाशी, प्रत्येक मजल्याच्या तळापाशी (प्रत्येक आडव्या रेघेपाशी) दोन (लहान) वर्तुळे कोरावीत. (३०१)

[प्रत्येक आडव्या रेघेच्या डाव्या बाजूस खाली व उजव्या बाजूस वरती वर्तुळे कोरावीत.]

लंब आयताकार (लांबी रुंदीच्या १ $^1/_2$ पटी पेक्षा जास्त) जागेवर, नियमाप्रमाणे, प्रथम वर्तुळाकार आकार देऊन नंतर वक्राकार तळाच्या (पीठाच्या) बाजूला, खालच्या बाजूला आणावा, वरच्या बाजूला जाणारे वक्राकार वाढत जातात. (३०२)

लांबट आकाराची दोन पाने या वर्तुळाला स्पर्श करणारी असतात, जागेच्या खालच्या भागाकडे वळलेल्या या पानांची टोके (अग्र) आतमध्ये वळलेली (अशी वक्राकार) असतात. (३०३)

[ही पाने खालच्या बाजूला आकुंचित होणारी व वरच्या बाजूला मोठी होत जाणारी असतात.]

(ही वक्राकार पाने) तीन किंवा पाच रेघांमध्ये पाचदा विभागलेली असतात. रतिकेरा प्रकारची वेलबुट्टी जंघेसाठी किंवा भिंतीच्या अलंकरणार्थ श्रेष्ठ समजतात. (३०४)

**गुम्फना** (किंवा सगुंफा).

(दिलेल्या लांबट जागेचे) सारख्या (पानांनी केलेल्या) वर्तुळाकृतींनी भाग पाडून त्यांच्या मध्ये गुंफे प्रमाणे खोलवा असतो. त्या गुंफेच्या जागी वानरी, डुकरीण तसेच वाघ, सिंह, हत्ती व इतर पशु, पक्षी, हरीण इत्यादी निपुण शिल्पीने कोरावेत. (हे प्राणी किंवा पक्षी) गुंफेतून बाहेर जणू काही उडी घेत आहेत असे दाखवावेत. (३०५, ३०६)

असा हा (वेलबुट्टीचा) सगुंफा नावाचा प्रकार असून ती (नक्षी) कळ्या व पाने यांनी सुशोभित करावी.

**कुटिला**

आयताकार असलेल्या जागी रुंदीकडून ती अधिक आयताकार (लंब आयताकार) करावी. (३०७)

[रुंदीचे लांबीने विभाग पाडून अधिक लांबट आयताकार करावेत.]

कुंभाच्या जागी (लतेचे) देठ लांबीच्या दृष्टीने गुंडाळल्यासारखे {सापाच्या मार्गाच्या आकृतीप्रमाणे} वक्राकार दाखवावेत. तेव्हा वक्राकार असलेल्या (देठ सदृश) रेघेच्या (दोन्ही बाजूस) मनोहर (पाने) कोरावीत. (३०८)

[देठाच्या दोन्ही बाजूना सुंदर पाने इत्यादी कोरावीत.]

(त्या वक्राकारांच्या) मध्यभागी शोभून दिसतील अशी फुले, कळ्या इत्यादी कोरावीत.

**समभागिका**

कुञ्चिता व वर्तुला प्रकारची नक्षी यांच्या मिश्रणाने (ही नक्षी) केलेली असून ती सारख्या भागात व सारख्या अनुक्रमाने असते. (३०९)

ही समभागिका (वेलबुट्टी) प्रख्यात असून जंघा व भिंतीवर सुंदर दिसते.

**पल्लवा**

अरुंद (आयताकार) जागेचे विंचवाच्या पायाच्या आकाराप्रमाणे (विभाजन) करावे. (३१०)

नवीन पानांच्या आकृती वसन्तपट्टीच्या भागात कोराव्यात. जेव्हा तिला देठ नसतात आणि {पाने एकमेकापासून वेगळी वेगळी कोरलेली असतात} तेव्हा पद्मपीठाच्या आतल्या भागी (उंचीच्या मध्यभागी) (३११)

ही पल्लवा (प्रकारची) वेलबुट्टी शिल्प शास्त्राच्या मताने उत्कृष्ट असते.

**कलिकायुक्ता**

सारखी रुंदी असलेल्या (लांबट आकाराच्या) जागेचे सारख्या चौरसात विभाग करावेत. (३१२)

कळीसह एकाच दिशेकडे वळलेले देठ कोरावेत. जेथे पाने शोभून दिसत नाहीत तेथे पल्लवा (वेलबुट्टीप्रमाणे) कळ्या काढाव्यात. (३१३)

ही मनोरम कलियुक्ता नांवाची (वेलबुट्टी) प्रख्यात आहे.

**मेघा (ढगांप्रमाणे)**

जागेच्या रुंदीवर सारख्या अंतरावर तिरप्या रेघा आखाव्यात. (३१४)

वरच्या बाजूला जाणाऱ्या या रेघा पल्लवाच्या (वेलबुट्टीच्या) आकाराप्रमाणे कराव्यात. मात्र फक्त वरच्या बाजूस ही पाने (पल्लवाः) वळलेली (कुञ्चिता) असतात. (३१५)

त्यांच्या (पल्लवांच्या) टोकाकडील भागात ढगांच्या आकृती कोराव्यात. वसन्तावरती ही (वेलबुट्टी) फार शोभून दिसते. निरनिराळ्या प्रकारच्या अलंकरणाच्या कामासाठी हे वेलबुट्टीचे प्रकार असतात. (३१६)

**फुलांची नक्षी** (छायाचित्र **१६ अ, आ**)

फुलांच्या सुंदर नक्षींचे जे चार प्रकार सांगतात ते ऐक : रंगिणी, चातुकी आणि पंकज (कमळ) तसेच उत्पल (रात्र कमळ). (३१७)

फुलांचे हे चार प्रकार पट्टीचे काम करताना वापरावेत; दरवाजा, तोरण यांच्या मध्यभागी किंवा कोनाड्याच्या जागी ते सुंदर दिसतात. (३१८)

पट्टीप्रमाणे (लांब, निरुंद) असलेल्या जागी, सपाट पृष्ठभागावर (सारख्या विभागाच्या) चौरसाकृतीत चाणाक्ष (शिल्पीने) विधिपूर्वक मनोहर अशी फुलांची रांग कोरावी. (३१९)

**रंगणी**

मध्यभागी कर्णिका असून वर्तुळाच्या आकाराचे केसर दाखवावेत. चारी दिशांना खोदल्यानंतर त्यांच्या शेवटी चार पाकळ्या (दन्त) कोराव्यात. (३२०)

ही फुले रंगिणीच्या फुलाप्रमाणे दिसतील अशी अत्यंत प्रयत्नाने करावीत.

**चातुकी (उघड्या डोळ्यांप्रमाणे)**

पट्टीच्या (लांब व निरुंद) आकाराच्या जागी आयताकार विभाग कोरून (३२१)

या जागेच्या प्रत्येक (बाजूंना) मध्यभागी विभागावे व त्याच्या (आयताकार जागेच्या) मध्यभागी कर्णिका रेखावी. या चौकोनी क्षेत्राच्या कोपऱ्यांपाशी तिरप्या रेघा आखाव्यात. (३२२)

त्या जागी डोळ्याच्या आकाराचे (समभुज) चौकोनी क्षेत्र तयार होते. त्याच्या (चौकोनी क्षेत्राच्या) वर व खाली तीन रेघांनी त्रिकोण मिळतात. (३२३)

सर्व रेघा व प्रत्येक कोपऱ्यापाशी असलेल्या रेघा दोन दोन असतात. अशा प्रकारची चातुकिमाळा असून ती सर्वांना आनंद देणारी असते. (३२४)

**पंकजा** (कमळ)

जागा अरुंद अथवा रुंद असो तिचे समभागातील चौरसांमध्ये विभाग करावेत. मध्यभागी, त्याच्या केन्द्रस्थानी, वर्तुळाच्या आकाराची श्रेष्ठ व सुंदर अशी कर्णिका असावी. (३२५)

कर्णिकेच्या (बाहेरच्या भागाचे पाकळ्यांसाठी) पाच किंवा आठ सारखे भाग पाडावेत, किंवा दहा आणि बारा आरा असाव्यात. याला कमलमाला म्हणतात. (३२६)

पाकळ्या निरनिराळ्या प्रकारच्या करतात. कांहीं वेळेला त्यांच्यात खोलवा असतो. काही शिल्पशास्त्राच्या मताप्रमाणे पुष्कळदा कमळ कोरावे. (३२७)

[बहुधा याचा अर्थ वर पुष्कळ ठिकाणी असा केला आहे. कमळाचे विविध प्रकार असाही बहुधा या शब्दाचा अर्थ होऊ शकेल. इंग्रजी भाषांतरांत कमळाप्रमाणे ही फुले असावी असा जो अर्थ दिला आहे तो योग्य वाटत नाही.]

**उत्पला (रात्र-कमळ)**

पूर्वी सांगितलेल्या आकाराच्या जागेच्या मध्यभागी कर्णिका कोरावी. तिच्या बाहेरच्या भागी सारख्या विभागांना तीन समकेन्द्री वर्तुळे जशी इच्छा असेल त्याप्रमाणे आखावीत. (३२८)

या वर्तुळांच्या मधल्या अंतराच्या जागी लहान लहान मनोरम निरनिराळ्या आकाराच्या व (आतून बाहेरच्या बाजूस) क्रमाने वाढत जाणाऱ्या पाकळ्या कोराव्यात. (३२९)

[क्रमाने वाढत जाणाऱ्या पाकळ्या म्हणजे आतल्या दोन वर्तुळांतील पाकळ्या लहान आकाराच्या त्याच्या नंतरच्या मोठ्या व्यासांच्या वर्तुळांच्या जागेतील पाकळ्या काहीशा मोठ्या आकाराच्या व त्यानंतरच्या वर्तुळांच्या जागेतील पाकळ्या त्याहून मोठ्या अशा कोराव्यात. तेव्हा समकेंद्री वर्तुळांमधल्या जागा सारख्या रुंदीच्या नसून जसजसे कर्णिकेपासून बाहेर जाऊ तशी ही रुंदी वाढत जाईल अशा रीतीने वर्तुळे आखावयास हवीत.]

(चौरसाकृती चौकट व सर्वात बाहेरील वर्तुळ यांच्या मध्ये असलेली) वरच्या भागी जी त्रिकोणी जागा तेथे नेहमी कणीसह (बिंदूसह) पानाची आकृती रेखावी. चाणाक्ष शिल्पींनी ही सुंदर उत्पला, लहान फुले, रेखावीत. (३३०)

सर्व संधींच्या जागा या क्रमाने अलंकारांनी भूषवाव्यात. अलंकारांनी शोभादायक न केलेली वास्तू मध्यम स्वरूपाची गणतात. (३३१)

(या उलट) सर्व अंगोपांग भूषविलेले असतील तर निश्चितच ती वास्तू उत्तम समजतात. भूषणांशिवाय प्रासाद असेल तर तो खात्रीने अधम प्रकारचा होतो. (३३२)

शिल्पशास्त्रानुसार केवळ शिल्पाच्या प्रकाराने मण्डप तसेच पोटल[१] ही उत्तम वास्तू (गृह) सांगितली जातात. (३३३)

[शिल्पसारणीत वास्तूचे दोन प्रकार दिले आहेत : १४ प्रकारची देवालये व आठ प्रकारच्या साधारण इमारती. त्यांच्यामध्ये मण्डप व पोटल यांचा उल्लेख आहे. मंडपाला चार, आठ किंवा बारा खांब असून वर वर रुंदीने कमी होत जाणारे शिखर असते. त्याला साधारणतः भिंती नसतात.) पोटलाला भिंती असतात खांब नसतात व घुमटाकार शिखर असते.]

घर (मुखशाला) इत्यादी विभागांची माहिती-(**मुखशालेचा अनुराह**) (छायाचित्र ८ **इ** व **३० इ**)

येथे घर (मुखशाला) वगैरे विभागांची माहिती सांगतो ती ऐक. अनर्थाच्या बाजूच्या भागात, त्याचप्रमाणे (मुखशालेच्या) बाजूच्या भागात जी जागा असते ती या जागेची सीमा, ऐक. येथे खांबाची आकृती असावी. याची रुंदी कोणकाच्या रुंदीच्या निम्मी असते. (३३४, ३३५)

कोणकाच्या (रुंदीचे) दोन विभाग केले असता दीड भाग रुंदी त्याची (कोणकाची) असते व अर्धा भाग रुंदी अनुराहाची असते. हा प्रासादाचा उत्तम तलच्छन्द (मंडल) आहे. (३३६)

(अनर्थाच्या) खान्दिच्या नंतर (शेवटी) असलेल्या जागी (जो खांब असतो) त्यास (अनु-) राहपाग म्हणतात. अनुराहाची जी उंची तीचे पाच विभाग करावेत. (३३७)

---

[१] टिप्पणी पहा.

लांबीच्या मध्यभागी तसेच रुंदीच्या मध्यभागी तीन भाग पाडावेत. हा प्रसिद्ध जंघाचा भाग असून त्याच्या दोन्ही बाजूंना सुंदर अशा दोन रेघा आखाव्यात. (३३८)

(उंचीच्या) मध्यभागील दोन भागांची जंघा असते. तळापासच्या दोन भागांत पंचकर्म असते. शिल्पीने कुठलीही शंका न बाळगता पूर्वी सांगितल्याप्रमाणे भाग पाडावेत. (३३९)

[पूर्वी म्हणजे श्लोक २३७ व त्यापुढे यात दिलेली माहिती.]

सर्वात वरच्या भागातील अर्ध्या उंचीत पाद व कुंभ (थर असावा). सुंदर कणी, वसन्त (तेथे) कोरावेत व त्यांच्यावर पट्टिका असावी. (३४०)

वरच्या भागी तसेच मध्यभागी लांबट आकाराची लहानशी पट्टिका असावी. जंघेच्या तीन भागांपैकी (मधला) एक भाग रुंदीची ही पट्टिका वरच्या बाजूला असावी. (३४१)

(या पट्टीच्या) दोन्ही बाजूंना भारकेन्द्राधिप व त्यांचे गण कोरावेत. दोन्ही जागी असलेल्या त्यांची मुखे परस्पर विरुद्ध दिशांना करावीत. (३४२)

त्यांच्या दोन्ही बाजूंना भार-भैरवांच्या (मूर्ती) खोदाव्यात.

**भारकेन्द्राधिपांची माहिती** (छायाचित्र १६ इ, ई)

प्रमुख भैरवाची माहिती ऐक. तो शिल्पाच्या कामासाठी (निरनिराळ्या भागांसाठी) उत्तम असतो. भाराचे रक्षणासाठी असलेल्या या देवतेचे अनेक प्रकार प्रसिद्ध आहेत. (३४३)

दोन किंवा फक्त एक, मानवाच्या आकृतीप्रमाणे असलेला भैरव किंवा सिंहस्वरुपातील अथवा विरलाच्या आकृतीप्रमाणे असतो. (३४४)

कधी कधी तो अशा विचित्र आकृतीचा करतात की त्यामुळे त्याच्या विषयी कुतूहल निर्माण होते. शास्त्रात दिल्याप्रमाणे लक्षणे असलेले असे हे पाच प्रकार आहेत. (३४५)

{ जणू काही सर्व वजन हातांवर पेलले आहे अशी मूर्ती करावी. }

वजन वाहून नेणारी अशी ही मूर्ती असल्याने तिला भारवाहिका म्हणतात. पट्टीच्या दोन्ही बाजूंना कुक्कुटासनांत (उकीडवी) बसलेली ही मूर्ती असते. (३४६)

**युगला (जोडी)**

जणू काही वजन मजबूतपणे तोलून धरले आहे अशा रीतीने वरती दोन्ही हातांची ठेवण असावी. दगडावरती एका कोपऱ्यापासून दुसऱ्या कोपऱ्यापर्यंत जातील अशा रेघा आखाव्यात. (३४७)

वरच्या (बाजूला) असलेल्या त्रिकोणाच्या भागी मस्तक असावे. तसेच पोट मध्यभागी असून बालकाप्रमाणे पाय (आखूड) असावेत. (३४८)

वरच्या बाजूला दोन्ही हात असून त्यांचे तळवे वरच्या (आडव्या) रेघेला अनुसरून असतात. ही जोडी उत्कृष्ट असून वजन तोलून धरण्यासाठी उत्तम असते. (३४९)

**एक** कनिष्ठ पद्धति म्हणजे एकच मूर्ती बनवितात, ती ऐक. नियमाप्रमाणे पाषाणाच्या अवयवाच्या (पृष्ठभागाच्या) मध्यभागी कर्ण (छेद-रेखा) आखावेत. (३५०)

(कर्णांच्या) छेदबिंदूतून जाईल अशी मध्यभागी उभी रेघ आखावी. (त्या रेघेच्या) उजवीकडील जागेत उत्तम (भव्य) चेहरा कोरावा. (३५१)

खालच्या (आडव्या) रेघे पासून मध्यभागापर्यंत असा कटिप्रदेश असावा. वीरासनांत मूर्ती असून जणू ती उडत आहे अशी दाखवावी. (३५२)

उजव्या रेघेजवळील जागेपाशी सुशोभित (उजव्या) पायाचा भाग असावा. डावा हात (कोपरा डाव्या पायाच्या) घोट्या जवळ असावा. हे हात वरच्या भागी काठी प्रमाणे (ताठ) असावेत. (३५३)

श्रेष्ठ अशी एक (भैरवाची मूर्ती) अशी स्थापावी. त्याच्या डोक्यावर गंधर्वाप्रमाणे कुरळे केस दाखवावेत. सिंहाच्या आकृतीप्रमाणे असलेली भारवाहकाची मूर्ती सांगतो ती ऐक. (३५४)

**सिंह** (छायाचित्र १७)

वज्रमस्तकात असते तसे पट्टीच्या जागी सिंहाचे मुख करावे. तसेच पट्टीच्या मध्यभागी तीन आलम्ब करावेत. (३५५)

पट्टीच्या जवळ बाजूच्या कोपऱ्यांपासून दोन तिरप्या रेघा आखल्यानंतर पट्टीच्या जागेमध्ये सिंहासाठीची जागा सांगितली जाते. (३५६)

(अशा रीतीने) मिळालेल्या जागी नेहमी लांबट आकाराचे सिंह करतात. सिंहाच्या खालच्या (रिकाम्या) जागेत रौद्र मूर्ती (लढवय्याची) असावी. (३५७)

शिल्पशास्त्राला अनुसरून खांबावरती ही मूर्ती खोदावी. पूर्वीच्याच आकाराच्या केलेल्या जागेत बाजूंना (उलट सुलट) अशा त्रिकोणाकृती आखाव्यात. (३५८)

**विराला (किंवा विराज)**

या तयार केलेल्या (त्रिकोणाकृती) जागेत उत्तम विराजाची (सिंहाचे डोके असलेल्या विरालाची) स्थापना करावी. त्यांच्या जोडापाशी असणाऱ्या जागेतील अंतरात शोभादायक अशी कर्णिका करावी. (३५९)

घराच्या आतल्या बाजूला असलेले हे ' विराजभार ' आहेत. या कल्पना केलेल्या रेघांवर निरनिराळ्या आकारांचे कुतूहल (प्रकारचे भारवाहक) करतात. (३६०)

**कौतूहल**[1] (छायाचित्र **१७ अ** व **१८**)

डोके हत्तीचे व शरीर सिंहाचे तसेच काही वेळा डोके हरीणाचे (माणसाचे) असते व शिंगासह सुंदर दिसणारा शार्दूल (वाघ) असतो. (३६१)

हा कौतूहल नक्षीचा प्रकार असून त्याचे अनेक प्रकार असतात. बुद्धीमान शिल्पीने (अशा) अनेक अलंकारांनी प्रासाद भूषवावा. (३६२)

[शिल्पसारणी प्रमाणे कौतूहल हे खाली दिलेल्या पाच प्राण्यांमिळून होते. हत्ती, सिंह, हरीण, माणूस व मकर.

हत्तीचे डोके व सिंहाचे शरीर मिळून **गजसिंह** होतो. मनुष्याचे डोके व सिंहाचे शरीर मिळून **नरविराल** होतो.

हरीणाची शिंगे असलेला सिंह म्हणजे **मृगविराल**. वरचा भाग मनुष्याचा व खालचा भाग मकराप्रमाणे असलेल्या आकृतीलाही **नारविराल** म्हणतात. चेहरा सिंहाचा व तोंड आणि शरीर मकराचे मिळून **सिंहमकराकृती** होते.]

अगोदरच्या अध्यायात सांगितल्याप्रमाणे मुखशालेच्या अवयवांची माहिती (सांगतो.) (प्रत्येक) बेढाच्या (खांबाच्या) नंतर खान्दी असते. तसेच खान्दीच्या बाजूला गृह (राह) असते. (३६३)

राहाच्या दोन्ही बाजूंना (अनुराहाच्या पलीकडे) असलेल्या खान्दीस ' विश्रान्तमण्डल ' (म्हणतात). शेवटी बाजूंना योग्य जागी गवाक्षाची निर्मिती करावी. (३६४)

**गवाक्ष (खिडकी) बांधावयाची पद्धत** (छायाचित्र **१९**)

(मुखशालेच्या) दोन्ही बाजूंना गवाक्ष बांधावयाच्या कौशल्याची (माहिती) ऐक. पूर्वीच्या श्लोकात (श्लोक ८५) खिडकीकरीता असलेली जागा (सांगितली) आहे. (३६५)

त्या जागेचे (उभे) पाच समभागांत विभाग करावेत. रुंदीचे (आडव्या) चार रेघांनी तीन समभाग करावेत. (३६६)

(प्रत्येक उभ्या रेघेच्या) दोन्ही बाजूंना दोन सारखे भाग करून त्यांच्या मध्ये तीन अवकाश असतात. प्रत्येक भाग सारख्याच विभागांनी खांबाच्या स्वरूपात कोरावा. (३६७)

दोन भागांनी मिळून होणाऱ्या प्रत्येक उभ्या अवयवाच्या जागी ' अलसा-बन्ध ' असतो. ही जागा (खिडकीच्या) मोकळ्या भागांच्या मध्ये असते. (३६८)

---

[1] टिप्पणी पहा.

अलसा बन्धाच्या जागेला ' नारीबन्ध ' (देखिल) म्हणतात. नियमाप्रमाणे उभ्या विभागात खालच्या बाजूला, त्या विभागाच्या आकारात, (३६९)

बुद्धीमान शिल्पीने, खालच्या बाजूला, लहान पंचकर्म करावे. तसेच वरच्या बाजूला त्याच्या (खालच्या बाजूच्या उंचीच्या) निम्मे (उंचीचे) व त्याच आकाराचे (पंचकर्म) करावे. (३७०)

वरच्या भागी असलेल्या (पंचकर्मातील) कणी भाग लहान असून पाद व कुम्भ (हे थर) प्राधान्याने दाखवितात. त्याच्यावर खिडकीची जेव्हढी रुंदी असेल तितकी लांब पट्टी (तुळई) असावी. (३७१)

(ही पट्टी) दोन प्रकारानी, वेलबुट्टीने किंवा पीठाप्रमाणे कोरतात. वेलबुट्टी व पीठ या दोघांमध्ये वेलबुट्टी (ची नक्षी) शिखरावर वापरतात. (३७२)

मुखशालेच्या अवयवांच्या बाबतीत पीठ-प्रकाराची (नक्षी) उत्कृष्ट व महत्वाची समजतात. त्याच्या (पट्टीच्या) वर असलेल्या मध्यभागाच्या जागी योग्य असे (तथा) अलंकरण करावे. (३७३)

अनेक प्रकारच्या नक्षींनी भूषविलेल्या त्या जागी चौकोनांत (आयतात) प्राधान्याने विद्यादानाचे दृश्य दाखवितात, (किंवा) सैन्याचे चतुरंगदल वगैरे कोरतात. (३७४)

नक्षींनी भूषविलेल्या या जागेच्या मध्ये ' नृपबन्ध ' कोरावा. तेथील जागेची विभागणी नियमाप्रमाणे कशी करावयाची त्याची पद्धत ऐक. (३७५)

[नृपबन्ध – राजघराण्यातील व्यक्तींच्या मूर्ती, उदा. राजा व त्याच्या राण्या वगैरे; किंवा राजाच्या आयुष्यात घडलेल्या रोमांचक (सिंहांची किंवा वाघाची शिकार, युद्धातील जय वगैरे) अथवा आनंददायक (राज्याभिषेक, विवाह वगैरे) घटनेचे चित्रण.]

**शिक्षादानमूर्तीयंत्र** (छायाचित्र २० व आकृती १०)

**आकृती १०––शिक्षादान यंत्र**
१.३७६–३८१

{ विधिवत् चौरस अथवा आयाताकार जागा निश्चित करून नेहमीच श्रेष्ठ अशी शिक्षादानाची आकृती खोदावी. (३७६)

जमिनीपासून भिंतीवरील बंधना (थरा-) पर्यंत असलेल्या जागेत ही मूर्ती करावी. वत्सा, अत्यंत गुप्त अशी (या) यंत्राची (माहिती) सांगतो ती ऐक. (३७७)

आयताकृती (जागेची) लांबी पाच रेघांनी विभागावी. तसेच त्या जागेच्या रुंदीत पाच विभाग (किंवा पाच रेघांनी विभाग) पाडावेत. (३७८)

वरच्या मध्यरेषेपासून बाजूंनी त्रिकोण होईल अशा व आडव्या तिसऱ्या रेघेला जोडणाऱ्या रेघा आखून समचतुर्भुजाकृती प्रमाणे आकार मिळवावा. (३७९)

परत बाहेरील (प्रान्ते) उभ्या रेघा तिसऱ्या आडव्या रेघांना जेथे छेदतात ते (बिंदू) रेघांनी दोन्ही दिशांना जोडावेत. (३८०)

[या यंत्राच्या चौकटीच्या ज्या उभ्या रेघा आहेत त्यांच्या शेजारील उभ्या रेघा व चौकटीच्या आडव्या बाजूपासून (चौकटीची रेघ धरून) तिसऱ्या रेघा या जेथे एकमेकास छेदतात त्या छेदबिंदूना जोडणाऱ्या रेषा, म्हणजेच आकृतीतील कर्ण व कर्णांना समांतर असलेल्या रेघा.]

अशाच रीतीने खालच्या व पार्श्वजागांचे समान भाग करणाऱ्या व (समोरासमोरील) कोपऱ्यांना विभागणाऱ्या (कर्ण-) रेषा आखाव्यात. ही झाली रेघांची आखणी. (३८१)

मध्यभागी असलेल्या त्रिकोणाच्या जागी, कर्णांना अनुसरून छातीपर्यंत, डावीकडील बाजू दिसेल असे वळलेले (गुरुंचे) शरीर दाखवावे. (३८२)

डावे आणि उजवे हात पुढच्या बाजूला असून ते परस्परांच्या विरुद्ध दिशांना वळलेले दाखवावेत. मध्यबिंदूवर नाभी येते व त्याखाली आसन असावे. (३८३)

हे उत्कृष्ट आसन दुसऱ्या आडव्या रेषेपर्यंत दाखवावे. त्या आसनाखाली मध्यभागी दोन बाल शिष्य (माणवक) असावेत. (३८४)

समभुजचतुर्भुजाकृतीमध्ये (विषमवर्ग क्षेत्रे?) मिमांसक दाखवावेत, (व) मधल्या त्रिकोणाकृती जागेत नोकर (उपचारक) असतात. (३८५)

तेथे, सहाव्या उभ्या रेषेवर वरपासून मूर्तीच्या डोक्यापर्यंत (लोंबणारा) दिवा किंवा फुलांची परडी खोदावी. (३८६)

त्या जागी नेहमी निरनिराळ्या हावभावांमधील शिष्यांच्या मूर्ती खोदाव्यात. सहा, सात किंवा आठ विद्यार्थ्यांचा गट असावा. (३८७)

(गुरुच्या) मुखा समोर दुसऱ्या भागात जे (त्याच्या) ज्ञानाने आकर्षित झाले आहेत (म्हणजे गुरुचे सांगणे ध्यानपूर्वक ऐकत आहेत) असे (शिष्य) कोरावेत. शिल्पीच्या ज्ञानानुसार व शिल्पशास्त्राला अनुसरून (अशी ही मूर्ती करावी.) } (३८८)

किंवा त्या मंडलाच्या जागी चतुरंग सैन्यासह असलेल्या राजाची मूर्ती, त्या प्रदेशाच्या रूढीला अनुसरून, शिल्पीने स्थापावी. (३८९)

काही वेळेला खिडकीमध्ये छिद्रांची नक्षी करतात. गवाक्षाच्या दोन्ही शेवटांना जेणेकरून खांबांची आकृती निर्माण होईल असे खोदकाम करावे. (३९०)

पूर्वी सांगितल्याप्रमाणे नाग इत्यादींनी भूषविलेल्या खांबांच्या प्रकाराप्रमाणे हे खांब करावेत.

**अलसांची माहिती** (छायाचित्रे २१ ते २७)

अलसांबद्दलची माहिती मी सांगतो ती तू ऐक. (३९१)

जनांमध्ये त्याला ' नारीबन्ध ' {' कन्याबन्ध '} म्हणतात; शिल्पशास्त्राची ती निर्मिती आहे. स्त्रीशिवाय जसे घर, स्त्री शिवाय जशी (रति-)क्रीडा. (३९२)

त्याचप्रमाणे ललने शिवाय या जगातील प्रासाद निष्फळ असतो. गधंर्व, यक्ष, राक्षस, पन्नग तसेच किन्नर. (३९३)

स्त्रियांचे लालित्यपूर्ण हावभाव पाहून मोहित होतात. सर्व अलंकारांनी भूषविलेली अशी मनोहर रमणी करावी. (३९४)

अनेक हावभावांसह (विभ्रम) असलेल्या तिचे अलसा हे विधान आहे. गवाक्ष, शिखर किंवा त्याशिवाय मुखशालेला शोभविण्यासाठी, तसेच (गर्भगृहाच्या) भद्रावर, त्याचप्रमाणे शिखरावर (यांचे स्थान) असून ती नारीबन्ध म्हणून प्रख्यात आहे. तिचे अनेक प्रकार तिच्या चित्रवृत्तींसह ऐक. (३९५, ३९६)

कन्याबन्धाचे नांव त्याच्या चित्तवृत्तीनुसार सांगतात. अलसा, तोरणा, मुग्धा, मानिनी, डालमालिका. (३९७)

पद्मगंधा, दर्पणा आणि विन्यासा, ध्यानकर्षिता, केतकी भरणा, उत्कृष्ट मातृमूर्ती, त्याचप्रमाणे (३९८)

चामरा, गुंठना, प्रामुख्याने नर्तकी, शुकसारिका, मनोहर नूपुरपादिका व अत्यंत शोभिवंत मर्दला (३९९)

हे अलसा-बन्धांचे सोळा प्रमुख प्रकार आहेत. मूर्तीच्या जागेच्या अनुसार व जेथे ती मूर्ती बसवावयाची त्या जागेस शोभेल असा प्रकार असावा. (४००)

त्यांचे (अलसा-बन्धांचे) स्वरूप खूप प्रयत्नाने सुंदर असावे. सर्व जागांमध्ये त्यांच्यासाठी योग्य जागा नेहमीच लांबट आयताकृती असते. (४०१)



एन ४१३३–५

**अलसा यंत्र** (छायाचित्र **२१** व आकृती **११**)

**आकृती ११--अलसा यंत्र**
१.४०२-४०६

(लांबट) आयताकृती शिवाय (इतर ठिकाणी) अलसा नेहमीच अपूर्ण अवयवांची होते. लांबट आयताकारांत नियमाप्रमाणे मध्यभागी उभी (सममिती अक्ष दाखविणारी) रेघ आखावी. (४०२)

रुंदी मधल्या (उभ्या) रेघेने व लांबी (आडव्या) तीन रेघांनी विभागावी. रुंदीच्या डावीकडील (निम्म्या भागाच्या) मध्यबिंदू (म) पासून (विरुद्ध दिशांना) जाणाऱ्या (मक, मड) रेघा रेखाव्यात. (४०३)

(डावीकडेच) रुंदीच्या निम्मे, वर व खाली त्रिकोण (पअफ व पआफ) आखावेत. पुन्हा उजव्या बाजूकडील खालील व वर कोपऱ्यांपासून निघालेल्या रेघा (चभ व चछ) आखाव्यात. (४०४).

रुंदीच्या (लांबीच्या?) मध्यभागापासून बाजूला तशाच (पअ व पआ) सारख्या रेघा (ठब व ठत) आखाव्यात. या रेघा बाजूपासून निघून दोन कोपऱ्यांपर्यंत असतात. (४०५)

ही विषमभुज त्रिकोणाकृती जागा उजव्या बाजूस असते. (?). हे सर्व प्रकारच्या कन्या (बन्धां-) साठी श्रेष्ठ असे अलसा यन्त्र आहे. (४०६)

**अलसा** (छायाचित्र **२१ आ** व **२४**)

(उभ्या) मध्यरेषेच्या डाव्या भागी मस्तकाची कल्पना करावी. रुंदीच्या चवथ्या भागात मोठ्या प्रयत्नाने वक्षप्रदेश असावा. (४०७)

वरच्या बाजूला मध्यभागी जी रेघ (भच) आहे, तिला अनुसरून मस्तकाच्या वर हात असतो. मध्यबिंदूवर नाभी असून त्याच्या डाव्या बाजूला कंबर असते. (४०८)

उजव्या पायाची मध्यबिन्दूपासून सुरुवात करून तो वक्राकार दाखवावा. डावा पाय रेघांना (मड व डआ) अनुसरून सुंदर दिसेल असा लांबट रेखावा. (४०९)

छन्दिता व स्पन्दिता असे अलसाचे दोन प्रकार सांगतात.

[हाताची बोटे एकमेकांत गुंफलेली असून, हाताचे तळवे वरच्या बाजूस वळलेले असतील तर ती छन्दिता व खालच्या बाजूस वळलेले असतील तर ती स्पन्दिता अलसा असते.]

**तोरणा** (छायाचित्र २१ इ)

तोरणा व (तिचे) यंत्र दोन्ही वरील प्रमाणेच असतात, फक्त उजवा हात (४१०)

व दंड त्रिकोणाकृतीवर (भचअ) आधारलेले असतात. सुंदर तोरणा स्पन्दित मुद्रेत असते. (४११)

**मुग्धा** (छायाचित्र २१ ई)

नागशीर्ष मुद्रेत असलेला एक हात मुखाच्या समोरच्या जागी असतो. नाग (शीर्ष) मुद्रेत उजवा हात असून डावा हात रेघांना अनुसरून असतो. (४१२)

त्रिकोणाकृतीच्या रेघांच्या आधारे (डावा हात) आखून कंबरेच्या जागी त्याची स्थापना करतात. दोन्ही पाय स्पन्दितात (अलसात) दिल्याप्रमाणे डावीकडे तिरपे आखतात. (४१३)

ही ' मुग्धा ' (निर्व्याज) स्त्री अनेक अलंकारांनी सजवावी.

**मानिनी** (छायाचित्र २१ उ)

मस्तक शेवटच्या भागांत असून ते डावीकडे वळलेले (वाकविलेले) असते. (४१४)

उजवा हात डोक्यावरती (वरच्या) तिरप्या रेघेला अनुसरून रेखावा. उजव्या हाताचा तळवा डोक्यावर धरलेला असून {डावा (तळवा) ओठावर ठेवलेला असतो.} (४१५)

डावा पाय काठीप्रमाणे सरळ (सोट) असून उजवा पाय आखडलेला असतो. त्याची नळी समोरून भिंतीच्या जागेकडे आधार घेतलेली अशी दाखवितात. (४१६)

तिच्या (कंबरेवर) मोत्यांच्या लोंबत्या माळा (आलम्ब) असून (वक्षभागावर) सुंदर कांचोळी असते. तिचे केस शोभिवंत गांठीत (अंबाड्यात) बांधलेले असतात, डोळे अर्धवट मिटलेले असून ओठांवर लाडीक हास्य असते. (४१७)

शिल्पशास्त्राला अनुसरून ' मानिनी ' कन्येचे (हे वर्णन आहे.)

**डालमालिका** (छायाचित्रे २२ अ, २६ उ व २७ इ)

त्रिच्छेदाच्या (त्रिकोणाच्या) खालच्या बाजूस मस्तक असून सुंदर ' पार्श्वागत ' मुद्रेत असते. (४१८)

[पार्श्वागत मुद्रा–चेहऱ्याची फक्त एकच बाजू (पार्श्वबाजू) दिसेल अशी ठेवण.]

त्याच्या (शीर्षावर) डहाळीच्या अनुसराने जाईल असा उजवा हात असतो. उजवीकडील हात उजवीकडील त्रिकोणाच्या उजव्या भुजेच्या आधाराने असतो. (४१९)

कंबरेच्या वरचे (शरीर) मध्यभागाच्या बाजूला असून नाभी मध्यप्रदेशात असते. डावा हात काहीसा खाली आलेला असून दंड रेघेला अनुसरून असतो. (४२०)

डाव्या बाजूला डहाळीला स्पर्श करीत आहे असा शोभिवंत विभ्रम असतो. उजवा पाय (मांडी) रुंदीवर (आडवी) असून, डाव्या रेघेच्या आधाराने रेखावा. (४२१)

उजव्या पायाची नळी (गुडघा ते पाऊल) डाव्या त्रिकोणाच्या भुजांवर जाणारी असते. डावा पाय उजवीकडे असून तो काठीप्रमाणे सरळ सुंदर उभा असतो. (४२२)

उजवीकडील त्रिकोणाच्या भुजांच्या आधाराने डहाळींची माळा असते.

[हस्तलिखितातील आकृती व वर्णन यात डाव्या उजव्याचा घोटाळा आहे.]

**पद्मगंधा** (छायाचित्र **२२आ** व **२६इ**)

नेहमीच सुंदर दिसणारी, डावीकडे वळलेली व डाव्या बाजूला (शरीराचा) जास्त भाग असलेली, (४२३)

शीर्ष, शरीर, तसेच दोन्ही पाय हे प्राधान्याने ललित विभ्रमांत असतात. मस्तक वरच्या भागी व छाती तिसऱ्या भागापर्यंत असते. (४२४)

डावा पुढचा हात दंडाला अनुसरून (कोपऱ्यात वाकवून) त्याच्या बाजूला असतो. डाव्या हातात तिने प्रफुल्ल व देखणे कमळ धरलेले असते. (४२५)

उजवा हात खालच्या बाजूला कंबरेच्या प्रदेशापर्यंत लोंबता असतो. उजवा पाय काहीसा तिरपा असून त्याचा खालचा भाग मागच्या बाजूस कोनाड्याच्या पोकळीत (गव्हराकडे) गेलेला असतो (भिंतीच्या आधाराने असतो.) (४२६)

डावा पाय त्रिकोणाच्या (एका) बाजूला अनुसरून काठीप्रमाणे सरळ असतो. उजव्या खांद्यांजवळील जागी शोभिवंत अंबाडा असतो. (४२७)

कमळाच्या सुगंधाची आवड असलेली ती पद्मगंधा म्हणून प्रख्यात आहे.

**दर्पणा** (छायाचित्रे **२२ इ, २६ अ, ब व २७ अ**)

(डावा हात) त्रिकोणाच्या वरच्या भुजेला अनुसरून लालित्याने मस्तकावर धरलेला असतो (व) तळहात डोक्यावरील केसांच्या भागी पुढच्या बाजूला ठेवलेला असतो. (४२८)

तिची दृष्टी मध्य रेषेच्या उजव्या बाजूला उजवीकडे खाली बघत आहे अशी दाखवितात. मधल्या विभागाच्या त्रिकोणाला अनुसरून सुंदर हात खालच्या बाजूस (गेलेला) दाखवितात. (४२९)

(त्या हातात) सुंदर आरसा धरलेला असून ती (मूर्ती) लोकांच्या आनंदास कारणीभूत होते. दोन्ही वक्ष पुढच्या बाजूला व मध्यरेषेला अनुसरून (मात्र तिच्या) डाव्या बाजूला असतात. (४३०)

उजवीकडील पायाच्या सुरुवातीपासून डावीकडील खालच्या कोपऱ्यापर्यंत (उजवा पाय असतो.). पुन्हा डावीकडील पाय व गुडघा तिकडच्याच त्रिकोणाला अनुसरून असतात. (४३१)

(उजवा पाय) काहीसा सहजच वाकलेला, मध्य रेषेच्या तळापाशी उजव्या बाजूला असतो. कंबरे भोवती वस्त्र नेसलेले अशी ही आकृती लावण्यमयी असते. (४३२)

**दर्पणा** मूर्तीचे असे निरनिराळे प्रकार असतात. ही कन्या रमणीय (व) शोभिवंत असून मुखासमोर आरसा निरनिराळ्या रीतीने धरलेली अशी कोरावी. (४३३)

**विन्यासा** (छायाचित्र **२२ ई**)

डावे शरीर पुढे असलेली, उजव्या बाजूला भंग (बांक) असलेली, सुंदर पार्श्वागत मुख असलेली, मस्तक वरच्या भागी असून दोन्ही हात खांद्यांजवळ असतात. (४३४)

डावा हात डावीकडील त्रिकोणाच्या भुजेला अनुसरून असतो. पुढचा हात व दंड पुढच्या बाजूला रुंदीच्या (आडव्या) मध्यरेषेला अनुसरून असावा. (४३५)

दुसरा हात तशाच उपन्यासांत असतो (मात्र) तळवा न्यास मुद्रेत असतो.. मध्यबिंदूपासून सुरूवात असलेला डावा पाय काठीप्रमाणे सरळ असतो. (४३६)

[कच्छपिकाकृती : लहान कासवाप्रमाणे असलेल्या आकाराच्या मुद्रेत].

मध्यबिंदूच्या बाजूपासून उजवीकडील त्रिकोणापर्यंत, उजव्या गुडघ्यापर्यंत (मांडीचा भाग) असतो व त्याचा (पायाचा) खालचा भाग (नळी) काठीप्रमाणे उभा असतो. (४३७)

जणू काही जप करीत आहे अशी हातांची रचना असते. ध्यानांत मग्न झालेली अशी **विन्यासा** (कन्या) असते. ती लावण्यवती असून कंबरेपाशी उत्कृष्ट व बहुमोल वस्त्र असते. (४३८)

**केतकीभरणा** (छायाचित्रे **२२ उ** व **२५ अ**)

डाव्या बाजूला मस्तक, वक्ष, कंबर, हात इत्यादी असतात. मध्य रेषेवर मध्य जागा व्यापणारे असे वक्षःस्थल असते. (४३९)

डावा हात उजवीकडील त्रिकोणाच्या भुजांच्या आधाराने आखावा. छेदबिंदूपासून सुरुवात करून (उभ्या) मध्य रेषेपर्यंत दंड असतो. (४४०)

तिच्या डोक्यावर डाव्या बाजूला (त्या हाताचा) तळवा शोभत असतो. (त्या) हातामध्ये केतकीचे पान असलेली (अशी) ही शुभदायक **केतकीभरणा** (कन्या) आहे. (४४१)

डाव्या बाजूला झुकलेली व नितंबभाराने (पृथु नितंबांनी) सुस्वरूप दिसणारी असून त्या जागेच्या वरच्या बाजूला हातामध्ये सुंदर फूल ठेवावे. (४४२)

कंबर तसेच पोट ही मनोरम असून पूर्णपणे डाव्या बाजूच्या जागी असतात. त्रिकोणाच्या खालच्या बाजूला अनुसरून लालित्यपूर्ण डावा पाय असावा. (४४३)

उजवीकडील खालच्या कोपऱ्यापर्यंत पायाच्या रेघा असतात. उजव्या गुडघ्याच्या खाली त्रिकोणाच्या कोणाच्या समोर, (४४४)

त्याच्या खालच्या बाजूला पायाची सुंदर नळी (डाव्या पायाच्या मागच्या बाजूला) छेदते.

[छन्दपादवत् – पावा वाजवितांना श्रीकृष्णाच्या पायांची जशी अढी असते तशी पायांची ठेवण.]

**मातृमूर्ती** (छायाचित्रे **२२ ऊ** व **२५ आ**)

त्यानंतर श्रेष्ठ मातृमूर्तीची माहिती ऐक. (४४५)

मध्यरेषेपाशी योग्य जागी मस्तक ठेवावे तसेच सर्व सुंदर असे शरीर असावे. शरीरावयांची माहिती ऐक. (४४६)

डाव्या बाजूकडे डाव्या त्रिकोणाजवळ डावा हात ठेवावा. तिरप्या रेघेच्या (च्छेदरेखा) शेवटापासून सुरुवात करून आडव्या रेघेच्या शेवटापर्यंत पुढचे हात असावेत. (४४७)

त्यांच्यामध्ये डावीकडील त्रिकोणाच्या जवळ बालकाची मूर्ती असते. मुखापासून सुरूवात करून पायाच्या शेवटापर्यंत (त्या बालकाचा सर्व शरीराचा भाग) मध्यरेषेला अनुसरून असतो. {बालक सुदृढ शरीराचे दाखवावे.} (४४८)

उजव्या खांद्यापासून गुडघ्याच्या जागेपर्यंतच्या (मध्यभागापर्यंत) उजवा हात लोंबता ठेवावा. दोन्ही पाय साधारण पद्धतीने ठेवावेत. (४४९)

ही मातेप्रमाणे असलेली मूर्ती बालक इत्यादींनी शोभिवंत दिसते.

{डावा व उजवा पाय कांहींसे उजवीकडे वळलेले असतात. ते (दोन्ही पाय) लहान आकारांचे असून साधारण पद्धतीची त्यांची ठेवण असावी.}

**चामरा** (छायाचित्रे **२३ अ** व **२५ इ**)

चामरा, देवीची सेविका, या दुसऱ्या (कन्येचा) प्रकार ऐक. (४५०)

मातृमूर्तीच्या आकाराप्रमाणे आकार असलेली, तिच्या सारखीच दोन्ही पायांची ठेवण असलेली, तिच्या सारखीच उभी रहावयाची ढब असून फक्त (शरीराचा) वरील भाग निराळा असतो. (४५१)

मुख उजवीकडे वळलेले असते, उजवा हात (दंड) त्रिकोणात असतो, व पुढील हात तिच्या सुंदर वक्षावर ठेवलेला असतो. (४५२)

डाव्या हाताचा खालचा भाग डाव्या त्रिकोणांत असतो. पुढचा हात पुढच्या बाजूस असतो. वस्त्रे व दागिने धारण केलेली असते. (४५३)

डाव्या खान्द्याच्या वरच्या भागात असलेले चामर डाव्या हातात असते. ' चामरा ' ची मूर्ती शांत भावाची असून देवतांचा आनंद वाढविणारी असते. (४५४)

**गुंठना** (छायाचित्रे **२३ आ** व **२६ ई**)

स्वतःला आवरकाने झांकुन घेणारी, पाठ दाखविणारी अशा सुंदर स्त्रीला **गुंठना** म्हणतात. ती तीन ठिकाणी वाकलेली असते. तिचे मस्तक (वरच्या भागात मध्य रेषेच्या) समभागी असते. (४५५)

मध्यबिंदूजवळ मध्यरेषेवर कंबरेचा मध्य असतो. डावा हात पुढच्या बाजूला असून, खालच्या ओठावर स्पर्श करणारा असतो. (४५६)

उजवा हात त्याच्या बाजूला असलेल्या त्रिकोणाच्या भुजांच्या जवळ असतो. (शरीराची) वरची बाजू व मस्तक ही आवरकाने झाकलेली अशी ही **गुंठना** असते. (४५७)

संपूर्ण पाठ दाखविणारी ही कन्या वीरासनांत उभी असते. खालच्या डाव्या बाजूला अनेक लता सुंदर वेलींच्या (वेलबुट्टींच्या) स्वरूपात दाखवितात. (४५८)

डावा गुडघा उजव्या त्रिकोणाला स्पर्श करणारा असतो. उजव्या पायाची नळी खालच्या रेघेच्या वरच्या बाजूस स्पर्श करणारी असते. (४५९)

वस्त्र, फूल किंवा पंखा कधी कधी तिने (हातात) धारण केलेला असतो. ही गुंठना स्त्री लावण्यवती, प्रियकर व खूप उत्कृष्ट असते. (४६०)

**नर्तकी** (छायाचित्र **२३ इ**)

उत्कृष्ट नर्तकी कन्या ही वळलेल्या शरीराची व उजवीकडे दृष्टीक्षेप करणारी असते. डोके वरच्या बाजूला नेहमीच्या जागी असते व दोन्ही हात (वर) आकाशाकडे उचललेले असतात. (४६१)

वरती दोन्ही हाताची बोटे एकमेकांत गुंतलेली असतात (छन्दपल्ली) व (ते हात) मध्यरेषेला अनुसरून असतात. मध्यबिंदूच्या जागी नाभी असून उत्कृष्ट नृत्यांत मग्न झालेली असते. (४६२)

शोभिवंत कंबर उजवीकडील रेघेच्या बिंदूच्या जागी (त्रिकोणाच्या शिरोकोनापाशी) असावी. डाव्या खालच्या कोपऱ्यापाशी उत्तम उजवा पाय असावा. (४६३)

डावा पाय मध्यरेषेला धरून (उजव्या पायाच्या) मागच्या बाजूला त्याला छेदेल (च्छन्दयुक्तेन) असा खालच्या जागी जमीनीवर ठेवावा. नृत्य स्वरूपात अशी ही नर्तकी असते. (४६४)

**शुकसारिका** (छायाचित्र २३ ई)

डोके डाव्याभागी झुकलेले असते. त्रिकोणाच्या आधाराने (डावा) हात असून, पुढचा हात समोरच्या बाजूला सुंदर वक्षापाशी ठेवलेला असतो. (४६५)

उजवा (पुढचा हात) उजव्या त्रिकोणापर्यंत काहीसा वर उचललेला असतो. (या) हातामध्ये पोपट किंवा मैना किंवा दुसरे अनेक प्रकारचे पक्षी असतात. (४६६)

मध्यबिंदूपाशी नाभी असून दोन्ही पाय तिरपे असतात. डावा सुंदर पाय सरळ मनोहर भिंतीकडे (गेलेला) असतो. (४६७)

त्याच्या बाजूला उजवा पाय उजवीकडे लांबविलेला असतो. अशी ही **शुकसारिका** म्हणून सांगितलेली कन्या फार प्रख्यात आहे. (४६८)

**नूपुरपादिका** (छायाचित्रे २३ उ व २७ आ)

नेहमीच सुंदर असलेले शरीर उजवीकडे झुकलेले असून मध्यरेषा (व उजवी बाजू) यांच्या अंतरामध्ये उभे असते. डावा हात डावीकडच्या त्रिकोणाच्या बाजूंना अनुसरून लोंबता असतो. (४६९)

उजव्या हातात पूर्वी वर्णिल्याप्रमाणे (पद्मगंधेप्रमाणे) उत्कृष्ट कळी धारण केलेली असते. खालच्या बाजूला दोन पायांपैकी उजवा पाय असा वाकविलेला असतो की, (४७०)

उजवा गुडघा खालच्या पहिल्या आडव्या रेषेला स्पर्श करीत असतो व पायाची नळी (गुडघा ते पाऊल) डाव्या बाजूला तिरपी असेल अशी कोरावी. (४७१)

जेथे नुपूरांची माळ आहे तेथपर्यंत डावा हात आणावा (तिची बोटे नुपूरांजवळ असतात.) डावा पाय खालच्या बाजूला मध्यरेषेला अवलंबून लांबविलेला असतो. (४७२)

**मर्दला** (छायाचित्रे २३ ऊ व २६ ऊ)

डावीकडील (त्रिकोणाच्या) रेघेजवळ येईल असे मस्तक किंचित तिरके असते. चाणाक्ष शिल्पींनी मध्यरेषेच्या दोन्ही बाजूंना समान अंतरावर वक्षभाग व डावा हात ठेवावा. (४७३)

डावीकडील त्रिकोणाच्या भुजाला स्पर्श करील असा खान्द्याचा भाग असून तेथून निघणारा लालित्यपूर्ण हात देखिल (आडव्या) मध्यरेषेपर्यंत आलेला दाखवावा. (आडव्या) मध्यरेषेवर शोभिवंत व उत्कृष्ट मृदुंग असावा. (४७४)

उजवा हात (मृदुंगाच्या) मागच्या बाजूला उजव्या त्रिकोणापर्यंत असतो. डाव्या पायाचा तळवा पायाच्या जागी (जमिनीवर पूर्ण) टेकलेला असतो, (४७५)

व उजवा पाय त्याच जागी मध्यरेषेला अनुसरून असतो. वादन कामाच्या उन्मादांत असलेली उत्कृष्ट अशी ही **मर्दला** आहे. (४७६)

दोन्ही हात एका ठिकाणी आणून (तिने निर्माण केलेला) तालध्वनी आनन्द देणारा असतो. शिल्पगृहाचे भूषणच अशा या सोळा कन्या असतात. (४७७)

[मर्दला कन्येचे रूप इतके जिवंत हवे की जणू काही दोन्ही हातांनी मृदंगाचा तीने निर्माण केलेला तालध्वनी ऐकू येत आहे असे वाटावे.]

**भद्र** (प्रकारच्या प्रासादाच्या) पागांच्या भागी तसेच **रेखा** (प्रासादात) सगळीकडे लोकांना मोहून टाकणाऱ्या व अनेक प्रकारच्या अलंकारासह असलेल्या सुभग स्त्रीयांचे गट असावेत. (४७८)

उत्कृष्ट असे केयूर व हार तसेच कुंडले व कटक (इत्यादी) सर्व प्रकारच्या अलंकारांनी भूषविलेल्या अशा व त्यांच्या त्यांच्या लक्षणांप्रमाणे त्या असतात. (४७९)

नारीबन्ध नेहमीच, विशेषतः शिखरावर, आकर्षक दिसतो. { याच पद्धतीने गवाक्षे इत्यादी (देखिल) मनोहर करावीत.} (४८०)

सर्व लक्षणांसह अशी भिंत बाधावी, इतर अंगांची कामे देखिल त्याच काळजीने करावीत. (४८१)

**लहरा भाग** (छायाचित्र २८)

शेवटी भिंतीच्या प्रदेशाच्या वर (भिंतीचा व छप्पराचा जेथे) समन्वय होतो त्या जागेतील निरनिराळ्या खोदकामाबद्दलची माहिती येथे सांगतो ती ऐक. (४८२)

विशेष (विचित्र) अशा लाटांच्या आकाराची गर्भगृहाची (छप्पराची) स्थापना करावयाची कामे (ऐक). मुखशालेच्या भिंतीच्या दुप्पट वरच्या भागाची (ऊर्ध्वमण्डलम्) जाडी असते. (४८३)

[भिंतीच्या वर असलेल्या या थराची जाडी भिंतीच्या जाडीच्या दुप्पट असते.]

(भिंतीच्या वरचा) जो पहिला थर त्याचे तीन भाग करावेत. त्यातील सर्वप्रथम (सर्वात खालचा) भाग पट्टी असते. {पाषाणांचे वरचे जे दोन भाग असतात ते काहीसे आत आलेले असतात.} (४८४)

यातील (खालचे) दोन भाग भिंतीच्या जाडीत काहीसे आतल्या बाजूला वाढविलेले असतात. ही पहिली लहरी (लाट) लहरी पट्टी (पट्टी स्वरूपातील लाट) म्हणून प्रसिद्ध आहे. (४८५)

पट्टीच्या या थरासाठी (त्याच्या उंचीत) सुंदर अखंड पाषाण वापरावेत. रुंदीत व उंचीत एकच (अखंड) पाषाणाच्या या थराला आद्यवर्तिका (पहिली श्रेणी) म्हणतात. {भिंतीच्या जाडीच्या दुप्पट जाडीच्या व उंचीत एकच (अखंड) पाषाण असलेल्या या थराला आद्यबन्धना म्हणतात.} (४८६)

पट्टीच्या जागी तिच्या आकारात वेली, (फुलांचे) गुच्छ इत्यादी व पुन्हा नाना आकारांच्या वेलबुट्टींची नक्षी (व) फुलांच्या रांगांची नक्षी केलेली असते.[१] (४८७)

भिंतीचा वरचा भाग (ऊर्ध्ववाड) किंवा वास्तुबन्धना म्हणून माहित असलेल्या या भागाचे प्राधान्याने पट्टी, पत्र (पाने) व गवाक्ष असे तीन भाग सांगतात. (४८८)

[वास्तुबन्धना – वास्तूच्या खालच्या (भिंतीच्या) व वरच्या (छप्पराच्या) भागांना जोडणारा भाग]

लौकीक भाषेत त्यांना (अनुक्रमे) फेणी, वाडान्त व लहरीतल म्हणतात. पट्टीच्या वरील अर्धा भाग (पट्टीच्या वरच्या दोन भागांपैकी एक भाग) मेघाच्या आकृतीप्रमाणे {कमळाच्या पाकळीप्रमाणे} तिरपा असतो. (४८९)

बुद्धीमान शिल्पीने (तेथे) कमळाच्या पानाप्रमाणे असलेली उत्कृष्ट पाने कोरावीत. तेथील खालची जागा कासवाच्या पाठीप्रमाणे असून तिच्या रुंदीनंतर (अवधि) आतमध्ये गेलेली असते. (४९०)

(त्याच्या) वरच्या भागाची जाडी (व पुढील बाजू) पट्टीच्या जागेच्या स्वरूपाप्रमाणे करावी. हा भाग पट्टी व फेणी यांना जोडावा. याचा सपाट फळीप्रमाणे असलेला (पृष्ठभाग) दोन भागांत विभागलेला असतो. (४९१)

अशा रीतीने बनविलेल्या या भागाला ' गवाक्षभिंत ' म्हणतात. (मुखशालेच्या) लांबीवर तसेच रुंदीवर सर्व जागी (चौफेर) हा भाग असतो. (४९२)

त्याच्या रुंदीच्या रेघांना अनुसरून लांबीत दोन भाग पाडावेत. त्यातील एका भागाला लौकिक भाषेत जाळी म्हणतात. (४९३)

तिला विश्वकर्म्याच्या मताने ' गवाक्षिका ' म्हणतात. हा भाग मजबूत व स्थैर्ययुक्त बसविल्यानंतर त्याच्यावर पाच भाग रेखावेत. (४९४)

किंवा काही वेळेला लांबीत व रुंदीत सात भाग प्रामुख्याने पाडतात. त्यानंतर पहिली रांग प्रधान समजून कोरीव काम करावे. (४९५)

---

[१] चौऱ्यांशी येथील वाराहीच्या देवळांत अशी नक्षी आहे.

जर पहिल्या भागात वरचेवर खोदकाम करून खोलवा (गौरहरा?) केला असेल तर दुसऱ्या रांगेतील पहिल्या भागात चांगली पट्टी (सपाट भाग) करावी. (४९६)

अशा अनुक्रमाला अनुसरून मनोहर जाळी करावी. जाळीच्या भागाच्या बाजूला भारकेन्द्राधिप असे गण (भारभैरव) असावेत. (४९७)

{गर्भगृहाच्या आतल्या भागी केवळ सुंदर पट्टी (या भागी) असावी. खालचे दोन विभाग मिळून एक अंतर्गमन असलेली पट्टी असावी.}

[हा श्लोक हस्तलिखित २ मध्ये नाही.]

अशा अनुक्रमाने भिंतींच्या वरच्या भागाची माहिती सांगितली. यास भिंतीचे(च) काम म्हणतात. (इतर भागांविषयी) यथाथोग्य अशी माहिती सांगणार आहे. (४९८)

[हा लहरा भागाचा पहिला थर छप्पराचा भाग न मानता भिंतीचाच सर्वात वरचा थर मानतात.]

**छप्पराचे बांधकाम** (छायाचित्र २८ व २९)

अशा रीतीने (छप्पराच्या) निरनिराळ्या अंगांचे प्रकार, त्यांचा बांधावयाचा अनुक्रम, तसेच त्यांचे गुणधर्म ही संक्षेपाने सांगतो. (मात्र ही सर्व कामे) शिल्पीशिवाय निष्फळ आहेत. (४९९)

सर्वांनी अनुमती दिलेल्या (प्रमाण मानलेल्या) (शिल्प-) शास्त्राप्रमाणे जरी हे काम केले तरीही, त्याबाबतचे प्रत्यक्ष ज्ञान (अनुभव) असल्याशिवााय हे काम फार अवघड होऊन बसते. (५००)

शिष्या, मुखशाला व मंडप यांची संपूर्ण मााहिती व्हावी म्हणून ऐक. (मुख-) शालेचा वरचा भाग (तिचे छप्पर) कसा बांधावयास हवा, (५०१)

(तर) ती शाला (तिचे छप्पर) लाटांच्या आकाराप्रमाणे असून कळसाकडे जाताना अरुंद होत जाते. पहिली लहराभूमी (नेहमी) अत्यंत काळजीपूर्वक बांधावयास हवी. (५०२)

भिंतीची जी जाडी असेल त्याच्या दुप्पट जाडीचा वरचा थर असतो. (भिंतीच्या जाडीचे) पाच भाग केले असता एक भागाने या थराच्या पाषाणांची उंची असते. (?) (५०३)

पाषाणाच्या रुंदीचे दहा (विश्व) विभाग करून त्यातील एक भाग गर्भगृहांत (रुंदी कमी करण्यासाठी म्हणून) आलेला असून त्याला गोलाकार दिलेला असतो. त्या पाषाणाच्या मुखापाशी (बाहेरील बाजूला) त्या पाषाणाच्या उंचीत कोठेही छेद देऊ नये. (तो भाग सपाट असतो.) (५०४)

अशा आकाराच्या या शिलेची रुंदी तीन भागांत विभागली असता (भिंतीच्या बाहेर) ती एक भाग येईल अशा रीतीने तिची रुंदी बाहेरील भागापर्यंत ठरवावी. (५०५)

[भिंतीची जाडी जर क्ष असेल तर या थरांत वापरावयाच्या दगडाची जाडी (म्हणजेच रुंदी) (११/३ + १/१०) क्ष असते. यातील १/१० क्ष भाग गर्भगृहात आलेला असतो. या पाषाणाची उंची भिंतीच्या जाडीच्या १/५ (म्हणजेच १/५ क्ष) असते.]

या पाषाणाच्या या (बाहेरील) भागी (उंचीवर) चित्रविचित्र असे गुंफलेले नक्षीकाम केलेले असते. तेथील या नक्षीला ' राजबन्ध ' असे नाव दिले आहे. (५०६)

{वरच्या भागात चित्रविचित्र असे मण्यांचे नक्षीकाम करावे. खालच्या भागात पाण्याच्या थेंबांची रांग असून मध्यभागाला राजबन्ध म्हणतात. (५०६)}

**राजबन्ध** (छायाचित्रे **२९ आ** व **३०**)

राजा, राजपुत्र, सचिव, पुरोहित या सर्वांच्या जिवंत दिसणाऱ्या मूर्तींचे येथे कोरीव काम करावे. (५०७)

राजा चतुरंग सैन्याने वेढलेला, प्रियकर प्रेयसींनी वेढलेला, मंत्री मित्रांच्या गराड्यात व हेरांनी वेढलेली सभा, (५०८)

रथ, हत्ती, घोडे, चतुरंग सैन्य इत्यादी हे निरनिराळ्या आकारात व शोभिवंत असे केलेले असतात, यास राजबंध म्हणतात असे ऐकतो. (५०९)

एक निरुंद पट्टी चारी बाजूंना जाणारी अशी असून तिच्या (उंचीच्या) मध्यभागी शोभिवंत नक्षीकाम कोरावे. (५१०)

प्रासाद बांधतांना त्याचे प्रमुख (अवयव) जरी (शिल्प-) शास्त्रात दिल्याप्रमाणे करावयास हवेत तरी राजबन्धामध्ये असलेले उत्कृष्ट मूर्तीकाम (शिल्पीने त्याच्या मनाजोगते करावे.) (५११)

देश, काल, तसेच (शिल्पीची मूर्ती तयार करावयाची) पात्रता यांच्या ज्ञानाला अनुसरून अनेक प्रकारच्या शोभिवंत मूर्ती कराव्यात. (५१२)

याच्या (लहराभूमीच्या)वर समपातळीत अशा पाषाणांच्या फलकांची रांग ठेवावी. हे पाषाण राजबन्धासाठी वापरलेल्या पाषाणांप्रमाणे असून त्यांची रुंदी या पाषाणांच्या रुंदीहून एका भागाने जास्त असते. {राजबंधाची जी रुंदी तिच्या तीन भागांपैकी एका भागाने या पाषाणांची रुंदी वाढवावी.} (५१३)

शिलेची रुंदी पाच भागात विभागावी. त्यातील दोन भाग चापाच्या आत असून तीन भाग बाहेरच्या बाजूला (प्रलंबित) केलेले असतात. (५१४)

(त्या पाषाणांचा) गर्भगृहाच्या आत असलेला भाग हा नेहमीच लाटांच्या आकाराप्रमाणे असतो. त्या पाषाणाच्या बाहेरील भागाचे अग्र (पृष्ठभाग) दोन नक्षींच्या थराचे असते. (५१५)

खालच्या थरात मणिबन्ध तसेच वरच्या थरात कुम्भीबन्ध असतो. मणिबन्धातील मण्यांच्या माळा वर्तुळाकृती खोदलेल्या असतात. (छायाचित्र **३०अ**) (५१६)

कुम्भीबन्धाच्या जागेत तिच्या उंचीवर (व्यासरूपे) कमळाची पाने कोरावीत किंवा दंतुरिका (नागमोडी रेघा) व शोभिवंत तोरणांची रांग कोरावी. (५१७)

गर्भगृहातील (छप्पराच्या) अवयवाच्या पहिल्या विभागाची ही माहिती झाली. (या) पहिल्या थराला झाकणारा पाटपाताचा थर त्यावरती असतो. (५१८)

गर्भगृहाच्या रुंदीचे (भिंतीं मधल्या अंतराचे) पाच रेघानी (सहा) भाग करून त्यातील मधले दोन भाग सोडून इतर भागांवर पाटाचे (आवरण) असावे. (५१९)

या पाटाच्या शिला मजबूत व निर्दोष असून शिरा (कीट) वगैरेंनी अधु झालेल्या असू नयेत. या अक्षत (अखंड) शिला प्रयत्नाने उतरत्या अशा बसवाव्यात. (५२०)

[श्लोक ५१९ व ५२० हे श्लोक ५२३ नंतर यावयास हवेत.]

**पाट-शिला** (छायाचित्र **३१अ**)

{मुखशालेला अनुसरुन असलेल्या पाट-(शिलेचे) पाच प्रकार आहेत. त्या ज्या जागी (छप्परावर) ठेवतात त्या तेथे केवळ (छप्पराच्या एकूण) स्थैर्यासाठी म्हणून असतात. }(५२१)

(सर्व पाषाण) पुढच्या भागी वर्तुळाकार असून शोभून दिसेल अशा रीतीने उतरत्या आकाराचे असतात. ते पाषाण चौरस, आयाताकार किंवा विषमभुज चौकोनाच्या आकाराचे असतात. (५२२)

कोपऱ्यापाशी विषमभुजचौकोनी शिला व (मुखशालेच्या रुंदी व लांबीच्या) बाजूंवर चौरस शिला असतात. या पाट (शिलांचा) पुढचा भाग (खालच्या शिलेच्या) कुम्भीदेशापर्यंत असून मजबूत स्थापन केलेला असतो. (५२३)

गर्भगृहाच्या आत लाकडाचा मजबूत मंच (सांगाडा) बांधावा. { (सांगाड्याच्या) आधाराने पाषाण एकमेकांवर यथायोग्य अनुक्रमाने ठेवावेत.} (५२४)

उरलेल्या भागात चाप क्षेत्राच्या जागी अशा सुंदर लांबट आकाराच्या (व रुंदीने) लांब अशा मजबूत शिला ठेवाव्यात. (५२५)

त्याच्या अग्रभागी शिल्पीश्रेष्ठाने वर्तुळाच्या आकाराची लहान पट्टी कोरावी. ती (पट्टी) वेलबुट्टीने (भूषवावी) किंवा फक्त सपाट व कांतिमान केलेली असावी. (५२६)

भिंतीवरील पट्टीची जागा जशी वसन्ताने (वेलबुट्टीने) अत्यंत शोभिवंत करतात त्याप्रमाणे मजबूत खालचा (पृष्ठ-)भाग एकमेकात गुंतलेल्या वेलींनी (शोभायमान) करावा. (५२७)

वरच्या बाजूला शिल्पीने मजबूत दन्तुरिका कोरावी. हा भाग पाटाच्या वरच्या बाजूला मजबूत होईल असा स्थापन करावा. (५२८)

काही वेळा पाषाणांची रचना वेगळ्या प्रकारे करून पाट(-शिलांचे) आवरण निराळ्या पद्धतीने करतात. (मात्र) पाठीमागचा भाग अशाच गुळगुळीत व उत्तम पाषाणांनी बनविलेला असतो. (५२९)

पाठीमागच्या बाजूला दन्तुरिका असलेली व पोपटाच्या चोची प्रमाणे आकाराची शिला असावी. पाट शिलेच्या वरच्या भागावर चढलेली ही शिला खालच्या चापशिलेला (खाली घसरण्यापासून) अवरोध करते. (५३०)

या प्रत्येक संधीपाशी (अर्धगर्भक) कोरीव काम करावे. त्याच्यावर वारा येण्या जाण्याच्या वाटेवर कुंभक व मिथुनाचे (स्त्री-पुरुष जोडीचे) कोरीव काम करावे. (५३१)

प्रवीण शिल्पीने वायव्य-बन्ध (वाऱ्याचा मार्ग) अलंकृत करावा. लहरा भागाची येथे उंची {सर्व लहरा क्षेत्राच्या उंचीच्या एक-चतुर्थांश असावी;} (५३२)

किंवा राजबन्धाच्या उंचीच्या दुप्पट उंची या थराची असावी. ही जागा अत्यंत महत्त्वाची असून तिला ' पीढ ' हे नाव सांगतात. (५३३)

शिल्पशास्त्राला अनुसरून मिथुन, कुम्भ-बंधाच्या नक्षीसाठी हा भाग सारख्या चौरसांत अथवा आयतात विभागावा. (५३४)

जेव्हढी संधींची (निम्नगर्भकांची) संख्या असेल तितक्या संख्यांच्या व त्या आकारांच्या मजबूत धारणी(-शिला) असाव्यात. (५३५)

[श्लोक ५३५ हा श्लोक ५३१ च्या पहिल्या चरणा नंतर यावयास हवा; कारण श्लोक ५३२ ते ५३४ त धारणी शिलांचे वर्णन आहे.]

तेथे फुलांच्या आकाराप्रमाणे असलेल्या कुंभांची नक्षी किंवा वाऱ्यासाठी वाट (जाळी) असावी; किंवा सर्व अंग झाकून टाकील (म्हणजे चारी दिशांना) कुंभ-मिथुन बन्धाची नक्षी कोरावी. (५३६)

कुठल्याही अलंकरणाशिवाय येथे जर वाऱ्यासाठी मार्ग असेल तर त्यास ' वातसंग्रही ' म्हणतात. ती नेहमी फुलांच्या पृष्ठभागाच्या आकाराची असावी. (?) (५३७)

मातेच्या व इष्ट देवतेला अनुसरून बांधलेल्या शोभिवंत मंदिरासाठी प्रसिद्ध असा कुम्भ-मिथुनबन्ध हा उत्कृष्ट असतो यात शंका नाही. (५३८)

**कुंभांचे प्रकार** (छायाचित्र **३१ आ, इ**)

कुंभ व मिथुन (बन्ध) यांचे चार प्रकार ऐक; पूर्णकुम्भ, पर्णकुंभ, कुम्भ-मकर-मालिनी. (५३९)

कुंभाच्या कामासाठी हे चार प्रकार वापरतात. जशी जागा असेल, जसा तिचा आकार असेल त्याप्रमाणे हे काम केले जाते. (५४०)

**पूर्णकुम्भ**

पाषाणाच्या सपाट भागाच्या मध्यभागी महाकालाच्या फळाची आकृती कोरावी. (त्याच्या) वरच्या भागी दोन भागांत दोन सुंदर थर असतात. (५४१)

हा पूर्ण कुम्भ म्हणून माहिती आहे व शिखरावर शोभून दिसतो.

**पर्णकुम्भ**

उभ्या आयताकाराच्या (समूह चतुरस्त्र) जागेची मध्यरेषा आखावी. (५४२)

कल्पना केलेल्या या मध्य रेषेच्या उंचीचे {सहा भाग करावेत व विशेषतः या कुम्भाच्या मध्यभागी पानांचे आकार कोरावेत.} (५४३)

रुंदीचे पाच किंवा सहा (आडवे) भाग कल्पावेत. (वरच्या) पहिल्या भागात कुम्भाची पट्टी (तोंडाचा काठ) व दुसऱ्या भागात कमळाची पाने असतात. (५४४)

तिसऱ्या भागात कुंभाचे मस्तक असून चवथ्या भागात त्याची (कुंभाच्या वरच्या मुखाची) निरुंद पट्टी असावी. त्याच्याखाली (पाचव्या भागात) कुंभाचे पात्र (शरीर) असून सहाव्या भागात त्याचा पाय (पाद) असावा. (५४५)

मध्यरेषेवर सुंदर चंपकाचे खाली लोंबते पान असून ते (जणू कांहीं) कुंभापासूनच निघाले आहे असे दाखवावे.

**मकर मालिनी**

चौरस किंवा आयताकार जागेत मध्यरेषेवर. (५४६)

उलट सुलट मुखे असलेल्या माशांची जोडी कोरावी. श्रेष्ठ शिल्पीने असे हे कुंभाचे प्रकार (योग्य जागी) स्थापन करावेत. (कोरावेत.) (५४७)

**मिथुन-बन्ध** (छायाचित्र **३१ इ**)

मिथुन-बन्ध कोणत्या यंत्राच्या सहाय्याने कोरतात त्याची माहिती ऐक. कामशास्त्रानुसार मिथुन बन्धांचे अनेक प्रकार आहेत. (५४८)

प्राधान्याने काम क्रीडा दाखवावी, झोपलेली अथवा जोडलेली अशी जोडी दाखवू नये. (काम-) शास्त्रात निरनिराळ्या (काम-) क्रीडा सांगितलेल्या आहेत ज्यात केवळ विलासभाव दाखविलेला असतो. (५४९)

(चापशिलेवरती अनुक्रमाने) पाडलेल्या भागांना अनुसरून मिथुन-बंधाचे स्वरूप दाखवावे. लांबीवरती खाली व वरच्या बाजूंना दोन वेलींच्या रेघा दाखवितात. (५५०)

खालच्या बाजूस झुकलेल्या अशा कळ्यांच्या सुंदर रांगा रेखाव्यात. लौकिक भाषेत त्यांना झारा, कलिका किंवा (आ)लम्बिका म्हणतात. (५५१)

त्याच्यावर पूर्वीप्रमाणेच बन्ध म्हणून दोन थर असावेत. पुढच्या व मागच्या (म्हणजे मुखशालेच्या चौफेर) सर्व जागी लहान आकारात नृप-मण्डल (राजबन्ध) कोरावे. (५५२)

(किंवा) पुन्हा त्या वरच्या जागी काहीशा लहान आकारात नेहमीच अनुक्रमाने कुंभांची रांग (कुम्भीबन्ध) कोरावी. (५५३)

**पाटशिला ठेवण्याची पद्धत (छप्पर झाकण्याची रीत)** (छायाचित्र ३१अ)

सर्वात शेवटी, पूर्वी सांगितलेल्या विभागांनुसार पाट ठेवावेत. यास 'केन्द्रगर्भ' (गर्भगृहाचा मध्य) असे म्हणतात. शुभ काळी हे काम हाती घ्यावे. (५५४)

हा पाटाचा पाषाण भल्या मोठ्या आकाराचा असून (खाली असलेल्या) आधाराच्या सहाय्याने त्याने छप्पर झाकावे. मुखशालेची (छप्पराची) मोकळी जागा झाकावयाचे काम हे पाषाण करतात. (५५५)

हे पाषाण छिद्र, भेगा यांच्याशिवाय असून ते निरनिराळ्या प्रकारच्या दगडांच्या मिश्रणांचे असू नयेत. ते जेव्हां रजसाने (दगडाच्या भुकटीने) जोडले जातात तेव्हा (तो जोड) नेहमीच मजबूत होतो. (५५६)

[मिश्रण शोधनम् म्हणजे भूगर्भशास्त्रदृष्ट्या निरनिराळ्या प्रकारचे दगड येथे वापरू नयेत. एकच प्रकारचा दगड वापरावा; कारण निरनिराळ्या प्रकारच्या दगडांची धारणाशक्ती वेगळी वेगळी असते, त्यांचा उष्णता प्रसरणांक देखिल वेगळा असतो. येथे वापरावयाचे दगड असे असावेत कीं त्यांची धारणाशक्ती जास्त असावीच पण त्याचवेळेला सारखी असावी. रजस याचा अर्थ कराल (किंवा वज्रचूर्ण) असा असावा. दगडाची भुकटी, राळ, मध आणि चुना यांच्या मिश्रणास कराल म्हणतात.]

(शिष्या, तुला) समाजावे म्हणून शिल्पशास्त्रातील या (विषया) बद्दलची माहिती संक्षेपाने वर्णन करून सांगतो. (कारण) मात्स्य, आग्नेय इत्यादी (पुराणांत) ग्रंथांत व इतर (शिल्प शास्त्रावरील) ग्रंथांत याबाबत निरनिराळी माहिती दिली आहे. (५५७)

[इतर ग्रंथात छप्पर झाकण्याच्या निरनिराळ्या पद्धती दिल्या असल्या तरी त्यातील योग्य व या देशात वापरली जाणारी पद्धत सांगतो असा या श्लोकाचा भावार्थ आहे.]

(तसेच) शुक्राचार्यांनी केलेल्या (शिल्पशास्त्रावरील) ग्रंथांत त्याचप्रमाणे विश्वकर्म्याची (शिल्प) पद्धती सांगणाऱ्या ग्रंथात (निरनिराळ्या) देशात वापरली जाणारी व त्या ग्रंथांत अनुसरलेली पद्धत दिलेली आहे. (५५८)

[शिल्प सारणीत माहिती दिली आहे, '' कलेचे दोन प्रमुख प्रकार आहेत : विश्वकर्म्याला अनुसरून असलेली कला देवांना प्रसन्न करणारी असते, व ज्या कलेने असुरांना आनंद होतो ती शुक्राचार्य प्रणित कला होय.

जी कला सौम्य, शुभ व अनुरूप असते ती नेहमीच देवांना आनंद देणारी असते. जी कला कर्कश, विरूप व तामस असते ती असुरांना आनंद देणारी असते. ''

इंग्रजी भाषांतरात जास्त माहिती दिली आहे. पुरीच्या अपर्ति महापात्राच्या म्हणण्याप्रमाणे हल्ली सुद्धा देवांच्या मूर्ती आणि देवांना आवडणाऱ्यांच्या मूर्ती या समअक्ष, योग्य तो तोल सांभाळणाऱ्या, शांत व प्रसन्न मुद्रेच्या असून त्या विश्वकर्म्याच्या मतानुसार केलेल्या समजतात. या उलट असुर, राक्षस, कीकट, कौतूहल, किन्नर, यक्ष यांच्या मूर्ती तसेच समअक्ष नसलेल्या, भेसूर, विरूप व भयानक भावना दर्शविणाऱ्या मूर्ती या शुक्राचार्यांच्या मतानुसार करतात. विराल हे विश्वकर्म्याच्या मतानुसार असतात पण जेव्हां त्यांना निरनिराळ्या प्राण्यांची डोके लावली जावून त्यांचे कौतूहलात रूपांतर होते तेव्हां ते शुक्राचार्य पद्धतीनुसार होतात.

नक्षींच्या बाबतीत देखिल अशा दोन पद्धती आहेत. नियत, प्रसन्न करणाऱ्या, वक्राकार गतीत असणाऱ्या नक्षी विश्वकर्मा मतानुसार समजतात. या उलट शुक्राचार्यांच्या मताला अनुसरून असलेली नक्षी अनियत तसेच कोपरे असलेली असते. केरी प्रकारची नक्षी शुक्राचार्यप्रणीत समजतात कारण बुद्धांच्या कलेत तिचा वापर केला आहे; या उलट हिंदू स्थपति त्याऐवजी जाळीच्या कामाला प्राधान्य देतात.]

कौलाचार मताप्रमाणे असलेले (शिल्प-)शास्त्र हे (शिल्प-)सारणीला अनुसरून असून कौलाचार मत हे अंशुमत्भेदागम या शिल्पशास्त्राप्रमाणे आहे. (५५९)

[शिल्पसारणी हा अद्याप न छापलेला ओरिसा पद्धतीच्या शिल्पशास्त्रावर लिहिलेला ग्रंथ असून तो दक्षिण ओरिसातील सर्व स्थपतींना माहिती आहे. उत्कल प्रदेशातील निरनिराळ्या प्रकारच्या देवालयांची त्यात सुस्पष्ट माहिती दिली असून, ही देवालये बांधावयाच्या पद्धती, त्यांच्या निरनिराळ्या अंगांचे परस्परसापेक्ष प्रमाण व मापे यांची माहिती दिली आहे. ही प्रमाणे व मापें मूलभाग किंवा मूल सूत्र (लांबीच्या मापाचे एकक) यांच्या प्रमाणात दिली आहेत.]

सौधिकागमाची वाट पुसत हा (शिल्प) प्रकाश (ग्रंथ) दोन भागात विभागला आहे. प्रथम प्रकाशात (एकच प्रकारची) मुखशाला व {शिखरांचे मात्र अनेक प्रकार सांगितले आहेत.} (५६०)

यांचे या अनुक्रमाने प्रकार सांगितले जातील, या ग्रंथाच्या (आराखड्याचे) हे मुख्य सूत्र आहे. देशातील प्रचलित प्रथेला अनुसरून शिल्पविद्येची याबाबत माहिती देणार आहे. (५६१)

दुसऱ्या प्रकाशात (शिखराच्या) शिल्पाविषयी माहिती देणार आहे. शिल्पविद्येने अलंकृत असा हा ' शिल्पप्रकाश ' नांवाचा ग्रंथ आहे. (५६२)

(निरनिराळ्या) अंगोपांगांची, विभाजनाची, लक्षणांचे प्रकार तसेच यंत्र इत्यादींची माहिती हे या अनुक्रमाने सांगणार आहे. शिल्पशास्त्राची माहिती या लक्षणांनी सांगतात. (५६३)

शिष्यांच्या व त्यांच्याही शिष्यांच्या (शिल्प शास्त्राच्या) शिक्षणासाठी श्लोकानुबद्ध असा हा ग्रंथ लिहिला आहे. त्यात मुखशालेच्या अंगोपांगांची त्याचप्रमाणे शिखराची माहिती दिली आहे. (५६४)

(त्याशिवाय) निरनिराळ्या अवयवांवर करावयाचे शिल्पकाम व त्यांचे प्रकार (यांची
माहिती दिली आहे.)

**ग्रंथकर्त्याचा परिचय**

भार्गवीची कन्या मुशली नदी (हिच्या कांठावर) समुद्राजवळ. (५६५)

अशा प्रदेशाच्या जवळ तान्त्रिकांच्या पुष्कळ कुटुंबांची वस्ती आहे. (हा प्रदेश) स
धौमिमंडलात असून तेथील उद्‌गात्यांच्या कुटुंबात माझा जन्म झाला. (५६६)

माझे वडील, आजोबा इत्यादी सर्व राजाचे सेवक होते. माझ्या वडीलांचे नांव कुलेश
तसेच आईचे संज्ञामयी आहे. (५६७)

कौलाचारांत प्रवीण असलेला व ब्राह्मणांत श्रेष्ठ असलेल्या माझे नांव रामचन्द्र अ
दक्षिण कालिकेने घेरलेल्या श्रीनीलशिखरावर (मी रहातो). (५६८)

माझी इष्ट मूर्ती सर्व सिद्धी देणारा जगन्नाथ असून त्याच्या कृपाप्रसादाने (सं
देवालयांतील) उत्कृष्ट मुखशालेच्या अंगाची माहिती देणारा ग्रंथाचा हा पहिला भाग सम
झाला. (५६९)

श्री कौलाचारपरायण, उद्‌गाता, शिल्पिश्रेष्ठ, भट्टारक रामचन्द्र महापात्र यांनी रचले
' शिल्पप्रकाश ' ग्रन्थाचा पहिला प्रकाश संपला.

□

# दुसरा प्रकाश

## (देवालयाच्या) विमान भागाची माहिती

संसाराच्या पाशांपासून मुक्त होण्यासाठी, कष्ट व संकटे यांच्यापासून सुटका होण्यासाठी कमलनेत्र अशा इष्ट देवतेचे (जगन्नाथाचे) मी स्मरण करतो.

अनेक शिष्य व बुद्धीमान लोकांच्या अनुबोधासाठी जेथे श्रीमूर्ती विराजमान असते अशा विमान भागाची (माहिती) सांगतो. (१)

ज्या वास्तूत (देवमूर्तीसाठी) पीठाची स्थापना केली जाते ती उत्तम पिण्डिकेची जागा समजतात. त्याला चौरसाकृती मन्दिर म्हणतात व तसेच त्यास विमान (ही) म्हणतात. (२)

**प्रासादांचे प्रकार**

निरनिराळ्या (शिल्प-) शास्त्रांनुसार निरनिराळ्या विभाजनांनी प्रासादांचे अनेक प्रकार होतात;

ते असे : एक विभागाचे **मंजुश्री, रत्नसार व मृदंगा.**––(३)

(रथांसह असलेले) **वसुश्री,** तसेच रेखाप्रकारचे **महामेरु,** सुंदर **कैलासशिखर** व अठरा भागांचे **वेताल.** (४)

ज्याच्या रथांच्या अंगांत कोष्ठ असतात असे रथांसह असलेले विमान, प्रासादांचे भूषण तसेच (पृथ्वीचा) अलंकार असा **सुवर्णकूट.** (५)

शिखरावरती सिंह शोभत आहे असे उत्कृष्ट **विमानमालिनी.** विमान बांधावयाच्या कलेतील हे प्रमुख प्रकार आहेत. (६)

जरी लौकिकांत या मन्दिरांची नावे निराळी असली तरीही यांची सर्व अंगोपांगे अलंकारिलेली असल्याने हे बारा (प्रकार) महत्त्वाचे व सर्वोत्कृष्ट सांगतात. (७)

विश्वकर्म्याच्या मताप्रमाणे या सर्वांचे प्रकार, लक्षणांची सूक्ष्म माहिती व त्यांच्यातील भेद हे अनुक्रमाने ऐक. (८)

**मञ्जुश्री** (छायाचित्रे **३२ अ, आ, इ**)

मञ्जुश्री सर्वतोभद्र यंत्राला अनुसरून, मजबूत कूर्मपीठावर बांधतात. पंचकर्म इत्यादी असून भिंतीच्या अर्ध्या उंचीवर बंधना असते. (९)

भिंतीच्या वरच्या कडेला (दुसरी) बन्धना असून ती शिखर इत्यादी (अवयवांना) जोडलेली असते. (१०)



एन ४१३३–६अ

जंघेच्यावर चारी बाजूंना शोभिवंत शिखरे असतात. पुढे, पाठीमागे व दोन्ही बाजूंना मोठी शिखरे असावीत. (११)

{तिच्या (जंघे)वर रेखा (प्रकारचे) शिखर असून तेथे राह, अनर्थ व कोणक (हे भाग असतात.)} अमलकी व इतरांनी हा मञ्जुश्री प्रासाद फारच शोभिवंत दिसतो. (१२)

[भिंतीच्या भागात जे राह, अनर्थ, कोणक हे भाग असतात ते शिखरावर देखिल वरपर्यंत आलेले असतात. भुवनेश्वर येथील राजराणी देवालय याचे उदाहरण आहे.]

**रत्नसार** (छायाचित्रे **३२ई व २३ई)**

(समभद्राकार) तलच्छन्द असून अनेक अलंकारांनी {पागांनी} भूषविलेला असतो. ही शाला (?) शिखराने भूषविलेली असून सिंह व कन्या यांच्या मूर्तींनी शोभिवंत केलेली असते. (१३)

{भिंत व बंधना असलेला खालचा भाग ही त्याच उत्कृष्ट स्वरूपात (समभद्राकार तलच्छन्दांत) असतात.} गर्भस्थानाच्या (भिंतीच्या) दुप्पट (उंचीची) व त्याच स्वरूपाचे शिखर इत्यादी असतात. (१४)

रत्नसार विमानाच्या कोणकाचे (उंचीने) दहा विभाग (दहा आमलकींनी) करतात. ते (विमान) अनर्थाने भूषविलेले असून तसेच सुंदरराह व अनुराह असतात. (१५)

(शिखरावर) लहान शिखरे नसतात व खालच्या भागात नेहमीच नागांचे (नागस्तंभांचे) अलंकार असतात. भिंतीचे आसन सिंह पीठ असून ते ठळक लोंबत्या हारांनी (आलम्बिकांनी भूषविलेले) असते. (१६)

[उदाहरणार्थ भुवनेश्वर येथील सारि देऊळ)

**मृदंगा** (छायाचित्रे **३३ अ, आ, इ**)

वीथीपीठावर खुरा, कोणक इत्यादी (त्यांच्या त्यांच्या) अनुक्रमानुसार असतात. संपूर्ण जंघेचे बारा विभाग पाडलेले असतात. (१७)

प्रत्येक भागावर कोनाड्याच्या आकाराचे (निशाकारे) कोष्ठ (वासगृह) असावे. तसेच राहाच्या प्रदेशावर सर्व अंगोपांगांवर वज्रमस्तकांची रांग असावी. (१८)

भिंतीच्या वरच्या भागाचे सुंदर पीठाच्या आकाराचे तीन भाग असतात. गर्भावरील शिखराचे (गर्भदेश) (उंचीचे) तीन भाग करून त्याला नेहमीच मृदंगाचा आकार देतात. (१९)

वर असलेली आमलकीं अरूंद असून कोणकांवर फुलांची (नक्षी) कोरलेली असते. निम्म्या उंचीपर्यंतच खोदकाम (नक्षीकाम) केलेले खांब (पाग) अनेक अलंकारांनी भूषविलेले असतात. (२०)

[उदाहरण–खिचिंग, जिल्हा मयूरभंज, येथील कुटाई तुण्डी देवीचे देवालय.]

**वसुश्री**

या प्रासादाला नऊ अवयव असतात. खुराच्या आकाराप्रमाणे याचे पीठ असून कोणक इत्यादी अवयवांवर कणि, फेणी व वसन्त असतात. (२१)

गर्भगृहाचा तलच्छंद दहा संख्यांच्या रथांचा असतो. (शिखरावरती) बाजूंना (लहान) शिखरे नसतात. असा (हा) वसुश्री प्रासाद सांगतात. (२२)

**महामेरु** (छायाचित्र **३४**)

महामेरु नावाचा दुसरा प्रकार ऐक. भाग व उप-विभाग यांनी मिळून १०८ विभाग करावेत. (२३)

चौरस जागेत पद्मपीठ असून पंचकर्म इत्यादींनी शोभिवंत असतो. बंधनासह (दोन बंधना असलेली) भिंत तेथे असते. (२४)

गर्भभागापासून मुद्रक भागापर्यंत पाच किंवा सात (लहान) शिखर (अनर्थ पागावर) असतात. प्रत्येक शिखराच्या खालच्या बाजूना (नऊ) भूमी (पीठ) असतात. (२५)

(राहाच्या) दोन्ही बाजूंना असलेल्या अनर्थांवर आमलकींसह शिखर व रथक (कोष्ठ) असतात. सुंदर सिंह, कन्या, (२६)

तसेच तेथे अलसा व भैरव यांच्या मूर्ती जणू काही आमलकींना आधार देत आहेत अशा, शिखरावरील बाजूंवर सर्वत्र स्थापन कराव्यात. (२७)

शोभिवंत अशा राहा क्षेत्रावर मोठे शिखर व (त्यावर) सिंह असतो. प्रत्येक राहाच्या दोन्ही भागांना खालच्या बाजूला (मोठे शिखर व सिंह यांच्या पातळीच्या खाली) रथक (कोष्ठ) असतो. (२८)

नेहमीच मजबूत असे हे अवयव (अंगे) करून निरनिराळ्या मूर्तींचा उपयोग करून, शिल्पीश्रेष्ठाने हा महामेरु प्रासाद अलंकारावा. (२९)

[उदाहरणे–भुवनेश्वर येथील अनंत वासुदेवाचे देवालय व पुरी येथील जगन्नाथाचे देवालय.]

**कैलाश** (छायाचित्र **३५**)

सर्वात सुंदर कैलाशशिखर हा (प्रासादाचा) प्रकार तू ऐक. तेथे निरनिराळ्या जागी तसेच विभागात मनोहर रथ (शिखर) असतात. (३०)

उत्तम जागी भद्रपीठावर पंचकर्म इत्यादींसह असून (शिल्प-) शास्त्राला अनुसरून भिंत, जंघा व अनेक बंधना यांच्यासह असावी. (३१)

शिखराचा पाया (भिंतीच्या बाहेर) अर्ध्या भागाने बाहेर आलेला असतो. मधली बन्धना अरुंद असून पाच रेघांप्रमाणे दिसते. {किंवा पाच भागांनी मिळून केलेली असते.} (३२)

[ओरिसा शैलीच्या शिल्पशास्त्रावरील ग्रंथांत मूल भाग किंवा मूलसूत्र म्हणून मापाचे एकक दिलेले असते. भुवनप्रदीप नावाच्या ग्रंथात हे एकेक सोळा अंगुले दिले आहे. प्रासादाची रुंदी जर १६ अंगुले धरली तर इतर अंगोपांगे या एककाच्या काय प्रमाणांत घ्यावीत त्याची माहिती देतात. तसेच येथे जे मापाचे मूळ एकक धरले असेल त्याच्या निम्म्या प्रमाणात शिखराच्या पायाचा भाग भिंतीच्या बाहेर आलेला असतो.]

(शिखरावरील) प्रत्येक कोणकाचे पाच भाग (भूमि) केलेले असतात. तसेच शिखरावरील कोणकाच्या जवळील अनर्थाचे चार भाग पाडलेले असतात. (३३)

[शिखरावरील अनेक पीठ व त्यावर आमलक मिळून एक भूमि होते. शिखरावरील कोणकाच्या उंचीत अशा पीठांसह पाच आमलकी असतात.]

(तलच्छन्दांत) उपरथ इत्यादींनी पाच भाग करतात (तलच्छंद पंचरथ प्रकारचा असतो.) (चारी) राहांवर एकूण वीस भूमि असून, राहाचे (उंचीत) आठ विभाग करतात. (३४)

कोणकाचे (उंचीत) आठ भाग करून प्रत्येक भागात तीन (दोन) रथ (कोष्ठ) असतात. या जागी ३६ विभाग असून प्रमुखतः त्यांच्याबद्दल विचार करावयास हवा (?) (यास दिग्बंध असे म्हणतात.) (३५)

शिखराच्या भिंतीच्या भागी (?) वरच्या भागी निशापीठ (कोष्ठाचे पीठ) असावे. निशेच्या (कोष्ठाच्या) शेवटी मुद्रकाच्या (वितानाच्या) भागी सुंदर वज्रमस्तक असते. (३६)

कोणकावरील अरुंद रेघ अनुराहाकडे (अनुरथ?) उलटी वळलेली असते. शिखराच्या खालच्या (न्यून) भागाचे प्रथम नऊ भाग करावेत. (३७)

एका भागाने भूमि, (दुसऱ्या भागाने) पट्टी, कणि असे अनुक्रमाने कोरावे. पहिल्यांदा पट्टी असून शेवटी पट्टी व त्यांच्यामध्ये चार कणि (फेणि) असतात. (३८)

त्यानंतर सर्व अंगोपांगे शोभिवंत आहेत असे सुंदर शिखर असावे. तेथील अनर्थाच्या वरच्या भागात पाच भूमि असतात. (३९)

वरील भागाचे समान भाग पाडून शेवटचा भाग थेट कणिकेपर्यंत (चूलिकेपर्यंत) जाणारा असतो. अनर्थाच्या (या) पाच भागात फेणि, फुलि व कोष्ठ इत्यादि असतात. (४०)

प्रत्येक बाजूंवर, पुढे व मागे, उत्तरेकडे {व दक्षिणेकडे नियमांप्रमाणे उप-गर्भगृहे (निशागृहे) असावीत.} (४१)

(त्यांच्यावर) {राहावरती} वज्रमुण्ड व शोभिवंत सिंह इत्यादी असावेत. तसेच कोणकाचे आठ भाग करून (प्रत्येक भागात) फेणिका, कणिका इत्यादी असतात. (४२)

(सर्वांत) वरच्या जागी शोभिवंत गजश्रेष्ठ असतात. आमलकी इत्यादी (अवयवांसह असलेले) हे कैलाश नावाचे गर्भगृह आहे. (४३)

[इंग्रजी भाषांतरांत ' गजराज 'चा अर्थ केला आहे हत्तीला जिंकणारा म्हणजे सिंह. तो योग्य वाटत नाही. भुवनेश्वर येथील लिंगराज देवालयाच्या आमलकीच्या खाली सिंह कोरले आहेत म्हणून असा अर्थ दिला असावा].

रथांमधील (पागांमधील) सर्व अंतरांमध्ये निरनिराळे (कोरीव) काम करावे. देवालय पाच, सात किंवा नऊ रथांचे असेल त्याप्रमाणांत ते असावे. (४४)

[कैलाश प्रकारच्या देवालयाचा तलच्छंद पंचरथ, सप्तरथ अथवा नवरथ प्रकारचा असतो. उदाहरण–भुवनेश्वर येथील लिंगराज देवालय.]

**वैताल** (छायाचित्रे **३६** व **३७**)

वैताल (प्रकारचे) देवालय आयताकार असून त्याची जागा (देखिल) आयताकार असते. त्या जागी सुंदर व मजबूत असे सिंहपीठ अथवा कूर्मपीठ असते. (४५)

त्या पीठाला अनुसरून (व वरती) आयताकार दुसरे कणीच्या आकाराचे (पीठ) असते. त्यानंतर रेघेप्रमाणे दिसणारी खान्दि चारी बाजूंना खोदावी. {आयताकार वीथीपीठाच्या नंतर सपाट पंचकर्म असावा} (४६)

[रेघेप्रमाणे म्हणजे सरळ व समपातळीत, छायाचित्र **११ इ** पहा.]

त्याच्यावरती फक्त पाच भाग असलेली भिंत बांधावी. भिंतीवर सुंदर देवमूर्ती असल्याने तीस विग्रह-बन्ध म्हणतात. (४७)

त्याच्या (विग्रह बन्धाच्या) वर भिंतीच्या वरच्या भागी {भिंतीच्या वर तिच्या रुंदीवर} रेघांची कामे (रेखाकर्म) केलेली असतात. हे रेघांचे काम चारी बाजूंना केलेले असते. (४८)

भिंतीच्या वरच्या भागाच्या वरती अर्ध्या भागात, त्या जागी अनेक प्रकारचे नक्षीकाम केलेले वज्रमस्तक असते. (४९)

शेवटी रुंदीवर सुंदर रेघांसह दोन थर असतात. नंतर कांहींशी कमी खोल अशी खान्दि खोदतात. (५०)

त्या जागी कणिप्रमाणे असणारी, कणीच्या आकाराची पट्टी असावी. वैताल व भैरव प्रकारच्या देवालयाच्या भिंतीची कामे अशी असतात. (५१)

गर्भगृहाच्या रुंदीवर असलेले रेघांचे खोदकाम विशेषाने ऐक. हा भिंतीचा भाग दोन किंवा तीन भागात विभागून खांबाच्या आकाराप्रमाणे थरविभाग असावेत. (५२)

या (थर) विभागात प्रत्येकी तीन संख्यांच्या वसन्त इत्यादी पट्टिका असतात. या प्रत्येक पट्टींच्या मध्ये लांबीवर (म्हणजे दोन्ही बाजूंवर), पूर्व व पश्चिम भागी (पुढच्या व मागच्या भागी) खान्दी असावी. (५३)

रुंदीच्या (राहाच्या) दोन्ही बाजूंना योग्य स्थानी अत्यंत शोभिवंत असे वज्रमस्तक असावे. रुंदीवरती व (वज्रमस्तकाच्या) वर्तुळाकार जागी अनेक प्रकारच्या मूर्ती असतात. (५४)

फक्त चार कोपरे असलेले असा कोणकाला आकार द्यावा. त्याच्या (उंचीच्या) प्रत्येक तीन भागाच्या शेवटी आमलकी असते. (५५)

याच्या वरती जो भिंतीचा भाग असतो त्याचा तलच्छन्द वैतालिका प्रमाणे (आयाताकार) असतो. हा (छप्पराचा) खालचा मजला कूर्मपृष्ठाच्या आकाराप्रमाणे असून त्यास ' आदिताल ' (पहिला मजला) म्हणतात. (५६)

सुंदर अशा चूलाचा आकार दिलेल्या (छप्परावर) फक्त कीर्तिमुख इत्यादी असतात. त्या (छप्पराच्या) कंठाच्या भागापर्यंत वर्तुळाखंडाप्रमाणे (विश्वभागसन्निभं) आकार द्यावा. (५७)

[चूल = लंबगोलाकृति छप्पर]

त्याच्यावरती मजबूत असा तितक्याच उंचीचा दुसरा मजला करतात. जसे (खाली) पीठाचे करतात तसेच येथेही (खालच्या भागाचे उभे) पाच भाग करावेत. (५८)

वरील भाग हा (पुढच्या व मागच्या) बाजूला वर्तुळाकृती असून त्याच्या दोन्ही बाजू गोलाकार असतात. या मजल्याच्या शेवटी दोन्ही बाजूंना तीन विभाग करतात. (५९)

हा (सर्वात वरचा) मस्तकाचा भाग कोणतीही नक्षी अथवा मूर्तीशिवाय असतो. गर्भगाराच्या (या भागात) फक्त पुढच्या बाजूला केवळ निरनिराळ्या नक्षी कोरलेल्या असतात. (६०)

या ठिकाणी भल्या मोठ्या आकाराच्या वज्रमस्तकाची स्थापना करावी. घुमटाकार असलेल्या जागी दहा (विश्व) भाग पाडून तेथे नक्षी कोरावी. (६१)

या तोरणामध्ये शंकराची अथवा भैरवाची मूर्ती खोदावी. या सुंदर अशा (सर्वात) वरच्या भागी नाटाम्बर नावाची मूर्ती असावी असे सांगतात. (६२)

(गर्भगृहाचे) हे मस्तक व कवटीचा भाग (खर्पर भाग) नेहमीच (चेंडूप्रमाणे) गोल (पिच्छिलाकृति) असतो; त्याचप्रमाणे मस्तकाच्या सर्वात शेवटी (वरच्या भागी) लहान कुंभांची (कळसांची) स्थापना करावी. (६३)

(किंवा) एक कुंभ व दोन सिंह असून कुंभाच्या वर मजबूत (बसविलेला) कळस असतो. कुंभाच्या मधल्या भागाचा आकार सुंदर कळी (पट्टी) प्रमाणे असावा. (६४)

[खुम्बर्धे हा शब्द कुम्भोर्ध्वे असा सुधारून अर्थ केला आहे.]

शिल्पीश्रेष्ठाने त्या पट्टावर नक्षी कोरावी. {सिंहाच्या ऐवजी शिखरावर लहान कुंभ असतील तर ते भद्रपीठावर असतात.} (६५)

असा अनेक प्रकारच्या प्रासादांमध्ये वैतालिक (प्रासाद) श्रेष्ठ असतो. हा प्रासाद मातांच्या पूजेसाठी असून त्याला तान्त्रिक सौध म्हणतात. (६६)

[उदाहरण––भुवनेश्वर येथील वैताल देवालय].

यानंतर सौधिकागमांत दिल्याप्रमाणे (देवालयाचे) निरनिराळे विभाग तसेच यंत्र, प्रसंगाप्रसंगाने अनुक्रमाने, त्यांचे प्रकार (इत्यादी) सांगीन. (६७)

**रथयुक्त** (छायाचित्रे ३८, ३९ व आकृति १२)

शिल्पशास्त्राला अनुसरून (प्रासादाच्या) प्राथमिक विभागणीचे काम व त्याच्या गर्भगृहाचे रथांमुळे होणारे अनेक प्रकार अनुक्रमाने सांगतो. (६८)

**भैरवयंत्र**

**आकृती १२––भैरव यंत्र**
२.६९–७२

तू प्रथम भैरवयंत्रावर (आधारीत) मंदिराची (माहिती) ऐक. हे यंत्र भैरव-रुद्राच्या वसतीसाठी असून सिद्धी प्रदान करणारे आहे. (६९)

मध्यभागी कर्णिका असून तिच्या भोवती वर्तुळामध्ये वर्तुळाकार आठ पाकळ्यांचे कमळ असते. (या वर्तुळाच्या) मस्तकभागी वर्तुळाकृती नाग असून पश्चिमेच्या (पाठीमागच्या बाजूला) पाठ (शेपटी) मुखाला गुंडाळलेली असते. (७०)

[आकृती १२ पहा.]

तेथे चार दारांचे तटबंदीयुक्त नगर (पुर) असून त्या (चार) दारांमध्ये

(दारांमधल्या जागेत) भुजंग असतो. परत त्याच स्वरूपाचे भाग असलेले चार दारांचे पुर (बाहेरील) मर्यादेपर्यंत असते. (७१)

प्रत्येक कोपऱ्यात रेघांनी आकार दिलेल्या अशा कर्णिका (कोपरे) आखाव्यात. हे भैरव यंत्र असून शिवाच्या पूजेसाठी (योग्य) सांगतात. (७२)

या यंत्राला अनुसरून उत्तम प्रासाद बांधावा. या यंत्रात काही वैगुण्य राहिले तर देवालय बांधणे निष्फळ होते. (७३)

या नंतर या वसतीस्थानाचे (पुर) प्रकार व ते नेहमी बांधावयाच्या पद्धती ऐक. याची जागा वीथीपीठावर असून (तेथे) कोणक इत्यादी करू नयेत. (७४)

कोणकाचा निराळा असा भाग खोदल्याने या यंत्रात वैगुण्य येते. भिंतीमध्ये केवळ त्या आकाराचा अनर्थपाग असतो. (७५)

पीठावरती दाराच्या दोन्ही बाजूंना कीलक (पाचरीचा आकार) द्यावा. त्या जागी निरनिराळी नक्षी कोरून {अनर्थ करावा} ती शोभिवंत करावी. (७६)

खुर उंचीने जास्त आकाराचा व कुंभक केवळ फुगीर आकाराचा, (त्यावर) भोपळ्याच्या आकाराचा कुंभ असे (केवळ) रेघांनी आखलेले (पीढ) असावे. (७७)

काहीशा वक्राकार अशा त्या जागी तीन विभागांत (त्रिरेखे, त्रिभागे) मूर्ती खोदावी. त्याच्यावरती तीन भाग {पाच भाग} कळ्यांची नक्षी असलेली वसन्तपट्टी असते. (७८)

तीच्यावरती जंघेच्या स्वरूपात खांबांच्या आकारात लहानशी विमानिका असते. तेथे पट्टी, फेणी व पद्म व त्याच्यावर वज्रमस्तक असते. (७९)

सुंदर राहाच्या दोनही बाजूंना केवळ कीलकक्षेत्र असते. त्यानंतरच्या (दोन्ही) बाजूंना भिंत अनर्थाप्रमाणे खोदावी. (८०)

(देवालयाच्या) पाठीमागे व दोन्ही बाजूंना दाराप्रमाणे दिसणारे व तेथील दाराच्या जवळ कोष्ठ (निशा) असतात. जंघेप्रमाणेच सारखे विभाग असलेले मोठे खांब तेथे असतात. (८१)

याच्यावरती तीन विभागांसह सारखेच भाग असलेला मुद्रक (शीर्ष) भाग असावा. त्या जागी अनेक प्रकारच्या मूर्ती (किंवा) भैरवाची मूर्ती खोदतात. (८२)

असे भिंतीचे विभाग असून ते कोणत्याही खोदकामाशिवाय (अक्षुण्ण) असतात. तीच्या-(भिंती-) वर शोभिवंत असे शिखर (गर्भक) करतात. (८३)

यंत्राच्या रेषांबरहुकूम आखलेले व मुख्य भाग अलंकारांनी भूषविलेले असतात. कोणक पाच भागात विभागून त्यांचे प्रत्येकी तीन भाग करावेत. {त्या प्रत्येक भागात तीन भूमि असाव्यात}. (८४)

ज्या भागात रेघा खोदलेल्या असतात त्याला रेखभाग म्हणतात. खालपासून सुरुवात करून शेवटापर्यंत { भिंतीपासून सुरुवात करून गळ्यापर्यंत } त्यांची संख्या पाच असते. (८५)

त्या (रेघांच्या) जागी आमलकीच्या आकाराच्या शिलांची योजना करावी. {कोणक व अनर्थ यांच्या मधल्या भागी जास्त अंतर्गमन असलेला अनुराह असावा (हस्तलिखित १)}. (८६)

मुख्य कोणक भागाच्या रुंदीच्या निम्मे रुंदीचा जास्त अंतर्गमन असलेला भाग (गर्भक स्थल) असावा. या जास्त अंतर्गमन असलेल्या भागातील पोकळीत शोभिवंत फुले वगैरे रेखावीत. (८७)

त्या पोकळीतील जागी मनोहर अशा नर्तकी व कामबन्ध कोरावेत. त्याच्या बाजूला असलेल्या अनर्थाची रुंदी (अनुराहाच्या रुंदीच्या) दुप्पट असते. (८८)

कोणकाचे जर पाच भाग केले असतील तर अनर्थाचे दहा {वीस} भाग करतात. प्रत्येक भागात रेखांच्या सहाय्याने भैरवाच्या मूर्ती रेखतात. (८९)

[भैरवाच्या मूर्तीला खोली नसून केवळ रेघांनी ती दाखविलेली असते.]

### भैरवांचे प्रकार

तंत्रशास्त्राला अनुसरून जे भैरवांचे प्रकार आहेत ते ऐक. असितांग, सितांग, एकांघ्रि, कालभैरव, (९०)

{तसेच महाकाल व कालाग्नि, वीरभद्र व महान वटुक असे भैरवांचे आठ प्रकार असून, त्यांनी प्रासाद नेहमीच अलंकृत करावा. (९१)

कोणकाच्या वर व कण्ठापाशी पशुराजाने (सिंह मूर्तीने) अलंकरण करावे. गर्भगृहाचा वरचा भाग संपूर्ण झाकून टाकील असा खर्पर पाषाण असावा.} (९२)

त्याच्याच मापाची व आकाराची आमलकीच्या आकाराची मजबूत शिला असावी. ती वर्तुळाकार असून त्या वर्तुळात कोठेही छिद्र (दोष) नाहीत (अशी ती शिला असावी.) (९३)

आमलकी शिलेचा केन्द्रबिंदू (गर्भकबिन्दू) {हा गर्भयंत्राच्या (तलच्छन्दाच्या) मध्यबिन्दूच्या अचूक वर असतो.} महान (भव्य) आमलकी या अनुक्रमाने (शिखरावर) बसवावी. (९४)

आमलकीचा वरचा भाग, तिच्यावरती, कवटीच्या आकाराचा (खर्पराकृती) असावा. चौरस पिण्डिकेच्यावर तेथे कळस असतो. (९५)

[पिण्डिका–आमलकीच्या वर चौरस सपाट शिळा असते तीस म्हणतात.]

त्रिरथ गर्भगृहाच्या कामाच्या बाबतीत अशी विभागणी असते; खालच्या बाजूला (आडवे) १४ व वरती २४ भाग असतात. (९६)

(भिंतीतील) अनर्थ वगैरे तीन भागांचे असून शिखराचे (ऊर्ध्वमंडल) पाच भाग असतात. पीठावर {कंठावर} सिंह व कन्यांच्या मूर्ती असतात. भिंत व कळस शोभिवंत करावेत. (९७)

[उदाहरण–भुवनेश्वर येथील परशुरामेश्वराचे मंदिर.]

{ दुसरा प्रकार }.

उत्तम पंचरथ देवालयाचे (तलच्छंदाचे) दहा विभाग असतात. पीठाच्यावर पंचकर्म व सुंदर जंघा असते. (९८)

पुन्हा जास्त उंचीची वरची जंघा असते, बन्धाच्यावर कोष्ठ इत्यादी असतात. अनर्थांना झाकणारा कंठ (भाग) असून त्यावर आमलकीच्या स्वरूपात शीर्ष झाकणारा पाषाण (मुद्रका) असतो. (९९)

**हेमकूट प्रासाद** (छायाचित्रे **४० व ४१अ**)

बावीस भाग असलेल्या हेमकूट (प्रासाद) बांधावयाची रीत ऐक. प्रत्येक भागात {लहान} आडवी पडलेली (बसकी) सुंदर शिखरे असतात. (१००)

चारी बाजूंना एकूण २४ संख्यांची शिखरे असतात व राह भागावर वज्रमस्तक खोदलेले असते. (१०१)

पंचकर्म व जंघा इत्यादी कामे खालच्या बाजूला शोभिवंत करणारी असतात. खुर इत्यादींमुळे सुंदर दिसणारे मुख्य पंचकर्म करावे. (१०२)

फक्त वरच्या भागी दोन भागांसह त्रिकूट असावे. लांबट च्छेद (उथळ खान्दि) वगैरेंनी खोदलेले शिखर असते. (१०३)

खर्परकूटापाशी (सर्वात वरील कवटीच्या आकाराच्या शिखरापाशी) चारी बाजूंना (चार) सिंह असतात. त्याच्यावर सुवर्णाची सुंदर शिखेच्या आकाराची दोन शिखरे असतात. (१०४)

कळसाच्या दोन्ही बाजूंना सिंह इत्यादींनी सुशोभित केलेले असते. तंत्रशास्त्राला अनुसरून यास स्वर्णकूट असे म्हणतात. (१०५)

[उदाहरण–भुवनेश्वर येथील गौरी देवालय. या प्रकारच्या देवालयाविषयी जास्त माहिती पुढे श्लोक २.६९७–७०५ मध्ये दिली आहे.]

**शिखराच्या निरनिराळ्या अवयवांची सामान्य माहिती** [१]

**कोणक भाग** (छायाचित्रे **४२ व ४३**)

देश व काल यांना अनुसरून अनेक आकारांचे तसेच विभागांचे असे (देवालयांचे) नेहमीच विशिष्ट भाग (अवयव) असतात. शिष्यांनो, ते मी सांगतो, ऐका. (१०६)

---

[१] श्लोक १०६ ते १५१ मध्ये दिलेल्या निरनिराळ्या एकेकट्या अवयवांची ओळख, काही थोडे अवयव सोडता, अनुमानाने दिली आहे कारण या श्लोकांत दिलेले वर्णन एव्हढे स्पष्ट नाही.

(देवालयाचे) भाग व उप विभाग केले नाही तर (देवालय बांधणे) म्हणजे केवळ (ढोर) मेहनत होईल. आठ किंवा पाच भागांनी कोणक पाग होतो. {(कोणकाच्या रुंदीच्या) मध्यभागी आठ किंवा पाच भूमी असतात.} (१०७)

**प्रकार १.**——हे (पाच किंवा आठ भाग) प्रामुख्याने आमलकींसह असतात. कोणकाच्या (अशा) एका विभागामध्ये (खालच्या आमलकीपासून वरच्या आमलकीपर्यंत) तीन भाग असतात. (१०८)

[उदाहरण–पुरुलिया जवळील छर्रा येथील रेखा प्रकारचे देवालय. आर. डी. बानर्जी यांचे " History of Orissa " चे पान १२० पहा.]

**प्रकार २.**——दुसरा प्रकार ऐक; येथे आमलकींमधील अंतरात पीठाच्या आकाराप्रमाणे फेणि असून छेद व उपच्छेद (एकूण) चार असतात. (१०९)

[दोन थरांमध्ये जो विशेष अंतर्गमन झालेला भाग असतो त्याला च्छेद म्हणतात. उदाहरण भुवनेश्वर येथील वैताल देवालय. (छायाचित्रे ३६ व ३७)]

**प्रकार ३.**——खालच्या बाजूला समान (पण) कमी (उंचीचे) विभाग असून वरच्या बाजूला आमलकीचा भाग असतो. (यातील) तिसरा भाग हा कणिकेच्या आकाराचा असतो. (११०)

**प्रकार ४.**——{वरच्या बाजूला एकमेकांस जोडलेल्या दोन फेणि असून} तसेच दोन कोणाकृती छेद असतात; यांच्या खाली व वर लहान छेदांना अनुसरून रेघांचे काम केलेले असते. (१११)

[उदाहरण——भुवनेश्वर येथील मोहिनी देवालय. (छायाचित्र **४२आ**)]

**प्रकार ५.**——मध्यभागी रथकासह (कोष्ठासह) असल्यास कोणकाचा वेगळा प्रकार होतो. कुंभाच्या आकाराचे थर असून, छेदांच्या मध्यभागी रथकांच्या आकृती असतात. (११२)

[उदाहरण——भुवनेश्वर येथील मार्कंडेयेश्वराचे देवालय. (छायाचित्र **४२इ**)]

**प्रकार ६.**——(शिल्पकामात) प्रवीण अशा शिल्पीने केवळ खोदकाम केलेले असते. (अशा कोणकास) छेदकोण म्हणतात, {व सारख्या अंतरावर त्यांच्या (छेदकामाच्या) मध्यभागी फक्त वज्रमस्तक असते.} (११३)

[उदाहरण——भुवनेश्वर येथील परशुरामेश्वराचे मंदिर (छायाचित्र **३९**)]

**प्रकार ७.**——{सुंदर रेखाप्रकारच्या देवालयाच्या} कोणकांत आमलकींसह (आमलकी ते आमलकी या जागेचे) आठ विभाग करून त्याचे अनेक प्रकार होतात. (११४)

[उदाहरण——भुवनेश्वर येथील अनंत वासुदेवाचे देवालय (छायाचित्र **३४**)]

**प्रकार ८.**——कोणकाचे थर वर्तुळाकृती पीठाप्रमाणे {चौरसाकृती भद्रपीठाप्रमाणे} असून छेदांच्या प्रकारामुळे अनेक आकारांचे कोण(क) होतात. ही कोणकाची माहिती सांगितली. (११५)

[उदाहरण—— भुवनेश्वर येथील मुक्तेश्वर, केदारेश्वर, ब्रह्मेश्वर, भास्करेश्वर ही देवालये.]

**अनुराह भाग** (छायाचित्र ४४)

अनुराह इत्यादी भाग मी येथे संक्षेपाने (सांगतो), ऐक. अनर्थ व राह यांच्यामध्ये {लहान खांबाच्या आकाराचा (अनुराह) असतो.} (११६)

कोणकाच्या बाजूला व अनर्थ यांच्या मध्यभागी काही वेळेला अनुराह असतात, त्यांना धार ही संज्ञा आहे. (११७)

हे तीन प्रकारचे सांगतात, गुण, कुंभ व गृह. {निरनिराळ्या पट्ट्यांच्या स्वरूपात त्यांच्यावर काम केलेले असते} आणि निरनिराळ्या तऱ्हेच्या (सूक्ष्म) कामात फक्त फरक असतो. (११८)

अनुराहाची तेथील जागा (अरुंद व) लांब आकाराची असते. त्यांच्या रुंदीला अनुसरून त्याच्या लांबीचे सारख्या (लांबीचे) विभाग केलेले असतात. (११९)

(खालच्या) बन्धनाच्या जागेपासून सुरुवात करून (शिखरावरील) कंठस्थलापर्यंत असलेला अनुराहाचा भाग शोभिवंत असून त्याच्या लांबीचा आकार सर्वत्र सारख्या रुंदीचा असावा. (१२०)

**गुण.**——यात सारख्या विभागांमध्ये {खांब व घुमटाकार तोरण} असतात. त्याच्या (अनुराहाच्या) रुंदीत, त्या विभागामध्ये, रेखा खोदलेल्या असतात. (१२१)

[उदाहरण—— भुवनेश्वर येथील मुक्तेश्वराचे देवालय.]

**कुंभ.**——प्रत्येक थरांत कुंभिका असून हे कुंभाचे आकार (एकावर एक) असे अनुक्रमाने ठेवलेले असतात.

[उदाहरण——भुवनेश्वर येथील चित्रकारिणी देवालय.]

**गृह.**——गृहांच्या (कोष्ठांच्या) घरांमधील अंतरात रेघांनी फुलांचे आकार कोरलेले असतात. (१२२)

[उदाहरण——भुवनेश्वर येथील भास्करेश्वर देवालय]

क्वचित निरनिराळ्या आकारांची पाषाणांवर (वर दिलेल्याहून) वेगळी वेगळी कामे (कर्म पार्थक्य) केलेली असतात, (त्यामुळे जास्त प्रकार होतात) मात्र मुख्य हे तीन प्रकार आहेत. अशी ही अनुराहाची माहिती झाली. (१२३)

काही वेळेला देशी रीतीप्रमाणे मिश्रबन्धांत तो (अनुराह) करतात. (म्हणजे या तीन प्रकारांपैकी) दोन निरनिराळ्या प्रकारांनी, कुंभिका इत्यादींनी तो (मिश्रबन्ध) केला जातो. (१२४)

**अनर्थवन्ध** (छायाचित्र **४५अ**)

आता नंतर अनर्थाच्या सुंदर थर विभागांचे (बंधांचे) प्रकार ऐक. देवालयासाठी अनर्थ हे प्राधान्येकरून पाच प्रकारचे असतात. (१२५)

निरनिराळ्या उत्तम रथांच्या (तलच्छन्दांतील) अनर्थांचे (प्रकार आहेत.) पट्टिका, कुंभ, पद्मकेशर, रथक व मंडलद्वार {द्वार-मंडल.} (१२६)

**पट्टिका.**——खालपासून शिखरापर्यंत फक्त लहान जागांमध्ये (विभागणाऱ्या उभ्या) रेघांनी व (आडव्या) छेदांनी नक्षी केलेली असते त्यास (पट्टिका) अनर्थ म्हणतात. (१२७)

[उदाहरण–भुवनेश्वर येथील मोहिनी देवालय (छायाचित्रे **४२आ** व **४४इ**)]

पट्टिका अनर्थ अधम प्रकारचा असून कुंभक प्रकारचा मध्यम असतो. अनर्थावर अत्यंत शोभिवंत अशी केशरबंधना श्रेष्ठ असते. (१२८)

**कुम्भ.**——जागेच्या दोन भागांत कळसाच्या आकाराप्रमाणे कुंभाचा आकार असावा. खालच्या बाजूला कुंभाचा पाया व वरती {कुंभाच्या उदराचा भाग असतो.} (१२९)

[कलिकाकृति असे तिन्ही हस्तलिखितांत लिहिलेले असले तरी श्लोक १३० वरून तेथे कलशाकृति असा शब्द असावयास हवा.]

कळसाच्या आकाराचा कोरून काढलेला कुंभ करावा.

**पद्मकेशर.**——पद्मकेशराची कल्पना लांब (आयताकार) क्षेत्रात करावी. (१३०)

बुद्धीमान शिल्पीने त्या जागेवर तोरणाचे आकार कोरून वगैरे काढावेत व त्याच्या सुंदर मध्यभागी कर्णिका व कळ्या (यांची नक्षी) कोरावी. (१३१)

[उदाहरण——भुवनेश्वर येथील परशुरामेश्वर देवालय. (छायाचित्र **३९इ**)]

**रथक.**——रेखा प्रासादावर भूमींसह असलेल्या शिखरांच्या आकाराप्रमाणे असलेले अनेक प्रकारचे उत्कृष्ट असे रथ नेहमीच शोभिवंत दिसतात. (१३२)

रेखा-कैलाश व रथ (प्रकारच्या) मंदिरांच्या सर्व लक्षणांनी संपन्न असलेल्या विमान पागावर, नियमाप्रमाणे, (रथक करतात.) (१३३)

[उदाहरण——भुवनेश्वर येथीलं लिंगराज, अनंत वासुदेव आणि इतर रेखा प्रकारची देवालये. (छायाचित्रे **३४, ३५**)]

**मंडलद्वार.---**दाराचा आकार दिलेल्या जागी दोन खांबांच्या आकृती असतात. खाली व वर रेघा कोरलेल्या असून मध्यभागी लहान गवाक्ष असते. (१३४)

[उदाहरण--भुवनेश्वर येथील मार्कण्डेयेश्वर देवालय. (छायाचित्र **४५इ**)]

अशारीतीने अनर्थ नावाच्या (खांबावर) पाच प्रकारचे खोदकाम असते. खांबाच्या (रुंदीच्या) मध्यभागी शोभिवंत असा हा छेदभाग (कोरीव कामाचा भाग) सांगतात. (१३५)

**राहपाग** (छायाचित्र **४६**)

खाली पीठापासून (भूमीदेश) आणि वरती अमलकी शिलेपर्यंत (देवालयाच्या) मध्यभागील काहीशा लांबट भागाच्या दोन्ही बाजूंना सुंदर रथ असतात. (१३६)

नियमाप्रमाणे याचे (लांबीचे) विभाग नेहमी आयाताकार जागांनी करतात. याचे अलंकरण केवळ कोरीव कामाने करतात. (१३७)

लांबीवर केलेल्या कोरीव कामांचे सात प्रकार ऐक. छेद आणि गुण (खोदकाम व रेखाकर्म) हे प्रकार, गम्बुजा आणि कणिकेच्या आकारांचे प्रकार. (१३८)

लांबट आकाराचे वज्रमस्तक, वर्तुला आणि रेखाप्रमाणे; यापैकी कुठल्याही आकाराचा राह हा बन्धनाच्या वरील भागात असतो. (१३९)

{(शिखराच्या) पायापासून ते शेंड्याच्या (शिखेच्या) शेवटापर्यंतच्या भागाला राहपीठ म्हणतात. हा पीठाचा संपूर्ण भाग (खालून वर) क्रमाक्रमाने सहजगत्या अरुंद होत जातो.} (१४०)

**छेद.---**भूमी-(पीठा-) प्रमाणे कोरलेला व फक्त कोण (कोपरे) उतरते खोदलेले असा छेदाचा प्रकार असून खालच्या बाजूला वज्रमस्तक असते. (१४१)

(वज्रमस्तकाच्या) बाजूंना अप्सरांच्या मूर्ती असतात व शेवटी (वरती) खूप मोठ्या सिंहाची (मूर्ती) असते. राहाचा छेद (नक्षीचा) प्रकार असा करतात व तो अनेक अलंकारांसह असतो. (१४२)

[उदाहरण--भुवनेश्वर येथील लिंगराज, ब्रह्मेश्वर, अनन्त वासुदेव आणि इतर रेखा प्रकारची देवालये. (छायाचित्रे **३४, ३५** व **४६**)]

**गुण.---**सारख्या विभागांच्या व अनुक्रमाने (वर जाऊ तसे) अरुंद होणाऱ्या जागांच्या दोन्ही बाजूंच्या प्रदेशात (कोपरे) वक्राकार खोदतात. (१४३)

मध्यभागी तोरण कोरलेले असून (भोवती) अर्धवर्तुळाच्या आकाराचे केशर असतात. निरनिराळ्या शोभिवंत आकाराचे हे ' गुण ' प्रकार आहेत. (१४४)

[उदाहरण--भुवनेश्वर येथील मुक्तेश्वराचे देवालय. (छायाचित्र **४५आ**)]

**गम्बुजा.**——या प्रकारांत प्राधान्येकरून वरच्या भागी जागेच्या प्रकाराला अनुरूप (व) अनुक्रमाने अरुंद होणाऱ्या जागी दोन {तीन} थर करतात. (१४५)

[तीन थरांचे मिळून केलेल्या ह्या विभागांच्या (दोन्ही) बाजू अरुंद होत जातात. ते लांबीने जागेच्या मध्यभागी खोदावेत.] (१४६)

प्रत्येक विभागाच्या मध्यभागी तोरणाच्या आकाराचे कोष्ठ (मंदिर) कोरावे. या कोरलेल्या जागेच्या मध्यभागी फक्त रथकाची आकृती खोदावी. (१४७)

राहाचे सौंदर्य वाढविणारी अशी ही गम्बुजा (प्रकारची नक्षी) असते. तीच्या सर्व अंगांपाशी (राहाच्या संपूर्ण लांबीत दोन्ही बाजूंना) खांब असतात अशा गम्बुजाकृती करतात. (१४८)

[उदाहरण——भुवनेश्वर येथील मोहिनीचे देवालय. मात्र येथे राहभागावर नक्षी रेघांनी फक्त रेखलेली आहे, कोरलेली नाही. (छायाचित्र **४६ इ**)]

**वज्रमस्तक.**——वरीलप्रमाणेच परंतु वज्रमस्तकाची आकृती असते. शिल्पाच्या पद्धतीप्रमाणे रथक प्रकारच्या देवालयासाठी तिची शिफारस केलेली आहे. (१४९)

{किंवा खांबाच्या वर वज्रमुंड कोरावे, त्याची ही निराळी रचना शिल्पशास्त्रानुसार असावी (१४९)}

[पंचरथ, सप्तरथ इत्यादी रथ प्रकारची देवालये.]

राहाच्या पीठावर (त्याच्या) दोन्ही बाजूंना विशेषतः खांब असतात. बन्धनाच्या वरच्या भागाच्या मध्यभागी {दाराप्रमाणे खोदकाम करतात.} (१५०)

(दोन्ही) खांब कमळाच्या पाकळ्यांच्या व कमळाच्या कळ्यांच्या नक्षींनी शोभिवंत करतात. खांबांच्या शेवटी (वर) वज्रमस्तक असतात. (१५१)

(त्या खांबांच्या) मध्यभागील (अंतरात) जागेत अनेक (प्रकारच्या) मूर्ती खोदतात.

[उदाहरण——मार्कण्डेयेश्वराचे देवालय, छायाचित्र **४५**, परशुरामेश्वराचे देवालय, भुवनेश्वर, छायाचित्र **३८**)]

**राहावरील मूर्ती**

मंडपांतील (गर्भगृहातील) ज्या देवाची मूर्ती असते तिचेच पौराणिक अवतार दाखविणारी मूर्ती (येथे खोदतात). (१५२)

विशेषतः ज्या देवालयात (गर्भगृहात) ज्याला शिवस्थान म्हणतात त्याच्या शंकर, चंद्रशेखर इत्यादी अनेक प्रकारच्या मूर्ती येथे स्थापन करतात. (१५३)

[गर्भगृहात शंकराची मूर्ती असेल तर या राहभागात शंकराच्या सुखासन, चंद्रशेखर, वृषारूढ वगैरे पौराणिक कथांवर आधारित मूर्ती स्थापन करतात.]

नृत्याच्या हावभावातील नाटाम्बराची किंवा योगासनात बसलेल्या योगशिवाची असे शास्त्रांत जे अनेक प्रकार दिले आहेत त्याने ह्या कोष्ठाची जागा आडवावी. (१५४)

शुभनक्षत्रावर या कोष्ठाची पूजा तसेच ब्राह्मण व मुख्य शिल्पी (विश्वकर्मा) यांची पूजा करावी. (१५५)

गर्भगृहाचा अधिपती अशा शंकराची मूर्ती मोक्षशास्त्रात {तंत्रशास्त्रात} दिलेल्या कल्पने-प्रमाणे तसेच त्या मूर्तीचे जे ध्यानस्वरूप दिले असेल त्याला अनुसरून करावी. (१५६)

रथकाच्या आकाराच्या मंदिरात अशी प्रमुख कामे करतात. तसेच अनेक प्रकारचे सिंह व सिंहाचे मुखवटे तेथे स्थापन करावेत. (१५७)

बुद्धीमान शिल्पीने सिंह-मुखांनी प्रासाद भूषवावा. कंठदेशाच्या वरच्या भागाचे खर्पर असे नाव सांगतात. (१५८)

कंठ भागाच्या वर रमणीय खर्पर, कळस इत्यादी असावेत. सर्व अंगोपांगांवर नक्षी कोरलेले असे प्रासादाचे काम करावे. (१५९)

सर्वशास्त्ररूपी क्षीरसमुद्रात (शिल्पशास्त्र) रहस्यमय, अत्यंत गोपनीय असे आहे. दुधामध्ये जसे लोणी तसे (सर्व शास्त्रांत शिल्पशास्त्र आहे.) (१६०)

[दुधाचे सार जसे लोणी तसे सर्वशास्त्रांचे सार शिल्पशास्त्र आहे.]

विश्वकर्म्याने निर्माण केलेले हे शास्त्र अमर्याद असे कल्पिले गेले आहे. त्याच्या वेगळया वेगळ्या पद्धती, प्रकार हे अत्यंत अवघड (दुष्कर) काम असून ते मी कसे वर्णन करू? (१६१)

[इंग्रजी अर्थ योग्य वाटत नाही. येथे मय शिल्पशास्त्राचा उल्लेख केलेला नाही.]

या देशाच्या आचार व नियमांप्रमाणे फक्त जे (निरनिराळे) प्रकार आहेत त्यांची माहिती होण्यासाठी (शिल्प-) शास्त्राला अनुसरून अत्यंत संक्षेपाने (ते शास्त्र) मी (येथे) सांगितले आहे. (१६२)

**विमान मालिनी**

तांत्रिक प्रकारचा, खूप शोभिवंत असा (देवालयाचा) प्रकार आता (मी सांगतो.) (येथे) सर्व भागांच्या सभोवार व वरती केवळ (अनेक) विमान दिसतात. (१६३)

प्रसादाच्या मूळ जागेप्रमाणे (तलच्छन्दाप्रमाणे) गर्भगृहाच्या जागेचा आकार असतो. जागेचे दोन प्रमुख प्रकार आहेत; चौरस व आयताकार. (१६४)

चौकोनाशिवाय दुसऱ्या आकाराच्या जागेचा उपयोग करीत नाहीत. वर सांगितलेल्या दोन प्रकारच्या जागेच्या आकाराच्या गर्भगृहामध्ये, (१६५)

आयताकार जागेवरील व त्या जागेला अनुसरून असलेल्या (आयताकार) तलच्छन्दाचा हा प्रासाद सौधिकागमांत श्रेष्ठ सांगितला आहे. (१६६)

तो (प्रासाद) नेहमीच (अनेक) शिखरांचा असतो, मात्र फक्त वरच्या भागी ही शिखरे असतात. कौशल्याने बांधलेला मस्तकाचा भाग हा नेहमीच लोकांना मोहित करणारा असावा. (१६७)

[कोशल म्हणजे बोटीची नाळ असा अर्थ इंग्रजी भाषांतरात दिला आहे पण हस्तलिखितातील मूळ संस्कृत शब्द कौशल असा आहे.]

अनेक शिखरे (कूटगंभीर) असलेला जो भाग तसेच गर्भगृहाच्या भागामध्ये (गर्भगृह व मुखशाला यांना जोडणाऱ्या भागात) जणू काही मुखटा शोभत असतात असा त्यांचा अनुक्रम ठेवतात. (?) (१६८)

हा प्रकार जेव्हां उत्कृष्ट असतो तेव्हा त्याचे द्राविड हे नाव सांगतात. इतर प्रदेशांत निराळ्या शोभिवंत प्रकाराने केलेल्या (या प्रकाराला) वाडभी[१] म्हणतात. (१६९)

काही वेळेला जर वाडभी गाईच्या मुखाच्या स्वरूपाप्रमाणे असेल तर ती विमानमालिनीमाला असून तिच्या पागांची माहिती वेगळी असते. (१७०)

[विमानमालिनीमाला = शिखरांच्या माळेने सुशोभित दिसणारी.]

वाडभीत सिंह प्राधान्याने असतो; तो अमलकेशिवाय तसेच कोणकपागाशिवाय असतो अशी माहिती वाडभी जातीच्या प्रसादाची (सांगतात.) (१७१)

आगम मताने वेताल व हेमकूट हे दोन (प्रकारचे) प्रासाद वाडभी (प्रकारचे) आहेत. विमानमालिनी हा उत्कृष्ट प्रासाद असून कोशलाच्या (बोटीच्या नाळेच्या) आकारामुळे संतोषजनक असतो. (१७२)

सर्व अंगोपांगे त्यांच्या लक्षणांनी संपन्न असतात. अनेक प्रकारच्या अलंकारांसह सर्व अवयव अत्यंत शोभिवंत असतात. सर्व तंत्र (ग्रंथां-)हून स्वतंत्र शैलीचा असतो. (१७३)

पूर्वी ज्या स्वरूपात सांगितले त्या स्वरूपात जमिनीची खोदाई करावी. खोदाई झाल्यावर तशीच (पूर्वी सांगितल्याप्रमाणे) पूजा करून (तो खड्डा भरून) जमीन समपातळीत आणावी. (१७४)

[शुद्धीकरणाच्या माहितीचे श्लोक २४०–२४२ येथे असावयास हवेत.]

---

[१] टिप्पणी पहा.

प्रसाद बांधावयाच्या निरनिराळ्या पद्धतींचे प्रकार तसेच भिंती, यंत्राच्या सहाय्याने कोरलेल्या मूर्ती, त्यांच्या रेषा, अवयवांचे हावभाव, ही ऐक. (१७५)

पीठ, जंघा, कौशल्यपूर्ण पंचकर्म, जांघ-भित्ती तसेच बन्ध व वरच्या बाजूचे भूषण अशी बंधना, (१७६)

कामबन्ध, नागबन्ध, शिखरावरील सर्व बाजूंवरील कोरीव कामे ज्या पद्धतीने करतात (ते ऐक). शुभलग्नीं, शुभ लक्षणे असलेल्या दिवशी (गर्भगृह बांधण्यास सुरुवात करावी.) (१७७)

आकृती १३—पञ्चाब्ज यंत्र
२.१८०–१८६

ब्राह्मण, राजा, त्याचे श्रेष्ठ मंत्रीगण इत्यादी, ज्येष्ठ राणी त्याचप्रमाणे सर्व शिल्पीगण, राजाचे स्तुतीपाठक (भाट) तसेच उत्तम दैवज्ञ यांच्यासह पीठाची (पायाची) पूजा करून मग गर्भगृहाची दोरीच्या सहाय्याने आखणी वगैरे करावी. (१७८, १७९)

[शुभलग्नीं–सूर्य शुभ नक्षत्रांत असतांना.
दैवज्ञ = ज्योतिषी.]

**गर्भशंकराची पूजा** (आकृती **१३**)

पीठ बांधावयास सुरुवात करावयाची जी वेळ ठरविली असेल त्यावेळेला दुर्गा, काली, रौद्री {भैरवी}, भुवनेश्वर यांची, अगोदर बली देऊन, नंतर पूजा करावी. (१८०)

त्यांच्या मध्यभागी तसेच केन्द्रस्थानी रुद्रशंकराची पूजा करावी. नाटाम्बराची किंवा (शंकराची) कोणतीही उग्र स्वरूपाची मूर्ती त्यासाठी निश्चित करावी. (१८१)

नाटाम्बर व महाकाल या मूर्ती उग्र तांडव स्वरूपाची लक्षणे असलेल्या कराव्यात; आणि नटभैरव सौम्य स्वरूपाकार असतो. (१८२)

विधीपूर्वक, सर्व उपचारांसह, फुले, (सुगंधी) धूप तसेच दीप, तांदुळाची खिचडी व गोड दुधात शिजविलेला भात (यांचा नैवेद्य) देऊन पूजा करावी. (१८३)

गर्भगृहाचा अधिपती अशा नृत्यस्वरूप धूर्जटि शंकराचे ध्यान, यंत्र, तसेच त्यात आखावयाची सुंदर मूर्ती (यांची माहिती) ऐक. (१८४)

[धूर्जटि = विखुरलेल्या जटा असलेला.]

पूर्व दिशेला उमा व महेश्वर, पश्चिमेला सद्योजात, दक्षिणेला त्र्यंबक व तसेच उत्तरेला धूर्जटि, (१८५)

आणि मध्यभागी पाच रुद्रामध्ये प्रमुख वामदेव असतात. वामदेवाची उग्रस्वरूपाच्या मूर्तीची निश्चयाने पूजा करावी. (१८६)

**वामदेवाचे ध्यान** (नाटाम्बर १) (छायाचित्र **४७ आ**)

विस्कळीत जटाभार असून, श्रेष्ठ नागाने मस्तक भूषविलेला, तलवार, कवटी (हातांत असून) (नर–) मुंडांची माळा धारण केलेला असा हर असतो. (१८७)

केस पिंगट रंगाचे असून, पिंगट रंगाचे तीन डोळे असतात; भयानक दात (दाढा) असतात, उग्र (दर्शन), नागडा व ऊर्ध्वलिंग असतो. (१८८)

नागाचे यज्ञोपवीत असून हडाडलेले शरीर असते. खट्वांग, ढाल, कवटीचे पात्र व तलवार यांनी शोभिवंत असा, (१८९)

डाव्या बाजूला त्रिशूलाच्या टोकाने भेदलेले अशा स्वरूपाचे प्रेत असून (ते) चांगल्या छत्राप्रमाणे (डोक्यावर धरलेले) असते व त्रिशूल आणि परशू असतात. पांढऱ्याशुभ्र वर्णाचा असून नृत्य करण्यांत मग्न असतो. (१९०)

अशा (ध्यानातील) देवाचे नेहमी स्मरण करावे. ' हे वामदेवा! तुला नमस्कार असो.' त्या जागी नाटाम्बराची ध्यानपूर्वक पूजा करावी. (१९१)

यंत्राला अनुसरून जे स्वरूप असते ते ध्यानाला अनुसरून असावे.

**नाटाम्बराचे ध्यान-२** (छायाचित्र **४७ इ**)

सौम्य (दर्शन) लक्षण असलेल्या मूर्तीचे इतर प्रकार ऐक. (१९२)

तीन ठिकाणी वाकलेल्या (त्रिभंग) स्वरूपातील, मुकुटाच्या आकाराप्रमाणे वळविलेल्या जटांनी भूषविलेला, केयूर, हार, ग्रैवेय, कुण्डल व कटक (हे दागिने धारण केलेले) असतात. (१९३)

[केयूर–दंडात घालावयाचा दागिना, ग्रैवेय–गळ्यात घालावयाचा खूप रुंदी असलेला दागिना, कंठा, व कटक–मनगटावरील दागिना.]

गळ्यांत लखलखणारे दागिने घातलेला, आठही दंडांत अंगद असून तसेच डाव्या व उजव्या हाताच्या वरच्या भागी सर्प दाखविलेले असतात. (१९४)

उजव्या खालच्या हातात खट्वांग असून डाव्या हातात कवटीचे (केलेले) पिण्याचे पात्र असते. उजव्या हातात शोभिवंत नागराजाचा पाश असतो. (१९५)

[हा उजवा खालचा हात नववा असून विनाकारण उल्लेखिला आहे. यानंतर जे हाताचे सूक्ष्म वर्णन आले आहे तेथे या हाताचा उल्लेख नाही.]

उजवीकडील दिशेकडे वळलेली अशा शांभवी मुद्रेत (गजहस्त मुद्रेत) डावा हात असून उजवीकडील हात गळ्याच्या आश्रयाने असलेला अशा मुद्रा प्रकारात आहे. (१९६)

[इंग्रजी भाषांतरात कण्ठे या शब्दाचा अर्थ न देता कंबरेवर विसावलेला हात असा आश्रित मुद्रेचा अर्थ केला आहे.]

डावा व उजवा हात अभय व वरद मुद्रेत असतात. एकूण भाव मदोद्धत स्वरूपाचा असून नृत्याच्या वक्राकार मुद्रांमध्ये अंगोपांगे असतात. (१९७)

पायांचा बांक परस्परविरुद्ध दिशांना असतो. नृत्य हेच वस्त्र धारण केलेल्या अशा हराचे, गर्भगृहाच्या अधिपती शंकराचे, रुद्राचे नेहमी ध्यान करावे. (१९८)

**नाटाम्बरध्यान—३**

बैलावर बसलेला, जटाभारावर असलेल्या अर्धचंद्रामुळे शोभिवंत, अनेक अलंकारांनी भूषविलेला महादेव असतो. डाव्या हातांत उत्कृष्ट परशू, (१९९)

डमरू, रुद्रघण्टा (धारण केलेले असून चवथा हात) अत्यंत शोभायमान अशा ध्यानमुद्रेत असतो. उजव्या हातांत नागाचा पाश, मोठा त्रिशूल व अक्षमाला असतात. उजवा (चवथा हात) ध्यान मुद्रेत असून (डाव्या चवथ्या हातातील ध्यानमुद्रेच्या) विरुद्ध दिशेला दाखवावा. हे नृत्य अत्यंत सौम्य व शांत भाव (दर्शविणारे) असते. हे नाटाम्बरा! तुला नमस्कार असो. (२००, २०१)

गणांचा अधिपती अशा नृत्य करणाऱ्या रुद्राचे हे प्रकार लक्षांत ठेवून ज्या यंत्रांच्या सहाय्याने मूर्ती स्थापन करावयाची त्या यंत्रांचे प्रकार ऐक. (२०२)

**नाटाम्बर यंत्र** (छायाचित्र ४७ व आकृति १४)

{चौरस जागेत मध्यभागी त्यात मावणारे (मोठ्यात मोठे) वर्तुळ आखावे. (चौरसाचे) लांबीत व रुंदीत समान चार भाग पाडावेत. (२०३)

तेथे मध्यरेषेला स्पर्श करणारे दोन कर्ण (कोणच्छेद) (ईम व इम) आखावेत. मध्यरेषेवरील (सर्वात) खालच्या बिन्दू पासून (न) आरंभ करून मध्यरेषेच्या (टोकाच्या दोन बिंदूपर्यंत, उ व ऊ) पर्यंत (२०४)

दोन्ही बाजूंकडे दोन रेघा आखाव्यात. त्या (सर्वात खालच्या बिंदूच्या) वरच्या बिंदू (त) पासून सुरुवात करून (खालून) तिसऱ्या आडव्या रेषेच्या (टोकाच्या दोन बिंदू–प व फ–) पर्यंत (दोन रेघा रेखाव्यात.) (२०५)

केन्द्रस्थानी असलेल्या बिंदूपासून (म) आडव्या मध्यरेषेच्या मध्याच्या वर दोन्ही बाजूंच्या वरच्या जागेचे दोन (तिरप्या) रेघांनी (मअ व मआ) विभाजन करावे. (२०६)

वरच्या मधल्या भागाचे दोन भाग करून, त्रिकोण होतील अशा रेघा (थद व थध) आखाव्यात. या तांडव यंत्रांत नृत्यमूर्ती कोरावी. (२०७)}

[श्लोक २०३ ते २०७ हस्तलिखित १ मधले घेतले आहेत.]

ही नृत्यमूर्ती नेहमीच आनंद वाढविणारी असते असे नेहमीच प्रसिद्ध आहे. या यंत्राच्या रेघांनी केलेल्या विभागांत शरीराची स्थापना (कशी करावयाची) याची माहिती. (२०८)

**नाटाम्बर–१** (आकृती **१४ अ** व छायाचित्र **४७ आ**)

वरच्या छेद भागी जो बिंदू(थ) त्याचे त्रिकूटबिंदू असे नाव सांगतात. या त्रिकूटाच्या जागी भुवयांचा मध्यभाग असणे उत्तम. (२०९)

त्याच्या चहूबाजूंना (आक्रम्य) मुखाचे वर्तुळ तिरपे आखावे. चवथ्या तिरप्या (धथ) रेषेवर गळ्याचा भाग असतो. (२१०)

छाती उजवीकडील (तिरप्या) रेषेवर (बाजूवर) व नाभी मध्यबिंदूवर असते. त्या जागेपासून आरंभ करून डाव्या व उजव्या बाजूंना जाणारे पाय असतात. (२११)

{उजवीकडील पायाची नळी आडव्या मध्यरेषेवर असते. त्याचप्रमाणे (त्या पायाची) मांडी व गुडघा ही त्रिकोणाकृतीच्या आधाराने रेखावी. (२१२)

मध्यरेषेच्या डाव्या अर्ध्या भागापर्यंत (डावी) मांडी कर्णरेषेवर असून त्याची नळी खालच्या त्रिकोणाकृतीच्या आधाराने रेखावी. (२१३) }

उजवीकडच्या काटकोनावरील (उभ्या) रेघेवर पहिला उजवा हात असून दुसरा हात त्याच्या खाली कर्ण रेषेच्या जवळ असतो. (२१४)

{ (तिसरा हात) त्याच्या खाली असलेल्या त्रिकोणाकृतीच्या एका बाजूवर असतो. चवथ्या (आडव्या मध्य-) रेषेवर चवथा हात प्रामुख्याने असतो.} (२१५)

या चारही हातांचा दंड दुसऱ्या (तिरप्या) रेघेवर असतो. डावीकडच्या हाताचा पुढचा भाग (कोपर ते मनगट) वरच्या बाजूला डावीकडच्या उभ्या रेघेवर असतो. (२१६)

दंड वरच्या जागी गेलेला असून सुंदर हात (तिरप्या) रेघेवर असतो. परत त्याच्या खाली दुसरा हात असून {तो कर्णरेषेवर} असतो. (२१७)

तिसरा दंड खालच्या बाजूला दुसऱ्या तिरप्या रेघेवर असून चवथा हात {त्याचप्रमाणे त्रिकोणाच्या तिरप्या रेघेपर्यंत} (खाली गेलेला) असतो. (२१८)

डोक्यावर त्रिशूलाच्या (टोकावर) कवटीने भूषविलेले प्रेत छत्रीप्रमाणे असावे. {शूल धारण केलेल्या हाताच्यावर सुंदर प्रेत-छत्र असते.}

**नाटाम्बर–२** (छायाचित्र **४७-इ** व आकृती **१४-आ**)

(उभ्या) मध्यरेषेच्या वरच्या भागी मस्तक असून शम्भूची नाभी मध्यभागी असते. (हस्तलिखित १) (२१९)

पहिल्या रेघेपासून सुरुवात केली असता तेथे शंभूचा हात (गजहस्त मुद्रेत) असतो. उजवीकडचे दोन हात त्याच रेषेच्या जवळ लांबीने असतात. (२१९)

[हे इंग्रजी भाषांतराचे मराठी भाषांतर दिले आहे. इंग्रजी भाषांतरांतील पादटीपेत तिन्ही हस्तलिखिते मिळून हा अर्थ दिला आहे असे म्हटले आहे.]

(अ) नाटाम्बर–१

(आ) नाटाम्बर २

(इ) नाटाम्बर ३

**आकृती १४––नाटाम्बरांचे प्रकार**

२.२०८–२३९

दुसरा (तिसरा?) डावा दंड (उजवीकडच्या खालून) चवथ्या तिरप्या रेषेला स्पर्श करतो व तो हात (उजवीकडच्या वरच्या) तिसऱ्या तिरप्या रेषेवर असून कवटीपात्राला स्पर्श करतो. (२२०)

चवथा (सर्वात खालचा) दंड तिसऱ्या उभ्या रेघेवर लांबीने असतो. डावीकडील हात हा दुसऱ्या तिरप्या रेघेवर असतो. (२२१)

पुढे (पुनः) उजवीकडील तिसऱ्या हाताचे प्रकार ऐक. दुसऱ्या तिरप्या रेघेवर दंड व हात असतो. (२२२)

चवथा उजवा दंड खांद्यापासून सुरू होऊन खालच्या बाजूस जातो. दुसऱ्या तिरप्या रेघेवर हात सरळ जातो. (२२३)

काठी प्रमाणे (सरळ) दंड असून तो हात स्वतःच्या कंबरेवर ठेवलेला असतो. डावा गुडघा तिसऱ्या तिरप्या रेघेच्या आधाराने व तिला भूषविणारा असतो. (२२४)

{डावा हात दुसऱ्या तिरप्या रेघेच्या आधाराने व तिला भूषविणारा असतो.}

पहिल्या तिरप्या रेघेपासून सुरुवात करून उजवीकडील दंड पूर्वीप्रमाणे (डाव्या हाताच्या दण्डाप्रमाणे) असतो. तो दोन्ही हातांच्या मध्ये आडवा व खालच्या बाजूला जाणारा असतो. (२२५)

नाभी तिसऱ्या तिरप्या रेघेवर असून कंबरेचा भाग उजवीकडे बराच झुकलेला असतो. डावा पाय असा असावा की गुडघा कुम्भाच्या आकाराप्रमाणे असेल व पायाचा पुढला भाग (चवडा) जमिनीला स्पर्श करीत आहेत (असे दाखवावेत.) (२२६)

घोट्याचा भाग तिरप्या रेघेवर असा असावा की मांडी खालच्या बाजूला तिरप्या रेघेच्या निम्म्या लांबीपर्यंत येईल. पायाचा पुढचा भाग (चवडा) पहिल्या (आडव्या) रेघेवर येतो. (२२७)

एक पाय (जमिनीला) समपातळीत व दुसऱ्या पायाची फक्त तीन बोटे जमिनीला स्पर्श करणारी असतात. यास नाटाम्बर असे म्हणतात. (२२८)

**नाटाम्बर–३** (आकृती **१४-इ**)

मधल्या (उभ्या) रेषेला धरून मस्तक, किरीट व वर्तुळाकार जटा असतात. वरच्या सुंदर भागातील पहिल्या बिंदूवर गळा असतो. (२२९)

मध्यबिंदूवर नाभी असते. हातांच्या ठेवणीची माहिती ऐक. उजवीकडे (खालून) तिसऱ्या आडव्या रेघेवर पहिला हात असतो. (२३०)

त्याच्या खाली असलेला दुसरा हात {उजवीकडील तिसऱ्या (?) उभ्या रेघेपर्यंत गेलेला असतो.} वरच्या लहानशा जागेत (चार हातांचे) दंड चार तिरप्या रेघांवर (कर्णांवर) असतात. (२३१)

त्याच रेघांच्या जवळ वर्तुळाच्या रेघेपर्यंत हात गेलेले असतात. तिसरा हात खालच्या बाजूला (वरून) दुसऱ्या तिरप्या रेघेवर असतो. (२३२)

दंड (मध्य) रेषेच्या वरच्या सुंदर भागांत असून जसा चवथा उजवा हात असतो तसाच रेघेवर चवथा डावा हात असावा. (२३२)

डावीकडील मनोहर भागी अनुक्रमाने (डावीकडील हातांची ठेवण) असते. दुसरी आडवी रेघ व मधली आडवी रेघ यांच्यामध्ये पायांचे (जांघांचे) भाग (२३४)

पहिल्या उजव्या व डाव्या तिरप्या रेघांवर (दोन्ही कर्णांवर) असतात. तेथे जवळच खालच्या बाजूला पायांच्या सुंदर नळ्या खोदतात. (२३५)

डावा पाय जमिनीला (पीठ) समतल असून उजवा पाय (उभ्या) मध्यरेषेवर असतो. कंबरेवर (लिंगपीठ) बहुमोल वस्त्रे व उत्कृष्ट दागिने असतात. (२३६)

नाटाम्बराचे पूर्णपणे निश्चित केलेले हे प्रमुख प्रकार आहेत. (ती मूर्ती) काही वेळेला चाकाच्या (चक्र) मध्ये किंवा काहीं वेळेला वर्तुळाच्या मध्ये असते. (२३७)

काही वेळेला (पाया-) खाली राक्षस असतो किंवा काही वेळेला आसनासाठी बैल असतो. किंवा काही वेळेला वृषभारूढ (मूर्ती) असे अनेक आकाराचे योग्य अनुक्रमाने (२३८)

पीठ (आसन) करावे व शिवशंकराची पूजा करावी.

## मार्जन (शुद्धीकरण) विधी

पूजा केल्यानंतर आसनपीठाच्या शुद्धीकरणाचे काम सांगतात. (२३९)

यव, तीळ, मोहरी तसेच साखर इत्यादींच्या मिश्रणाने नागमातांना (दाही) दिशांना बलि द्यावा. (२४०)

कर्कोटक, महानाग, तक्षक, कुलिश इत्यादी तसेच पिलिपिच्छ वगैरे प्रकारांच्या नागमातांची पूजा करावी. (२४१)

दर्भ व पळसाची पाने यांनी सूक्तासह जमीन स्वच्छ करावी. हे काम विश्वकर्माकुलातील श्रेष्ठ माणसाने करावे. (२४२)

[श्लोक २४० ते २४२ हा मजकूर श्लोक १७४ नंतर यावयास हवा. पवमान सूक्त यावेळेस म्हणतात.]

## प्रासाद बांधावयाची पद्धत

गर्भगृहाची उंची किती घ्यावयाची ते प्रथम तालयंत्रावरून (तलच्छन्दावरून) ठरवावे. कोणत्या प्रकाराने (देवालयाचे) विभाग करतात ती पद्धत ऐक. (२४३)

गर्भगृहाची जी बाजू, त्या सर्व बाजूंची (लांबी व रुंदीची) बेरीज करून जी संख्या (अंगुलांत) येईल तिला तीनाने गुणून चाराने भागावे. (२४४)

त्या संख्येला भाग देऊन जो शेष उरतो तितक्या अंगुलांच्या (उंचीचे) पीठ उत्तम (प्रकारचे) असते. भिंतीच्या पीठाचा हा प्रथम भाग असून तो प्रयत्नाने चारी दिशांना असावा. (२४५)

{चाराने भागलेल्या संख्येचा जो भाग जाईल (फल) तितक्या अंगुलांचे वीथीच्या स्वरूपाचे पीठ चारही दिशांना असते.} (२४५)

वीथीपीठाच्या उंचीला दोनाने गुणावे ती वरच्या कूर्मपृष्ठाकार मोठ्या पीठाची उंची असते.[१] (२४६)

वीथीपीठ त्याच्या मापाप्रमाणे खोदावे (तयार करावे.) तेथे नक्षी काम करू नये. त्याच्यावरती त्याच्याच मापाचे (लांबी व रुंदीचे) कूर्मपृष्ठ असावे. (२४७)

ही भूमी (पाद) तीन थरांनी करतात. (हे थर) गर्भयंत्राचा जसा आकार असेल त्याप्रमाणे त्याच्या रेघांच्या आधारे करतात. (२४८)

{ भिंतीचा भाग असा करावा की तेथे अरुंद व फार खोल नाही अशा खान्दि असाव्यात. खान्दिंची संख्या सहा असून रुंदीमध्ये सात खांब (पाग) असतात.} (२४९)

पागांची (गृहांची) आकृती, रुंदी व दोन्ही बाजू अरुंद व लांबीने जास्त अशी असते. (२४९)

{पाग व इतर विभाग हे शिल्पशास्त्राप्रमाणे संकल्पिले जातात. वाडभीचे विभाग जसे शिल्पशास्त्रांत नियम (सूत्र) सांगितले आहेत त्यांना अनुसरून करतात त्याप्रमाणे.} (२५०)

तुझ्या हितासाठी (समजुतीसाठी) सर्व विभाग व अंगोपांगे यांची माहिती सांगतो. विमानमालिनीच्या गर्भगृहाचे दोन प्रकार सांगतात. (२५१)

केवळ भिंतीच्या जागेवर नसून किंवा वरती (गर्भगृहाच्या) शिखरावर नसून, शंकराच्या पीठावर तसेच भिंतींवर देखिल नाग {देव} कमळ यांची बन्धना (नक्षीची पट्टी) असते. (२५२)

शाक्त (देवीच्या) पीठावर अत्यंत दुर्लभ असे कामबन्ध स्थापन करावेत. शास्त्राला संमत असे हे (दोन) प्रमुख प्रकार आहेत. (२५३)

कामक्रीडेच्या कलेशिवाय असलेले शाक्त मन्दिर निष्फळ (सिद्धी न देणारे) असते. अशा फरकांनी तसे दोन प्रकार होतात. (२५४)

---

[१] टिप्पणी पहा.

**पद्मगर्भ (शंकराचे देवालय) व कामगर्भ (देवीचे देवालय) यातील फरक** (छायाचित्र ४८ व ४९).

पद्मगर्भ व कामगर्भ हे देशातील निरनिराळ्या भागी वापरांत असलेले दोन प्रकार आहेत. तू त्यांच्या विभागांमधील फरक ऐक. प्रथम कमलगर्भ देवालयाची माहिती. (२५५)

पंचकर्म निर्माण करतांना त्यांच्यात कोठे वेगळेपण असते तसेच भिंतीच्या भागाची माहिती, वत्सा, मी सांगतो ती ऐक. (२५६)

फक्त पद्मगर्भाचे विभाग व अवयव (सांगतो) अनुक्रमाने संख्येच्या ज्या पटीने गर्भगृहाची जी उंची येते (२५७)

[संख्या म्हणजे मूलसूत्र किंवा भागसूत्र यांनी येणारे लांबीचे एकक, श्लोक २४६ वरील टीप पहावी.]

शिल्पीश्रेष्ठाने त्या संख्येला तिनाने भागावे. हा एकतृतीयांश भाग हा भिंतीचा भाग (भिंतीची उंची) असतो असे सांगतात. (२५८)

भिंतीच्या भागाच्या उंचीला पुन्हा तिनाने भागावे. त्यातील पहिला (सगळ्यात खालचा एक-तृतीयांश) भाग उत्तम प्रकारच्या पंचकर्माचा असतो असे माहीत आहे. (२५९)

पूर्वी सांगितलेल्या माहितीप्रमाणे त्यांचे आकार व विभाग सांगतात. खुर आणि कुंभ यांच्या नंतर पट्टी व पट्टीच्या शेवटी (वरती) उत्तम कणि (चा थर) असते. (२६०)

त्याच्यावर जांघेचा भाग असून हे भिंतीच्या अवयवाचे बांधकाम असते. सौधिकागमांत सांगितल्याप्रमाणे पद्मगर्भाचा (हा) खालचा भाग बांधतात. (२६१)

**पद्मगर्भाच्या पंचकर्माची वेगळी पद्धत** (छायाचित्र **५०अ, आ** व आकृती **१५अ, आ**)

**आकृती १५--पंचकर्माचे प्रकार**

२.२६२--२६८

पाच अंगे असलेल्या (पंचकर्मा) चे विभाग तसेच बांधकाम ऐक. पंचकर्मासाठी जी जागा असते तिचे चार भाग कल्पितात. (२६२)

पहिल्या थरांत खुर, दुसऱ्यात कुंभ व तिसऱ्याच्या पहिल्या भागांत कुम्भावरती खांदी असते. (२६३)

खान्दीच्यावर फुलांची नक्षी असलेली पट्टी (वसन्तक) असून त्यावर डमरूच्या आकाराचा खोलगट भाग असतो. निरुंद भागांत मध्यभागी (आडवी) रेघ असून पुढच्या बाजूला पानाची आकृती रेखलेली असते. (२६४)

खुरा इत्यादी तीन भाग नेहमीच शास्त्राला अनुसरून करतात. खुराच्या खाली असलेल्या जागेला {खुरपाद} म्हणतात. (२६५)

**कामगर्भासाठी पंचकर्म** (छायाचित्र **५८ आ** व आकृती **१५ इ**)

खुर, कुम्भ, पट्टी, खान्दि व वसन्त असे चार भाग असतात. विमानमालिनी इतकेच कामगर्भ सिद्धी देणारे आहे. (२६६)

त्या त्या जागी याच (वर सांगितले त्याच) स्वरूपांचे खुर व कुम्भ असतात व तीन रेघा (तीन लहान पायऱ्या) असतात. रेघांच्या शेवटी (वरती) खान्दीच्या मध्यभागी प्राधान्याने फुलांच्या नक्षीची जागा असते. (२६७)

त्याच्या वरील भागी वसन्त व वर्तुळातील वेलींची नक्षी नेहमी असते. वसन्ताच्या शेवटी खाली जमिनीकडे वळलेले असे पीठ असते. (२६८)

नियमाप्रमाणे पाच भागांचे व पाच प्रकारांचे पंचकर्म असते. आता फक्त भिंती मधील कोणक (पागाची) माहिती सांगतो. (२६९)

**पद्मगर्भ कोणक** (छायाचित्र **५० इ, ई**)

पद्मगर्भ (देवालयाचे) जे स्वरूप व जी विभागणी असते ती (शिल्प-) शास्त्रांत सांगितल्याप्रमाणे निर्माण करतात. पंचकर्माच्या वरच्या भागी असलेले अवयव भिंतीनुसार (तिच्या उंचीनुसार) करतात. (२७०)

त्या भागाच्या लांबीचे (उंचीचे) तीन रेघांनी चार भाग पाडतात. त्यापैकी पहिला जांघबन्ध {नारीबन्ध} असून दुसऱ्यात वेली रेखलेल्या असतात. (२७१)

त्याच्यावरती असलेली शोभिवंत जागा टांगलेल्या माळांनी (आलम्ब-माला) भूषविलेली असते. (त्याच्यावर) एक भागापैकी अर्ध्याभागावर सुंदर कणिक्षेत्र { कणिपीठ } असावे. (२७२)

त्याच्यावरच्या अर्ध्या भागांत सुंदर भारवाहक असावेत. हे भाराचे रक्षण करणारे जोडीने अथवा एकच असे कोरावेत. (२७३)

प्रत्येक भागाचे (शिल्प-) काम किती प्रकारांनी करावे, ते शोभिवंत भाग कसे भूषवावेत याची माहिती संक्षेपाने सांगतो. (२७४)

(पंचकर्मातील) वसन्ताच्या वर अर्ध्याभागी कमळाच्या आकाराचा डमरू कोरावा, असे पीठ केल्यानंतर सुंदर परिचारिका. (२७५)

चामरधारिणी (चामरा), निरनिराळी वाद्ये घेतलेल्या, मृदंग वाजविणारी, तांबूलधारिणी, पूजेत गढून गेलेली अशा मनोरम कन्या अनुक्रमाने स्थापन कराव्यात. (२७६)

या (कन्या-) बन्धाच्या वरच्या जागी अतिशय शोभिवंत अशी निरुंद (जागी) वेलींची नक्षी असावी आणि (त्यावर) लोंबणाऱ्या माळा असून उरलेल्या (वरच्या) जागी दोन अरुंद पट्टिका {लहानसे पीठ} असतात. (२७७)

खान्दिच्या मध्यभागी केवळ एक रेघेची ठळक कणि करावी. तेथे एक किंवा जोडीने असे भारकेन्द्राधिप असतात. (२७८)

सुंदर लतांच्या (नक्षीच्या) जागेवर सिंहाच्या मुखातून लोंबणाऱ्या माळांच्या पाच किंवा तीन रांगा (तेथून) लोंबणाऱ्या रेघांनी दाखवाव्यात. (२७९)

प्राधान्याने पद्मगर्भ प्रकारच्या (देवालयातील) कोणकाचे सर्वात खालच्या भागापासून जंघा इत्यादी भिंतीच्या जागेतील विभाग अनुक्रमाने सांगितले. (२८०)

**अनुराह—(पद्मगर्भाचा)** (छायाचित्रे **५१** व **५२**)

याच्या शेवटास (कोणकाच्या रुंदीच्या) निम्मे रुंदी असलेल्या जागी, (कोणकाच्या रुंदीच्या) चार भागांपैकी एक भाग (रुन्दीची) खान्दि असते. (दोन) खान्दींच्या मध्ये लांबीला अनुसरून मजबूत खांब खोदतात. (२८१)

ज्या आकाराची (उंचीची) भिंत असेल, त्याच (उंचीला) अनुसरून (तितक्याच उंचीचा) खांब असतो. त्या जागेचे (आडवे) तीन भाग करतात; पाद, खांब व (त्यावर) रेघांची कामे. (२८२)

(रुंदीचे) रेघांनी तीन भाग करतात. पाद भागाचे (रेघांनी) चार भागांत विभाजन करतात. (२८३)

पाद व कुम्भ खालच्या भागी असून त्याच्या (कुम्भाच्या) वर कोष्ठ असते; त्यावर तीन भागांची अत्यंत सुंदर क्षुद्र नक्षींची पट्टी (क्षुद्र बंधना) असते. (२८४)

पादभागी लहान (उरु) खुर, कुम्भ व फक्त अरुंद पट्टिका असतात. पट्टीच्या भागाच्या वरच्या जागी सुंदर प्रकारच्या कोष्ठात (२८५)

अनेक प्रकारचे उपचार (मृदंग, बासरी इत्यादी वाद्ये, वगैरे) धारण केलेल्या स्त्रिया व कोष्ठाच्या वरच्या भागांत पट्टी, फेणि, वसन्तक असतात. (२८६)

बुद्धीमान शिल्पीने त्यांना लहान आकाराच्या फुलांच्या व वेलींच्या नक्षी रेखून भूषवावे. नागबन्धाच्या खालच्या बाजूचा हा पहिला भाग. (२८७)

खांबाच्या पादभागाच्या शेवटी (वरती) अलंकारिलेली नागमूर्ती असते. खांबाच्या भोवती असलेले (नागाचे) पहिले मंडल चोलबंधाला अनुसरून असावे. {खांबाच्या मध्यभागी नागबन्ध चोल देशांतील पद्धतीप्रमाणे असावा} (२८८)

(खांबाच्या) पादभागी जशी असते तशीच वरची बन्धना वरती असते. फक्त (या) वरच्या भागांत वेलबुट्टी असलेली उत्तम (रुंद) पट्टी असते. (२८९)

(खांबाच्या) मध्यभागी लतेप्रमाणे खांबाभोवती नाग (मंडले) लपेटलेली दाखवावीत. भिंतीच्या भागी जो खांबाचा दंड भाग त्याला अनुसरून (लपेटलेला) असा नाग असतो. (२९०)

नागाचे डोके इत्यादींसह तीन रांगांची पाच मंडले असावीत. पूर्वी जसे वर्णन केले आहे त्याप्रमाणे नागबन्धाचे अलंकरण करावे. (२९१)

[पहिल्या प्रकाशांत श्लोक २३०–२३३ मध्ये हे वर्णन आले आहे.]

(शिल्प-) शास्त्रातील गुप्त तत्त्वाप्रमाणे प्रासादाच्या रक्षणासाठी व (तो) शुभदायक असावा म्हणून अनेक जागी वेलींच्या आकारांप्रमाणे नागमाता खोदाव्यात. (२९२)

**नागमातांचे प्रकार**

सात फडा, पाच फडा किंवा त्याचप्रमाणे तीन फडा असलेल्या असे नागमातांचे प्रकार असून, नागमातांची जोडी असावी. (२९३)

मस्तक वरच्या बाजूला असलेल्या (किंवा) शेपटी वरच्या बाजूला असलेल्या (किंवा) जोडीने असून दोन शेपट्या एकमेकांस लपेटलेल्या (किंवा मध्ये मानवाकृति शीर्ष नसून केवळ) फडा असलेल्या (अथवा) फडांमध्ये अनन्ताचे शीर्ष असलेल्या अशा उत्कृष्ट नागमाता शोभिवंत प्रासादावर असतात. (२९४)

आठ नागश्रेष्ठांचे असे आठ प्रकार होतात. भिंतीवर, तोरणांच्या जागी, खांबांच्या ठिकाणी भूषण म्हणून ते कोरतात. (२९५)

नागासह असलेला (म्हणून जो) नागस्तंभ त्याचे (जणू) स्वतःचे घरच असा अनुराह खांब असतो. विशेषतः वाडभी (प्रकारच्या) देवालयांत नागराज इत्यादी असतात. (२९६)

[वाडभी प्रकारच्या देवालयांत तसेच इतर प्रासादात अनुराहाचा खांब हा नेहमी नागबन्ध असलेला असतो.]

**अनुरथ (पद्मगर्भाचा)** (छायाचित्र **५३अ, आ**)

अनर्थाचे तीन भाग असून त्यातील जांघ भाग सर्वात उत्कृष्ट (श्रेष्ठोत्तर) असतो. त्याच्या विभागांची माहिती म्हणजे ते प्रामुख्याने पीठ, जंघा व पट्टी हे असतात. (२९७)

अनुराहाची जी रुंदी त्याच्या दुप्पट रुंदीचा अनर्थ असतो. तो स्थैर्य असलेला, लांबीने ओळंब्यात असलेला व अनुराहा इतक्याच उंचीचा असतो. (२९८)

या तीन समान (उंचीच्या) विभागांपैकी (खालच्या भागाचे) पुन्हा तीन भाग करतात. त्यातील मोठ्या भागात पंचकर्म असून त्यावर उत्कृष्ट जंघा असते. (२९९)

शिल्पशास्त्राच्या मताने पीठ प्रकारच्या जांघेवर पीठाच्या आकृत्या असतात. त्याच्या खाली जी जागा तेथे पूर्वी (सांगितल्याप्रमाणे) पंचकर्म असावे. (३००)

याच्या वरील जागेचे (खांबाच्या आकाराचे) तीन विभाग करतात. (त्यातील) एक भाग कोष्ठ असून वरील दोन भाग जंघा असते. (३०१)

खालच्या बाजूस असलेल्या कोष्ठाच्या जागी दोन्ही बाजूंना खांब खोदावेत. मध्यभागी कोष्ठाच्या आकाराचा रिकामा भाग असतो. (३०२)

**आवरणांचे प्रकार**

(कोष्ठाच्या) रिकाम्या भागाच्या वर श्रेष्ठ गर्भकपट्टी (दाराच्या वरच्या बाजूला असणारी पट्टी) असून कोनाड्यांत शंकराचे गण किंवा रुद्रमूर्ती (असावी). (३०३)

[गर्भकपट्टी = उत्तरंग]

**शंकराच्या आवरणदेवता** [१]

**सद्योजात**

जटाभार धारण केलेला, तीन डोळे असलेले तेजस्वी मुख असून, भीषण नागश्रेष्ठांची भूषणे ल्यालेला, तलवार व ढाल धारण केलेला, (३०४)

जटांवर अर्धचन्द्र शोभत आहे असा, पांढरी शुभ्रवस्त्रे नेसलेला, अतिश्रेष्ठ, अनेक अलंकारांनी भूषविलेला असा सद्योजात दक्षिणेकडे (स्थापन करतात). (३०५)

**तत्पुरुष**

पुन्हा त्याच दिशेला (दक्षिणेला) जटेवरील चंद्राने भूषविलेला, बाणलिंगाप्रमाणे शरीर असलेला, त्रिशूल व कवटी धारण केलेला, (३०६)

असा शुभंकर, महान रुद्र, तत्पुरुष म्हणून प्रसिद्ध आहे.

---
[१] टिप्पणी पहा.

**श्रीकण्ठरुद्र**

पश्चिमेकडच्या (कोष्ठात) श्रीकण्ठरुद्राची स्थापना करावी. नागांची आभूषणे असलेला, (३०७)

सोळा हातांत (अनुक्रमे) धारण केलेली (शस्त्रे) असतात. उजवीकडच्या हातांत नाग, तलवार तसेच गदा, सर्प-पाश, तसेच चक्र, डमरू व मोठे मुद्‌गर, (३०८)

त्रिशूल, अंकुश, रुद्राक्ष (माला) असतात. डावीकडील हातात तोमर, पट्टीस, ढाल व कवटी, (३०९)

कपाल-मन्थना-शक्त शक्ति[१], उत्कृष्ट परशू असतात. वाघाच्या कातड्याचे आसन असलेला, हत्तीचे कातडे नेसलेला असा (हा) अतिश्रेष्ठ देव असतो. (३१०)

**घोर**

त्याच दिशेला (पश्चिमेला) जर खान्दि असेल तर ती पोकळी (कोनाडा) घोराचे मन्दिर असते. पिवळे रेशमी वस्त्र नेसलेला व लिंगयंत्र (मुद्रा) व अक्षमाला धारण केलेली असतात. (३११)

[लिंगयंत्र–सौधिकागमांत दिल्याप्रमाणे यास मातुलिंग मुद्रा म्हणतात. यात तीन मधली बोटे उभी दाखवितात.]

**मृत्युंजय**

गर्भगृहाच्या उत्तर दिशेकडील भागात असलेल्या मंदिरांत याची स्थापना करतात. मृत्युंजय हा महारुद्र असून त्याला चार हात व तीन डोळे असतात. (३१२)

(कपाळावर) अग्नीची (जणू) ज्वाळा असा डोळा असलेला, त्याच्या कमलकरांत महान निगम व अभय मुद्रा तसेच अक्षमाला धारण केलेले असून मनोहर पांढऱ्या वर्णाचा असतो. (३१३)

[निगम = सर्वसाधारणतः वेद समजले जातात. परंतु देवी गुरु व शिव शिष्य असलेले तान्त्रिक ग्रंथ म्हणजे निगम; शंकर गुरु व देवी शिष्या असलेल्या तांत्रिक धर्मग्रंथास आगम म्हणतात.]

**विरूपाक्ष**

त्याच कोनाड्याच्या बाजूला महाशिव विरूपाक्ष असतो. (त्याच्या उजव्या हातांत) डमरू, चक्र, नाग व त्रिशूल, अंकुश, अमृतकुंभ (सुधानिधी), (३१४)

सौम्य (अक्ष) माला, तसेच तलवार असतात. डाव्या हातांत उत्कृष्ट मोठी घण्टा, कवटी, पिण्याचे भांडे, खट्वाङ्‌ग, कुण्डिका व धनुष्य, (३१५)

---

[१] टिप्पणी पहा.



एन ४१३३–८

परशू, दिव्य पट्टीश असून, शुभ्र वस्त्रे धारण केलेला असा (हा) शिव असतो. शिल्पीश्रेष्ठाने त्याची उत्तरदिशेकडील जागी स्थापना करावी. (३१६)

{अनर्थाच्या जांघेच्या मध्यभागी} असे शंकराचे प्रकार (स्थापन) करतात. (याच्या वरच्या बाजूला) रुंदीच्या मध्यभागी सुंदर अशी जांघपट्टी असावी. (३१७)

पूर्वी सांगितल्याप्रमाणे (श्लोक २९७–३००) असलेल्या वाडभी प्रकारचा तलच्छन्द असेल तर त्या जागेच्या मूळापासून जोपर्यंत भिंत आहे तोपर्यंतच्या मजबूत, (३१८)

जांघेच्या लांबट भागी वर्तुला व गुंफना प्रकारची नक्षी कोरावी. तसेच तेथे अनेक सुंदर आकारांची उत्कृष्ट वेलबुट्टी कोरावी. (३१९)

(लांबीच्या) मध्यभागाच्या ज्या दोन्ही (पार्श्व-) बाजू त्या (मध्यभागाहून) काहीशा खालच्या पातळीत असून तेथील जांघ भिंतीवर अत्यंत कौशल्याने पद्मपीठ खोदावे. (३२०)

(अनर्थाच्या पद्मपीठावर) जांघ भागाच्या दोन भागांवर (म्हणजेच श्लोक ३२० मध्ये वर्णिलेल्या पुढे आलेल्या मध्यभागावर) कांहींशी रुंद चूलिका वरच्या बाजूच्या पट्टीपर्यंत खोदावी. (३२१)

[छायाचित्र **५३ आ** पहा. अनर्थाच्या खालच्या कोनाड्याच्या वरती पद्मपीठ असून पद्मपीठावर उभी नक्षी कोरलेली पट्टी आहे. येथे याच पट्टीचे वर्णन आहे.]

तेथील खालच्या पातळीतील बाजूंच्या भागांचे (खालच्या) कोनाड्यापासून (वरच्या) पट्टीच्या भागापर्यंतच्या अंतराचे आठ किंवा दहा भाग करावेत. (३२२)

प्रत्येक विभागाचे (पुन्हा) तीन भाग करून (त्या जागेच्या) खालच्या अर्ध्या भागात उत्कृष्ट पट्टिका स्थापन करावी. (३२३)

(उरलेले) दोन्ही भाग मिळून कमळाच्या पाकळीप्रमाणे आकृती असलेले पीठ (पद्मपीठ) खोदावे. सुंदर अशा पट्टीच्या भागांत गुण्डी, फुले इत्यादींची नक्षी असावी. (३२४)

पट्टीच्या खालच्या अर्ध्या भागात नेहमी कोनाड्याच्या आकाराची खान्दि असते. (थरांची) योग्य विभागणी केलेले असे सुंदर पद्मपीठ खोदावे. (३२५)

(अनर्थाच्या वर वर्णिलेल्या पद्मपीठापासून) शीर्षभागापर्यंत असलेल्या चुलिका-बन्धाची माहिती सांगतो. पट्टीचा भाग कांहींसा वरच्या पातळीत असून खालच्या भागी वसन्तक (पट्टी) असते. {कांहींशी लांबट पट्टीची जागा असून तेथे वसंतक असतो.} (३२६)

त्या जागी तीन भाग मिळून कमळाच्या पाकळ्यांच्या आकाराचा चूल असतो. (पट्टीवर) पुढच्या बाजूला (अग्रे) गुण्डी व सुस्पष्ट दन्तुरिका यांची सुंदर नक्षी असते. (३२७)

[चूल किंवा चूलिका म्हणजे दीर्घगोलाकृति छप्पर. गुण्डीची नक्षी म्हणजे बुन्दांची नक्षी.]

(संपूर्ण) पृष्ठभाग पट्टीप्रमाणे असून ती (पट्टी) वरच्या कळसापर्यंत असते. किंवा वर्तुळाकार उत्कृष्ट चूलिका लहान घटाच्या (कुंभक) आकाराची असते. (३२८)

[चूलिकेचा हा दुसरा प्रकार]

अनर्थपागाचे सौधिकागमास अनुसरून होणारे हे प्रकार निश्चयाने (प्रयत्नपूर्वक) करावेत. (३२९)

**राहा** (छायाचित्र **५३ इ, ई, उ**)

बुद्धीमानांसाठी (अनर्थाच्या) नंतर येणाऱ्या, भिंतीच्या दुसऱ्या उत्कृष्ट भागाची, त्यावर खोदावयाच्या नक्षींची अनुक्रमाने माहिती सांगतो. (३३०)

बुद्धीमंतांसाठी व शिष्यांच्या समजुतीसाठी जी ही महान व कौशल्यपूर्ण माहिती (ती सांगतो). अनर्थाच्या नंतर त्याच आकाराची (उंचीची) (मात्र) दुप्पट रुंदीची खान्दिची जागा असते. (३३१)

[अनुराह व अनर्थ यांच्यामध्ये जी खान्दि असते तिच्या इतक्या उंचीची व तिच्या रुंदीच्या दुप्पट रुंदीची खांदि अनर्थ व राह यांच्यामध्ये असते.]

त्या (राहाच्या) जागी फक्त पोकळी (प्रणाली) किंवा रेघांच्या रांगा (खोदलेल्या) असतात. राहा पागाची जी जागा तेथील रेघा व प्रकार यांचे वर्णन (३३२)

मी अत्यंत प्रयत्नाने करतो, ते सावधान चित्ताने ऐक. लांबीमध्ये पंचकर्मापर्यंतची जागा (उंची) जशी इतर (पागांची) तशीच येथेही असते. (३३३)

संपूर्ण बन्ध (पाग) चार (उभ्या) भागांत विभागावा. मधले दोन (उभे) भाग मिळून गर्भिका असते. रुंदीने परिमित झालेल्या भागी खुरा इत्यादी पंचकर्म करावेत. (३३४)

[गर्भिका किंवा तलगर्भिका = शिल्पसारणीच्या मताने कोनाड्याच्या खालच्या भागी दोन पंचकर्मांच्या मधल्याभागी जो भिंतीचा भाग असतो त्याला म्हणतात.]

तीन (उभ्या) भागांच्या वरच्या भागी वसन्त (पट्टी) असते. या भागाची रुंदी दोन्ही दिशांना बरीच वाढविलेली असून (३३५)

खान्दिचा भाग ओलांडून अनर्थ भागापर्यंत आलेली असते. या तीन भागांत लांबीने प्रामुख्याने गर्भक असतो. (३३६)

(हा गर्भक) वसन्तापासून जणू लोंबत आहे असा वेगळा दाखवितात.

**तालगर्भिका** (छायाचित्र **५४अ, इ** व **५५अ, आ**)

तीन (उभ्या) भागांच्या खालच्या बाजूचे पाच आडवे विभाग करावेत. (३३७)

लांबीने, लांबीच्या आकाराने, तीन सारखे भाग पाडावेत. रेघांनी विभाग पाडावयाच्या कामाच्या अनुसार हे काम कसे करतात ते ऐक. (३३८)

सर्वात खालच्या भागाच्या निम्म्या भागाच्या मध्यभागी अरुंद पट्टिका असते. तिच्यावर कोष्ठाचा आकार खोदलेला असून तिच्या (पट्टिकेच्या) खालच्या भागाला पीठाचा आकार दिलेला असतो. (३३९)

हे पीठ पद्मपीठाप्रमाणे असून कोष्ठांत मूर्ती असतात. जसे कल्पना करून ठरविले असेल त्याप्रमाणे निरनिराळ्या आकाराच्या मूर्ती असतात. (३४०)

तिसऱ्या विभागाच्या (आडव्या) तीन भागांमध्ये खाली (खालच्या भागांत) वसंतक पट्टी असते. तिच्यावर पद्मपीठ असून तिसऱ्या भागांत खान्दि खोदलेली असते. (३४१)

खान्दीच्या वर असलेल्या चौथ्या भागाच्या जागेवर, तेथे, त्या भागाच्या मापानुसार उत्कृष्ट पट्टिका असते. (३४२)

[चवथ्या भागाचे चार आडवे भाग करून त्यातील सर्वात खालच्या एक भागांत पट्टी असते.]

चवथ्या भागाच्या (उरलेल्या भागाचे) पुन्हा (आडवे) चार भाग करावेत. तेथे (खाली) खान्दि असून वर फेणिका, तिच्यावर पुन्हा खांदि व (तिच्यावर) पट्टिका असते. (३४३)

पाचव्या समान (उंचीच्या) विभागांत फक्त पीठाची आकृति असते. पंचकर्माच्या वरच्या भागी जो भाग येतो ती खांबाची जागा असते. (३४४)

**निशाभाग**

तो (खांबाचा) भाग, एकमेकांस जोडलेल्या चार सारख्या मापाच्या भागांत विभागावा. (सगळ्यात खालच्या) पहिल्या भागाचे पूर्वी केले त्याप्रमाणे (आडवे) दोन भाग करावेत. (३४५)

वरती (खाली?) डमरूपीठ असून त्याच्यावर परिचारिका असते. त्याच्या वरील भागावर कुञ्चिता लतांची वेलबुट्टी करावी. (३४६)

तिसऱ्या भागावर वेली, फुलांच्या उत्कृष्ट वेली, कोराव्यात. चवथ्या भागाच्या खालच्या बाजूस अरुंद (व) उत्कृष्ट पीठ असते. (३४७)

कमळाच्या पाकळीप्रमाणे असलेल्या या पीठावर वरच्या बाजूला भाररक्षक {भारभैरव} दाखवितात. (कोनाड्याच्या) दोन्ही बाजूंना असे आकार (वर वर्णिलेले विभाग व नक्षी) या क्रमाने पूर्वीप्रमाणेच करावे. (३४८)

(खांबांवरती) वेली इत्यादींचे मोठे खोदकाम अत्यंत शोभिवंत करावे. याच्यानंतर निशाभागाची (कोनाड्याची) माहिती सांगतो. (३४९)

{कोनाड्याच्या पीठापासून सुरुवात होऊन गर्भकापर्यंत जो भाग} तो भाग कोनाड्याच्या पोकळीचा असून त्या जागेचे पाच रेघांनी भाग करावेत. (३५०)

(उभ्या) सहा विभागांपैकी कोनाड्याचा मध्यभाग चार विभाग असतो. त्याच पद्धतीने रुंदी (आडव्या) सहा भागांत विभागावी. (३५१)

वरच्या जागी फक्त एका (आडव्या) भागास बन्धनस्थान म्हणतात. या आडव्या भागातील बन्धाचे खांबांवरील भाग वगळून (३५२)

जो भाग राहतो तो गर्भदेश (कोनाड्यातील मूर्तीची जागा) असून त्याचे उभे तीन भाग करावेत. यापैकी जास्त उठावाच्या मधला भाग लक्ष्मीबंधाच्या स्वरूपाचा असतो. (३५३)

[मध्यभागी लक्ष्मीची मूर्ती असते.]

या जागेच्या दोन्ही बाजूंना सारख्या अंतरावर रेघा आखाव्यात. दाराच्या आकृतीच्या सभोवार नेहमीच तसे (रेघांचे) सुंदर काम करावे. (३५४)

[मूर्तीभोवतीच्या चौकटीचे हे वर्णन आहे.]

सारख्या अंतरावर असलेल्या या पाच किंवा तीन रेघा असाव्यात व फक्त मधल्या पट्टीत कणिकेच्या आकारावर गुण्डिका असतात. (३५५)

**पार्श्वदेवतांचे ध्यान** (छायाचित्र **५८ आ**)

**हेरम्ब (गणेश)**

शिल्पीश्रेष्ठाने दक्षिण दिशेकडील कोनाड्याच्या मध्यभागी विघ्नांचा नाश करणाऱ्या हेरम्बाची (मूर्ती) स्थापन करावी. (३५६)

तीन ठिकाणी वाकलेल्या (त्रिभंग) स्थितीत असलेला, मुकुटाप्रमाणे बांधलेल्या जटांनी भूषविलेला, केसांच्या बटा अर्धचन्द्राप्रमाणे असून केयूर व कटक (हे दागिने) ल्यालेला असतो. (३५७)

कान सुपासारखे, बुटका, चार हातांचा, तीन डोळ्यांचा, अंकुश व नागपाशिका (अनुक्रमे) वरच्या उजव्या व डाव्या हातांत धारण केलेले असतात. (३५८)

मोठे पोट असून पुढच्या बाजूच्या मोदकापर्यंत सोंड असते. जमिनीवर उभा असलेला, उत्कृष्ट परशू त्याच्या उजव्या हातांत ठेवतात. (३५९)

अशा स्वरूपाचा (गणेश) दक्षिण दिशेला प्रयत्नाने स्थापावा.

**अम्बिका**

(त्याच्या) डाव्या भागी (त्याचे) शक्ति स्वरूप असलेली गौरी-अम्बिका असावी. (३६०)

अनेक अलंकारांसह सुंदर दिसणारे पीठ तेथे असते. त्यावर उभी (लम्बभावेन) त्रिभंग स्थितीतील शक्ति असते. (३६१)

वरच्या दोन हातांपैकी डावीकडे कवटी व उजवीकडे तलवार असून खालच्या बाजूला खालचे हात अभय व वरद मुद्रेत असतात. (३६२)

तिचे वाहन दैवी सिंह असून तिला परिचारिकांनी वेढलेले असते. चामर इत्यादी धारण केलेल्या त्यांनी वरती व बाजूंना भूषवावे. (३६३)

**कार्तिकेय**

(देवालयाच्या) पाठीमागील भिंतीच्या जागी असलेल्या कोनाड्यांत सहा मुखांचा, देवसेनापती असलेला, सुंदर कार्तिकेय स्थापावा. (३६४)

जटाभारासह असून किरीट (मुकुट) व सुंदर कुंडले घातलेला, सहा डोक्यांचा, अत्यंत शांत व तेजस्वी चेहऱ्याचा देव असतो. (३६५)

अनेक अलंकारांनी भूषविलेला असून बारा हात असतात. शक्ति, पाश तसेच तलवार, कवटी व कातड्याची केलेली ढाल, (३६६)

बाण, त्रिशूल इत्यादी डाव्या तळहातांत ठेवलेली असतात. उजव्या हातांत ठेवलेली असतात अंकुश, शोभिवंत ध्वज, (३६७)

घटित (तर्जनी) मुद्रा, धनुष्य, तसचे खेटक व दैवी छातीची जागा भूषविणारा कोंबडा (ताम्रचूल). (३६८)

अनेक अलंकारांनी भूषविलेला, वीरोचित अलंकारांनी शोभणारा (असा कार्तिकेय) प्रवीण (शिल्पीने) सुंदर निशागृहांत (कोनाड्यात) {पृष्ठभागी} स्थापन करावा. (३६९)

**ऊर्ध्वगर्भिका** (छायाचित्रे **५४ आ** व **५५ ई**)

उत्तम गर्भिका भागाचे निरनिराळे विभाग, तसेच कोपऱ्यांपाशी छेदलेल्या अशा गर्भकाच्या भागांची माहिती ऐक. (३७०)

कोनाड्याच्या पोकळीच्या वर पट्टिकेपर्यंत जी जागा ती गर्भक म्हणून प्रसिद्ध आहे, तीस निशामंडन (कोनाड्याचा अलंकार) म्हणतात. (३७१)

उंचीचे तीन व रुंदीचे पाच एकमेकांस जोडून भाग करावेत. (सर्वात) खालच्या पहिल्या भागांत तीन रेघा असलेली पट्टी असते. (३७२)

पट्टीच्यावर रेघांनी आखलेले कमळ (पद्मरेखा) व त्यावर खान्दि असते. (दुसऱ्या आडव्या) भागाच्या दोन विभागांपैकी एक भागाची ही खान्दि असते. (३७३)

तिच्या वरच्या भागी उत्कृष्ट वसंत, चूलिका इत्यादी असतात. चूलिकेच्या वरच्या भागी तीन भागांपैकी एक भाग खोलवा (गव्हर) असतो. (३७४)

या खान्दिच्या वरच्या भागी योग्य भागांची फेणि किंवा अर्धकुम्भिका असतात. चवथ्या भागातील एक भाग खोलवट असून तेथे पट्टिका असते. (३७५)

पट्टीच्या शेवटी (वरती) दुसरा भाग {वरच्या बाजूस वळलेल्या} कमळाच्या पाकळ्यांनी भूषवितात. पीठाच्या शेवटी श्रेष्ठ चूलिका असून ती मागच्या बाजूस अरुंद असते. (३७६)

चूल (द्वाराग्रावरील) वसन्तपट्टीला स्पर्श करतो असा कोनाड्याचे अंग असलेला महान गर्भक असतो. गर्भकाच्या शेवटी (वरती) जमिनीकडे खालच्या बाजूस (लोंबत आहेत) असे लहान कुंभ (कुंभि) असतात. (३७७)

सुंदर भिंतीची जागा अशा विभागांसह असते. पद्मगर्भ प्रकारच्या (देवालयाच्या) प्रमुख अवयवांच्या प्रकारांची ही माहिती आहे. (३७८)

**भित्तिबन्धना** (पद्मगर्भाच्या भिंतीवरील वेलबुट्टी) (छायाचित्रे **५५ ई** व **५६ अ, आ**)

पहिल्या भागाच्या शेवटी वरच्या भागाला वरची भिंत (ऊर्ध्वभित्ति) म्हणतात. वाडभीच्या भिंतीच्या वरती प्रमुख भागावर भित्तिबंधना (भिंतीवरील वेलबुट्टीची पट्टी) असते. (३७९)

जर भिंतीची मोजलेली (उंची) चार भागांत विभागली तर येणाऱ्या भागाकाराच्या मापाने ऊर्ध्वभित्ती (ची उंची) ठेवावी. (३८०)

भिंतीच्या लांबीने फक्त हा बन्ध वाढवावा, (त्यासाठी) तो अनर्थ, अनुराह व कोणक यांच्यावर (ही) खोदावा. (३८१)

चारी बाजूंना योग्य जागी, पुढच्या व बाजूंच्या कोणकांवर, निशेच्या (कोनाड्याच्या) वर अशा फक्त निषेधस्थळी (हा बन्ध) खोदू नये. (३८२)

{समोरच्या व दोन्ही बाजूंच्या राहांच्या पृष्ठभागी व कोनाड्याच्या वरच्या भागी (हा बन्ध) वगळावा, तेथेच फक्त तो खोदू नये. (३८२)}

या बन्धाची जी जागा तिच्या रुंदीचे (लांबीने) तीन भाग करावेत. वरती खाली पट्टी असून मध्ये कमळांच्या आकृती रेखाव्यात. (३८३)

वसंत (पट्टीत) जी पहिल्या भागांत असते, वर्तुळाकृती उत्तम वेलबुट्टी करावी. वरती व खाली अरुंद पट्ट्या विशेषतः कराव्यात. (३८४)

दुसऱ्या भागांतील पीठ कमळाच्या पाकळ्यांनी सुशोभित करावे. निपुण शिल्पींनी रेघांना अनुसरून खोदकाम करावे. (३८५)

तिसऱ्या भागाची जी रुंदी त्या रुंदीचे (लांबीने) दोन भाग करावेत. (हा तिसरा भाग) जो काहीसा खालच्या पातळीत असतो त्याच्या एका भागावर हत्तींची रांग असते. (३८६)

दुसऱ्या भागात गवाक्षक असतात किंवा उड्या मारणाऱ्या घोड्यांची (वाजिझम्पका) (रांग) असते. त्यावर जर हत्ती, घोडे तसेच राजा (यांच्या मूर्ती) असतील तर त्यास राजबन्ध म्हणतात. (३८७)

**हत्ती, घोडे तसेच राजबन्धाची माहिती**

बन्धांच्या प्रकारांची नावे त्यांच्या प्रकारांप्रमाणे असतात, ते ऐक. फक्त हत्ती असतात ती प्रसिद्ध गजमालिका. (३८८)

त्या जागी जर रांगेमध्ये मांडलेले घोडे असतील तर शिल्पविद्येच्या मताने तिला वाजिझम्पा असे नाव आहे. (३८९)

हत्ती, घोडे, सैनिक, सैन्याच्या पुढला भाग इत्यादी खोदलेले असतील तर त्या राजपट्टाचे नाव राजबन्ध सांगतात. (३९०)

राहाच्या फक्त बाजूंना या बन्धाचे स्थान असते. कोठल्याही स्वरूपांत वरच्या भागी त्या स्थानी (हा बन्ध) खोदावा. (३९१)

**राहाचा वरचा भाग** (छायाचित्रे **५३ इ, ई, उ** व **५६ इ**)

हे धीरगंभीर, सर्वांत आवडत्या शिष्या, तेथील निरनिराळ्या विभागांच्या प्रकारांची नावे, भाग व उपविभाग यांची माहिती सावधान चित्ताने ऐक. (३९२)

राहाच्या वरच्या भागी, भिंतीच्या अग्रापाशी वसन्तिका असते. तिच्यावरती अर्ध्या भागाची उत्कृष्ट खान्दिका खोदावी. (३९३)

खान्दिच्या वर असलेल्या फेणीच्या सुंदर अवयवावर तीन किंवा चार संख्यांच्या रेघा, तिच्या लांबीवर, रेखाव्यात. (३९४)

रेघांच्या वरती तीन खंडांच्या फेणीचा आकार दोन भागांइतक्या उंचीचा असतो. (फेणीच्या) वरच्या भागी तीन किंवा चार संख्यांच्या रेघा आखाव्यात. (३९५)

(राहावरील) हा भाग व (अनर्थ, अनुराह, कोणक यावरील) बन्धनाच्या पीठाचा भाग हे एका पातळीत असणे आवश्यक आहे, व राजबन्धाच्या पातळीत राहावरील सुंदर वसन्तबन्ध असतो. (३९६)

(या वसन्तबन्धांत) अनेक वळणे अनुक्रमाने असलेल्या वेलींचे व फुलांचे खोदकाम करावे. खाली व वर पट्टी असून मध्यभागी वेलींची सुंदर नक्षी असते. (३९७)

भागांना अनुसरून सुंदर रेघांच्या सहाय्याने, नियमानुसार समभागांचे वृत्तवज्रांग मस्तक कोरावे. (३९८)

प्रथम (वसन्त) बन्धाच्या ज्या (वरच्या) रेघा त्यांना अनुसरून (त्यांना स्पर्श करेल असे) वर्तुळ आखावे. {लांबीवर} वरच्या बाजूला, नियमानुसार, सिंहाचे मुख रेखावे. (३९९)

सिंहमुखाच्या पुढच्या खालच्या भागी, लहान लहान वर्तुळांची, वर्तुळांच्या मध्यरेषेवर पहिल्या वर्तुळाला (सर्वात आतल्या वर्तुळाला) स्पर्श करील अशी, लोंबणारी माळ असावी. (४००)

(वर्तुळे) कोरली आहेत त्या भागांत तसेच त्यांच्या बाजूंना एकमेकांत गुंतलेल्या (गुंफलेल्या) अग्नीज्वाळांप्रमाणे असलेल्या वक्राकारांचा वर्तुळांमध्ये वेढा दिलेला असतो. (४०१)

तिसऱ्या वर्तुळाच्या मध्यभागी शोभिवंत मस्तक, गोलाकार वर्तुळांच्या आकारांच्या लहान लहान कोरीवकामांसह, खोदावे. (४०२)

वाडभी (प्रकारच्या प्रासादाच्या) भिंतीची लक्षणे व प्रकार यांची ही संक्षिप्त माहिती आहे. या प्रकारच्या (प्रासादाच्या) शिखरावर इतर नक्षी केव्हांही कोरू नये. (४०३)

कोणक व इतर (अनर्थ, अनुराह वगैरे) यांच्या (शिखरावरील) जागा केवळ साध्या स्वरूपात (नक्षी विरहीत) असतात. राह देखिल तशाच स्वरूपाचा बांधावा व बेकिपर्यंत तो (क्रमाक्रमाने) अरुंद करीत न्यावा. (४०४)

सुंदर बेकिवर किंवा मुद्रकावर व वर्तुळाकार आमलकीच्या खाली लहान आकाराचा सिंह {किंवा भैरव} असतो. (४०५)

तेथे सुंदर कमळाच्या आकाराचा कळसाचा आधार (पिण्डिका) असावा. पद्मगर्भ प्रकारच्या सुंदर गर्भगृहाचे हे प्रकार आहेत. (४०६)

पद्मगर्भ देवालयाचा अधिपति, देव शंकराचे ध्यान करून येथे पद्मगर्भ इत्यादींची माहिती थोडक्यात दिली आहे. (४०७)

शिष्य व त्यांचे शिष्य यांच्या समजुतीसाठी वाडभी प्रकारचा तलच्छन्द असलेल्या देवालयाच्या फक्त भिंतीची माहिती प्रयत्नपूर्वक सांगतो. (सांगितली?) (४०८)

[उदाहरण–भुवनेश्वर येथील तीर्थेश्वराचे मंदिर.]

**विमानमालिनी** (छायाचित्रे **५७** व **५८अ** )

बुद्धीमंतांच्या तुष्टीपूर्तीसाठी सुंदर, मोठे व पूर्णतया वेगळ्या स्वरूपाच्या विमानमालिनी (प्रासादाची) माहिती सांगतो. (४०९)

[या प्रकराचा प्रासाद फक्त बुद्धीमान शिल्पीच बांधू जाणे असा या श्लोकाचा अर्थ आहे.]

कनिष्ठ प्रकारचे व अपुरे ज्ञान असलेला मी विस्तृत असलेले (शिल्प) शास्त्र कसे सांगू शकेल? (तेव्हां फक्त) सौधिकागमांत दिलेल्या माहितीवरून व या देशाच्या पद्धतीला अनुसरून सांगतो. (४१०)

[येथे लेखकाने केवळ संदर्भग्रंथाचा व गुरुपरंपरेचा उल्लेख केलेला नाही तर जी माहिती देणार तिच्या मर्यादाही स्पष्ट केल्या आहेत.]

जी शक्तीस्वरूप असून सर्व प्रकारची शक्ती प्रदान करणारी आहे त्या देवीच्या चरणकमलांवर नेहमी विसंबून (सर्व) तत्त्वांची माहिती सांगतो. (४११)

शंकराच्या शक्तीचे जे स्वरूप, जे रूप (केवळ) ज्ञानाने जाणता येते, त्या स्वरूपाचे चिंतन करून (हे शास्त्र) निःसंशय रित्या मी वर्णन करणार आहे. (४१२)

पूर्वी सांगितलेल्या प्रमाणे पीठाच्या भागांचे खोदकाम करावे. कूर्मपीठ त्याच्या आकाराप्रमाणे करून पंचकर्म इत्यादी करावे. (४१३)

पुन्हा कामातील प्रकार, विभाग, उपविभाग करणे हे अनुक्रमाने शास्त्रांत, रूढीप्रमाणे आणि गुरूच्या उपदेशाप्रमाणे वर्णन करतो. (४१४)

गुरू सर्व प्रकारे श्रेष्ठ असतो. ज्ञानमय शंकर म्हणजेच गुरु असून, गुरू हाच शुभंकर असतो (म्हणून) मी नेहमी गुरुंच्या पादुकांना नमस्कार करतो. (४१५)

[लेखकाचे गुरु माधवभट्ट यांना उद्देशून हा श्लोक असावा.]

गुरूने करुणार्द्रबुद्धीने विमानमालिनीच्या ज्या सारभूत अशा विभाग इत्यादींची माहिती सांगितली ती मी येथे सांगतो, ऐक. (४१६)

शोभिवंत कूर्मपीठाच्यावर पंचकर्म, कोणक इत्यादी तसेच अनुराह, अनर्थ ही योग्य क्रमाने बांधावीत. (४१७)

**पंचकर्म** (छायाचित्र **५८ आ** व आकृती **१५ इ**)

पंचकर्माच्या ठिकाणी किंचितसे वेगळे (खोद-)काम असते. शाक्तपीठासारख्या आकाराचे तीन भागांत विभाजन करावे. (४१८)

पहिल्या (भागांत) खुर, नंतर दुसऱ्या सुंदर भागांत कुम्भ, तिसरा भाग आडव्या तीन भागांत पुन्हा विभागावा. (४१९)

पहिल्या (उपविभागांत) खान्दि, दुसऱ्यात वेलींची रांग असलेला उत्कृष्ट वसन्त, उरलेल्या अर्ध्या भागांत पीठाप्रमाणे खोदावे. (४२०)

[तीन उपविभाग असे पाडावयाचे की वरच्या उपविभागाची उंची मूळ विभागाच्या निम्मे असेल व खालील दोन उपविभागांची एकूण उंची मूळ विभागाच्या निम्मे म्हणजे प्रत्येकी एकचतुर्थांश असेल.]

{कुम्भाच्या वरती} व खान्दिच्या (रुंदीच्या) मध्यभागी उभी मध्यरेखा असते. लहान लहान कोरीव काम केलेली सुंदर फुलांची रांग असते. (४२१)

पंचकर्माच्या वरपर्यंत हे विभाग आहेत; त्याच्यावर (असलेल्या) जांघभागांतील कोणकाच्या विभागांची माहिती ऐक. (४२२)

सौधिकागमातील सर्व प्रकारांत विमानमालिनी उत्कृष्ट आहे. तिच्या सर्व विभागांवर प्राधान्येकरून विमान फक्त खोदतात. (४२३)

कोणक, तसेच अनर्थ व राह, त्याचप्रमाणे गर्भकावर, {सर्व दृष्य} भागांवर उत्कृष्ट विमानाची कामे केलेली असतात. (४२४)

**कोणक** (छायाचित्रे **५९ अ, आ** व **६० अ**)

प्रथम कोणक भाग, तसेच अनर्थ, अनुराह इत्यादींची प्रमुख विभागणीची माहिती यथायोग्य क्रमाने ऐक. (४२५)

विमानाच्या मध्यभागील जागी व भिंतीच्या पाशी खान्दि असतात. रांगेत प्रथम असलेल्या कोणकाचे विभाग प्रयत्नपूर्वक ऐक. (४२६)

पंचकर्माचा वरचा भाग कोणत्या आकाराचा असावा, रुंदीचा वरचा जो भाग (त्याची माहिती) सावधचित्ताने ऐक. (४२७)

आकाशाकडे जाणारी गर्भगृहाची जी उंची संकल्पित केली असेल तिच्या निम्या उंचीची जांघ-भिंतीची आकृती (उंची) असते. (४२८)

त्या उंचीला अनुसरून जांधेचे आडवे चार भाग पाडतात. पहिल्या म्हणजे (सर्वात) खालच्या भागांत पूर्वी सांगितल्याप्रमाणे पंचकर्म करावे. (४२९)

दुसऱ्या विभागाचे दोन (उप) विभाग करतात. खालच्या बाजूस बन्धना असून वरच्या अर्ध्या भागांत तिसऱ्या भागापर्यंत पोचणारी वेलबुट्टी असावी. (४३०)

या भागावर वेलबुट्टी केवळ रेघांनी आखलेली असते. वेलबुट्टीच्या वर चवथ्या भागाचे पुन्हा दोन खंड करावेत. (४३१)

वरच्या भागाच्या वरच्या भागात बन्धना असून तिला ऊर्ध्वबंधना म्हणतात, खालच्या भागाला कामबन्ध म्हणतात. (४३२)

हे आडवे विभाग झाले. आता लांबीने असणाऱ्या रेघांची (माहिती) ऐक. जांघेच्या (लांबीतील) मध्य भागाच्या मोठ्या जागेला (उभ्या) सहा रेघांनी विभागावे. (४३३)

(त्यामुळे होणाऱ्या) सात विभागांपैकी जांघेचा मध्यभाग तीन रेघांनी (तीन विभागांनी?) होतो. त्याला लागून असलेल्या विभागांची पट्टीची जागा असते. (४३४)

दोन्ही बाजूंना लागून असलेल्या दोन भागांनी अरुंद जंघा होतात. (खाली) मुळापासून (वर) शेवटापर्यंत तेथे फक्त साध्या (नक्षी नसलेल्या) पट्टी असतात. (४३५)

रुंदीचे व लांबीचे हे प्रमुख भाग असून उपभाग इत्यादींची दुसरी माहिती सांगतो. (४३६)

**खालची बंधना**

पंचकर्माच्या वरच्या जागेत प्रामुख्याने खालची बंधना असून तिचे मध्यभागी व बाहेरच्या भागी (उभे) सहा भाग करतात. (४३७)

जंघाच्या मध्यभागील लांब पट्टीवर कधीही नक्षी खोदत नाहीत. सहा भागांपैकी फक्त बाहेरचे (प्रत्येकी एक) भाग व मधला भाग यावर नक्षी कोरतात. (४३८)

पहिल्या (आडव्या) भागांत उत्कृष्ट पट्टी असून नंतर कमळाच्या पाकळीच्या आकाराचे पीठ असते. त्यावरील दुसऱ्या भागावर रुंदीच्या अवयवांची माहिती (?) (४३९)

[इंग्रजी भाषांतर–त्यावरील दुसऱ्या भागावर पट्टी आणि इतर अनुक्रमाने असतात.]

त्याच्या वरच्या लांबट भागात वरची मजबूत जांघ असते. जांघेच्या (उंचीच्या) मध्यभागी फक्त अनेक आकाराच्या वेली रेघांनी रेखतात. (४४०)

त्यानंतर पुन्हा लांबट पण काहीशा मोठ्या भागातील वरच्या भागांत ऊर्ध्वबंधनाच्या अवयवांच्या विभागाचे काम असते. (४४१)

{याला डमरू खान्दि म्हणतात. त्याच्या वरच्या भागी पट्टिका असते. पट्टीच्यावर पद्मपीठ असते असा विभागांचा अनुक्रम असतो. (४४०)

त्याच्यावर खांबाच्या आकाराचा लांबट भाग असून पुन्हा त्याच्यावर ऊर्ध्वबंधनासाठी विभाग केलेले असतात. (४४१) }

**वरची वन्धना**

पूर्वी (खालच्या बंधनासाठी) सांगितल्याप्रमाणे वरचा भाग सहा भागांत विभागावा. त्याच्या खाली प्रच्छन्न कोनाड्यात खूप शोभिवंत काम मूर्ती असावी. (४४२)

त्या प्रच्छन्न जागेच्या {जागेवरील} विभागांची अनुक्रमाने माहिती तू ऐक. पहिल्यांदा खाली पट्टीची जागा असते, तिच्यावर पीठ खोदावे. (४४३)

त्याच्यावर तिसऱ्या भागी कुम्भी व सुंदर कुम्भ असतात. कुम्भाच्या मध्यभागी (चवथ्या भागी) पट्टी असून पाचव्या भागी अर्धकुंभांची वर्तुळे असतात. (४४४)

सहाव्या भागांत पट्टी व सातव्या भागी कुंभिकांची जागा असते {व त्याच्यावर शिखराचे स्थान असते.} ऊर्ध्वबन्धना देखिल फक्त मध्यभागी व बाजूंना खोदतात. (४४५)

[ऊर्ध्वबन्धनाचे एकूण सहा भाग असल्याने सातव्या भागी कुंभ स्थल असते ही लेखनिकाची चूक दिसते. त्याच्यावर शिखरस्थान असते ही दुसऱ्या हस्तलिखितातील माहिती बरोबर वाटते.]

काही शिल्पी जंघेच्या फक्त मध्यभागी नक्षी कोरतात. (मात्र इतर काही शिल्पी) जांघेच्या सर्व अवयवांवर नक्षीकाम करतात. (४४६)

दोन्ही बाजूंच्या जांघ भागावर कुम्भिका इत्यादींचे खोदकाम करीत नाहीत. (मात्र) त्यामुळे जांघेचे काम अपूर्ण राहिले असे {कधीही होत नाही.} (४४७)

(खालच्या) बन्धनाच्या वरपासून शिखरापर्यंत जो कोणकाचा भाग त्याच्या जांघेचे काम हे अत्यंत कौशल्याने व प्रयत्नाने करावयास हवे. (४४८)

**शिखर (विमान) भागांतील कोणक** (छायाचित्र ६० आ)

माझ्या प्रिय शिष्या, शिखरावरील (कोणकाचे) विभाग व खोदकाम (यांची माहिती) ऐक. (शिखरावर) जो लांबट (लांबीने) भाग आहे त्याचे जांघेप्रमाणेच (उभे) पाच विभाग करावेत. (४४९)

तेथे खालचा भाग सोडून (उरलेला वरचा भाग) प्रयत्नपूर्वक क्रमाने अरुंद करीत जावे. भिंतीच्या (उंचीच्या) तिसऱ्या भागा इतक्याच उंची इतके उंच सुंदर शिखर (लहान विमानिका) असते. (४५०)

आडवे आठ भाग निरनिराळ्या कामांकरिता खोदावेत. रेघांच्या संकल्पनेने समान भाग पाडतात. (४५१)

पहिल्या लांब पट्टीवरील भागावर वेलबुट्या (व) माळांची रांग कोरतात. दुसऱ्या विभागाची रुंदी (वरून खाली व खालून वरती अशी) मध्यभागापर्यंत सारखीच कांहींशी कमी रुंदीची करतात. (४५२)

या दोन्ही (उतरत्या) बाजूंवर कमळे वगैरे प्रयत्नाने रेखतात. याच पद्धतीने (न्याये) तिसऱ्या भागावर दोन मोठ्या पट्टिका असतात. (४५३)

खालच्या पट्टीवर गुण्डिकांची उत्कृष्ट नक्षी असून वरती (वरच्या पट्टीवर) दन्तुरिकांची (नागमोडी रेघांची) नक्षी असते. चवथ्या भागाचे (तीन) समान विभाग करून एक तृतीयांश भागाची खान्दि असते. (४५४)

इतर दोन विभाग मिळून कमळाच्या आकाराची पीठिका असते. (खाली) दन्तुरिकेची नक्षी केलेली पट्टी असून तिच्यावरती पद्मपीठ असते. (४५५)

चवथ्या भागांत असलेली श्रेष्ठ खान्दि ही शेवटच्या विभागांत (म्हणजे पद्मपीठाच्या वर) असते. वरच्या पाचव्या भागाचे दोन समान विभाग करावेत. (४५६)

पहिल्या (खालच्या) अर्ध्या विभागांत फुलांची मनोहर नक्षी असलेली पट्टी असून, दुसऱ्या (वरच्या अर्ध्या) विभागांत, तिसऱ्या भागांत जशी पीठिका असते तसेच पद्मपीठ असावे. (४५७)

फक्त पाचव्या भागातील कमळे वर वळलेली असतात. चवथ्या भागातील कमळे खाली वळलेली असतात. जो सहावा भाग दोन विभागांचा असतो तो ऐक. (४५८)

प्रथम (खालच्या भागांत) खान्दि असून तेथे वरच्या भागी कमळाची पीठिका असते. पद्मपीठावर लहानांत लहान एक विभागाची पट्टी असते. (४५९)

सातव्या भागाचे दोन विभाग असून पहिल्या (खालच्या भागांत) पट्टिका असते. वरच्या (विभागात) अर्धवर्तुळाच्या आकाराची चूलिका असते. (४६०)

(या भागाच्या उंचीच्या) मध्यभागी व (रुंदीच्या) मध्यभागी वर्तुळाकार घुमट (वज्रांग) असतो, तेथे कुंभिकांची सुंदर माळ (रांग) असून सिंहमुख इत्यादींनी शोभिवंत केलेला असतो. (४६१)

आठवा भाग त्याचप्रमाणे दोन (चार?) विभागांत विभाजतात. पहिल्या व तिसऱ्या विभागांत पट्टी असतात. (४६२)

त्याच्यावर (त्यांच्यामध्ये) वर्तुळाकार खर्पर-चूलिका असते. त्याच्यावर लहान क्षुद्र आकाराच्या कळसाच्या आकाराचा कुम्भ असतो. (४६३)

वर्तुळाकृति रेषेमध्ये {अग्निच्या ज्वाळांची } गुंफण केलेली असते. तसेच ते विमान बांधणाऱ्या कर्त्याला आनंद (जन्मानन्दस्य) वाटेल अशा प्रकारच्या अनेक नक्षी कोराव्यात. (४६४)

कोणकाच्या वरती असलेल्या विमानिकेचे (शिखराच्या भागाचे) असे प्रमुख भाग असतात. तेथे {त्या जागेत} शिल्पी गुरुच्या आज्ञेच्या अनुसार (नक्षींच्या बाबतीत) कल्पना विलास (क्रीडति) दाखवतो. (४६५)

**अनुराह** (छायाचित्रे **६० अ** व **६१**)

कोणकाच्या जांघेच्या मध्यभागाची जी रुंदी तिच्या निम्मे रुंदीच्या मापाचा असेल असा अनुराह चाणाक्ष शिल्पीने करावा. (४६६)

पंचकर्माच्या जागेपासून वरती जी ऊर्ध्वबन्धना असते तेथपर्यंत जी लांबी असते तिच्या आकृतीला नागस्तंभ म्हणतात. (४६७)

पागाच्या शेवटापर्यंत काही वेळा नाग असतो तर कांहीं वेळेला वेलींच्या आकृती असतात. खांबाच्या आकाराच्या या भागाला अनुराह म्हणतात. (४६८)

[वेलींची आकृती असलेला खांब सपाट असून तो नेहमीच राहा व अनर्थ यांच्यामध्ये असतो. नागस्तंभ गोल असून तो नेहमीच कोणक व अनर्थ यांच्या मध्ये असतो.]

त्याचा लांबीचा भाग सात (आडव्या) भागांनी विभागावा. पहिला (सगळ्यात खालचा) व (सर्वात) वरचा (हे दोन भाग) फक्त डमरूच्या स्वरूपाचे असतात. (४६९)

मधल्या पाच भागांत वर्तुळाकृती (लपेटलेली) वेल असते. तिच्या दोन्ही बाजूंना (उभ्या) सुंदर पट्टी अत्यंत प्रयत्नाने (म्हणजे काळजीपूर्वक) खोदाव्यात. (४७०)

(सर्वात) खालच्या भागी, लहान जागी श्रेष्ठ डमरूपीठ असते. ती जागा पाच भागांत विभागावी, मधला भाग अरूंद असावा. (४७१)

खालच्या व वरच्या भागांत फुलांची तसेच गुंडिकांची वर्तुळाकारांतील नक्षी असते. त्यांच्या खालचे दोन भाग कमळाच्या पाकळ्या इत्यादींनी भूषवावे. (४७२)

(कमळाच्या पाकळ्या) एकमेकांविरुद्ध दिशांना, खालच्या (भागातील पाकळ्या) खाली व वरच्या (भागांतील पाकळ्या) वरच्या बाजूला वळलेल्या असतात. तिसरा {मधला} भाग निरुंद असून तेथे थर किंवा वर्तुळाकृती कणीचा थर असावा. (४७३)

या विभागांनी (व नक्षींनी) या खांबाची आकृती सुंदर दिसते. या पागामध्ये अनेक प्रकारच्या अलंकरणांची स्थापना करावी. (४७४)

बाजूंना असलेल्या (उभ्या) पट्टींवर वर्तुळाकार गुण्डिका किंवा रंगणीची फुले असतात, किंवा तेथे गव्हाच्या दाण्यांची नक्षी असते. (४७५)

मध्यभागी, व्यवस्थित निश्चित केलेल्या जागी, रमणीय लताबन्धाच्या जागी श्रेष्ठ स्वरूपाचा भुजंगबंध करतात (तो) ऐक. (४७६)

**भुजंगबन्ध**

पंचकर्मापासून जांघेच्या वरच्या भागापर्यंत लांबी असून (कोणकाच्या रुंदीच्या) निम्मे रुंदीचा हा खांब निःसंशय असतो. (४७७)

पूर्वीप्रमाणेच आडवे सात भाग पाडावेत. जेथे मध्यभागातील पाच कोष्ठ (भाग) असतात तेथे नागस्तंभ असतो. (४७८)

हे पाच भाग लांबीने (उभे) तीन भागांत विभागावे. बाजूंना खालच्या पातळीत असलेल्या जागी सारख्या रुंदीची अरुंद (पट्टी) असते. (४७९)

(सर्वात) खाली जे पहिले स्थान (भाग) त्या भागी सिंहाचे मुख असते. त्याचे डोळे व नाक भयकारी असून मुखाच्या ठिकाणी पोकळी असते. (४८०)

दुसऱ्या भागाच्या मध्यभागी डहाळ्या, पाने यांच्या आकृती असतात. तसेच सर्पराजाच्या डोक्यावरील (वरच्या) सहाव्या भागात ही नक्षी कोरावी. (४८१)

सातव्या भागाचे सारख्या उंचीचे आठ (आडवे) विभाग करावेत. रुंदीवरती ज्या रेघांची संकल्पना करतात त्यांची व खोदलेल्या अवयवांची माहिती काळजीपूर्वक ऐक. (४८२)

त्या भागाचा तिसरा व सहावा भाग निरुंद असून चवथ्या व पाचव्या विभागांत कुम्भ असतो व आमलकी सारख्या रेघा (खांचा) त्याच्यावर असतात. (४८३)

मध्यभागी असलेले पान अनेक अलंकारांसह खोदावे. { दुसरा व सातवा भाग हे काहीसे निरुंद असून या भागांवर अत्यंत काळजीपूर्वक गुण्डिका रेखाव्यात. (४८४) } यानंतर (खांबाच्या) मधल्या तीन भागांचे प्रकार ऐक. (४८४)

तो भाग (तीन भागांची लांबी) आडव्या सुंदर चार भागांनी विभागावा. सर्वात वरच्या चवथ्या भागांत नागाचे शीर्ष खोदावे. (४८५)

जेवढी रुंदी असेल तितक्या (रुंदीच्या) सुंदर फणेसह असावा. फणीच्या पोकळीत मोठा नाग (मनुष्याकृती मस्तक) असून त्याला रत्नांनी भूषविलेले दोन हात असतात. (४८६)

त्या हातात नांगर व मुसळ असून कंबरेपर्यंत (तो मनुष्यरूपात) दाखवितात. हार, केयूर तसेच डोक्यावर रत्नांनी अलंकारिलेला मुकुट असतो. (४८७)

काही वेळेला सुंदर नागांची जोडी असते. उरलेल्या तीन भागात वक्राकार (खांबाला लपेटलेल्या स्थितीत) शोभिवंत शरीर असते. (४८८)

शेपटी जर खालच्या दिशेला असेल तर सारख्या विभागांच्या (नागाच्या) वळ्या असतात. शेपटी वर असेल तर तसेच असून मुख (खालच्या बाजूला) उलटे दाखवितात. (४८९)

शेपटी (खालच्या बाजूला असून) वरच्या बाजूला वळलेली असेल तर ती मधल्या भागापर्यंत असते. शरीरावरील सर्व कातडीवर गोल खवले प्रयत्नपूर्वक कोरावेत. (४९०)

फणीमध्ये दोन जीभा असून (तो नाग) जणू फूत्कारतो आहे असा दाखवावा. स्तंभाच्या जागी अशा रीतीने नागबन्ध कोरावा. (४९१)

नागलोकींचे हे गण प्रासादाचे रक्षण करतात. प्रत्येक पागावर व त्यांच्या मधल्या अंतरात सुंदर नागमाता इत्यादी खोदावेत. (४९२)

(या नागस्तंभांनी) कुलिश इत्यादि सर्प निश्चितच संतुष्ट पावतात. शिल्पीने या नियमांप्रमाणे नागस्तंभ कोरावेत. (४९३)

**अनर्थ** (छायाचित्रे **६१ अ** व **६२ ब**)

अनर्थाच्या जागी असलेला दुसरा शोभिवंत पाग ऐक. जशी जागा असेल तसा आकार असून त्याची उंची व रुंदी (कोणकपागा इतकी) असते. (४९४)

[कोणक हा पहिला पाग व अनर्थ हा दुसरा पाग].

त्याच्या खालच्या भागी, (सर्वात) खालच्या पहिल्या भागी, (सर्वात) वरच्या भागी तसेच मध्यभागी भागांची विभागणी व खोदकाम जसे अगोदर कोणकासाठी सांगितले तसे काही फरक न करता (शिल्प-) काम करावे. (४९५)

पंचकर्माच्या शेवटी (वरती) बंधना नंतर तेथे सुंदर जांघ असून जांघेच्या शेवटी (वरती) रुंदीने (ऊर्ध्व-) बंधना असते. तिच्यावर शिखर असते. (४९६)

जसे पूर्वी सांगितले त्याप्रमाणेच विभाग व खोदकाम करावे. विभागणीनुसार निरनिराळे अलंकार करावेत. (४९७)

**कामकलातत्त्व**

या संबंधी कामबन्धाचे शिल्पविद्येला अनुसरून कसे प्रकार असतात त्याची माहिती सांगतो, ती तू ऐक. (४९८)

काम हे जगाचे मूळ आहे, कामामुळे प्राणी जन्मतात. मूळ भूत तसेच प्राणी कामामुळेच लयास जातात. (४९९)

शिव व शक्ति यांच्याशिवाय ही सृष्टी (निर्माण झालेले जग) हे फक्त कल्पनेतच राहिले असते. कामकर्म केल्याशिवाय जन्म तसेच मृत्यूही असणार नाही. (५००)

शिव हा साक्षात महालिंग असून शक्ति भग स्वरूपात असते. त्यांच्या एकत्रित येण्याने सर्व जगत् निर्माण होते. त्या क्रियेस कामक्रिया असे म्हणतात. (५०१)

आगमांमध्ये कामकलाविद्येच्या तत्त्वाचा पुष्कळ विस्तार केलेला आहे. कामकला (यंत्रा) शिवाय जी जागा तीस वर्ज्य जागा म्हणतात (मानतात). (५०२)

कौलाचाराच्या मताने (असे) वर्ज्य स्थान नेहमीच हीन समजतात; ते काळ्यागर्तेप्रमाणे असून मृत्यूच्या गुहेप्रमाणे ते स्थान नेहमी त्यागावे. (५०३)

कामकलायंत्राची पूजा व शक्तीची पूजा यांच्या शिवाय (साधकाचे) साधन हे हत्तीने केलेल्या स्नानाप्रमाणे निष्फळ होते. (५०४)

हे यंत्र जेथे असते ते घर वीरमन्दिर असते, (त्यामुळे) सर्व प्रकारच्या विघ्न, भीती यांचा कायमचा नाश होतो. (५०५)



एन ४१३३–९

(या) यंत्राच्या केवळ दर्शनमात्रेकरून भूत, प्रेत, पिशाच, कौणप (समंध) वगैरे भयानक (व्यक्ति) दुरूनच पळून जातात. (५०६)

हे नेहमी गुप्त ठेवावयाचे यंत्र सांगतो, ते ऐक. कौलाचाराशिवाय इतरांना हे यंत्र कधीही देऊ नये. (५०७)

**कामकलायंत्र** (आकृती **१६** व छायाचित्र **६२ अ**)

**आकृती १६––कामकला यंत्र**
२.५०८–५२९

वीरभूमी (म्हणजे कामकलायंत्र आखावयाचे क्षेत्र) चौरस अथवा आयताकार असते. या महाक्षेत्राचे दोन रेघांनी चार चौरस (किंवा आयत) करावेत. (५०८)

या माणिकगृहांत उभ्या व आडव्या एकमेकांस छेदणाऱ्या रेघा आखाव्यात. मणिबिन्दू (मध्यबिन्दू) पासून सुरुवात करून, त्याच्यावरती भगाकृती (त्रिकोणाकृती) आखाव्यात. (५०९)

(चौरसाच्या) खालच्या जागेपासून (सर्वात खालच्या आडव्या रेघेपासून) सुरुवात करून मणिबिन्दूच्या जागेपर्यंत असे लांब लिंगाच्या आकाराचे लिंगपीठ आखावे. बिन्दूच्यावर मणिका (अर्धवर्तुळाकृति) असावी. (५१०)

मणिकाच्या वरच्या जागी कामबिन्दूचे स्वरूप दाखविणारा कन्दाचा आकार व बिन्दु असतो; तो सर्वप्रकारच्या सिद्धी देणारा असतो. (५११)

त्याच्या (बिन्दूच्या) शेवटी (वरती) सोळा आत्मकांच्या (मातृकांच्या) भागांचे विभाग न्यासासह ठेवावेत. सुंदर रेषांच्या सहाय्याने ते लिंगाशी जोडावेत. (५१२)

त्या सर्व सोळा महाशक्ति स्वतःच योन्याकार असतात. ती सोळा {क्षेत्रे} केवळ रेघांनी लिंगास जोडावी. (५१३)

[१६ भगांश म्हणजे १६ महाशक्ति]

१५ {१४} प्रमुख कलाक्षेत्र लिंगक्षेत्राला रेघांनी, नियमाप्रमाणे कशा प्रकारे जोडतात, (५१४)

[ही क्षेत्रे सोळा आहेत]

योनिच्या आकाराच्या, त्रिकोणाच्या आकाराच्या, त्या जागेत त्या कला एकमेकास कसे जोडतात की त्यामुळे अढळ असे यन्त्र निर्माण होते. (५१५)

{वरच्या भागात (सर्वात वरच्या रेघेवरील मध्यबिन्दूपासून मध्यभागाच्या आडव्या रेघांच्या टोकांना जोडणाऱ्या) दोन तिरप्या रेघा आखाव्यात (कीलच्छेद) व खालच्या (मध्यरेषेच्या मध्य–) बिंदूपासून सुरुवात करून (वरील दोन) कोणांपर्यंत (त्यांचे विभाजन करणाऱ्या तिरप्या) रेघा आखाव्यात.} (५१६)

(वरील रेघांनी निर्माण होणाऱ्या बाजूंच्या त्रिकोणाचे आडव्या रेघेने प्रत्येकी दोन भाग करावेत.) पहिली (पहिल्या भागांत) कामेशी शक्ति दुसऱ्या (त्याच्या खालच्या भागात) भगमालिका, तिसऱ्यांत नित्यक्लिन्ना व चवथ्या भागांत भेरूण्डा असते. (५१७)

डावीकडील अर्ध्या भागात तीन क्षेत्रे असून पहिल्या योनिकडे गेलेल्या रेघेवर महावज्रेश्वरी व तिच्या बाजूला शिवदूतिका असते. (५१८)

तिच्या बाजूस कोपऱ्यातील जागी चिच्छक्ति वन्हिवासिनी असते. डावीकडच्या खालच्या जागेत, सुंदर रेषांनी, (५१९)

(व) मणिक्षेत्राकडे गेलेल्या रेघेने विभाग केलेल्या जागेत तेथे {डाव्या} बाजूला असलेल्या भागांत वज्रेश्वरी असते. (५२०)

{पीठिकेच्या} (लिंगाच्या) उजव्या बाजूला कलात्मिक अशी नित्य शक्ति त्वरिता असते. (लिंगाच्या) डावीकडे त्वरितेच्या डाव्या जागी कुलसुन्दरी असते. (५२१)

येथपर्यंत अनुक्रमाने {बाजूंकडे} असलेल्या सुंदर जागा असतात. केवळ महाक्षेत्रच असे भगपीठाचे सहा संख्यांनी भाग होतात. (५२२)

लिंगाच्या उजव्या बाजूला कीलपताका शक्ति असते. योनीपीठाच्या जागेच्यावर कामांगी ज्वालमालिनी असते. {तिच्या डावीकडे, नियमाप्रमाणे, ज्वालमालिनी ठेवावी.} (५२३)

खालच्या (वरच्या?) भागी नेहमी विजया {भैरवीची} सहचारी असते. मणिपीठाच्या {डाव्या} बाजूला कामकलेश्वरी शक्ति असते. (५२४)

तिच्या उजव्या बाजूला दिव्य त्रिपुरासुन्दरी असून {वरच्या बाजूला विजयेसह भैरवी स्थापावी.} (५२५)

या कामकलात्मिक {सर्व} सोळा शक्ती चौरसांत असतात. (चौरसाच्या) बाहेर, बाहेरील आवरणांत, योगिनी असतात. (५२६)

वरती मध्यभागी निर्भरा असून डाव्या कोपऱ्याशी (बाहेर) रहस्यका असते. डावीकडे मध्यभागी कुलोत्कीर्णा, कोपऱ्याशी {तीच्या तळाशी} अतिरहस्या असते. (५२७)

खाली मध्यभागी सम्प्रदाया, कोपऱ्याशी गुप्ततरंगिका, मध्यभागी गुप्तयोगिनी व वरती उजवीकडे निगर्भा असते. (५२८)

या योगिनींच्या जागा असून त्यांना विशेषतः कलाक्षेत्र म्हणतात. कंद असलेल्या जागी महाकामकलेश्वरी ही पराशक्ति असते. (५२९)

**महाकामकलेश्वरीचे ध्यान**

अनेक रंगांचे वस्त्र नेसलेली, शांत (मुद्रेची), (माजात आलेल्या) हत्तीप्रमाणे मदोन्मत्त स्वरूपाची, रतीसुखाने मत्त झालेली अशी प्रकाश मंडलाच्या मध्यापाशी असते. (५३०)

कमलफुलांचा पाश, योनिमुद्रा व कोदण्ड (धनुष्य) डाव्या हातांत व उजव्या हातात किंशुकाची कळी, (५३१)

अक्षमाला व वरद आणि अभय मुद्रा धारण केलेले असून मदनाच्या तीक्ष्ण पाच बाणांनी विव्हळ झालेली असते. (५३२)

[किंशुक = पळस]

**कामकलेश्वर शिव**

मणिभागाच्या खालच्या बाजूला कामकलेश्वर शिव असतो. फिकट निळ्या रंगाचा, गंभीर मुद्रेचा, योगासनांत बसलेला, सर्वव्यापी, (५३३)

कामकलेश्वरीसह मैथुनात नेहमीच रत असलेला, आज्ञाचक्रावर आरूढ झालेला असा रजःपानात नेहमी मग्न असतो. (५३४)

[रजःपान–खेचरीमुद्रेत ध्यानात बसल्यावर टाळूकडून रस द्रवू लागतो. सहस्त्रार चक्रामधून हा रस येतो. रजःपान म्हणजे हा रस पिणे. या रसास सिद्धिधर, सुधाराज व योग-गंगा अशी नावे आहेत.–कौलचूडामणी, ४ चे प्रकरण, हस्तलिखित.]

चीवर वस्त्र नेसलेला, योगी, कामकलेश्वर, कामकलामहायंत्राचा अधिपती, काळा असा शंकर असतो. (५३५)

[चीवर वस्त्र–महाकाळ स्तोस्त्रांत काळ्या हरणाच्या कातड्याला चीवरोत्तरीय म्हटलेले आहे. तेव्हा चीवर वस्त्र पांघरलेला असा अर्थ करावयास हवा. शंकर = सर्वांचे कल्याण करणारा असा येथे अर्थ करता येईल.]

हे सर्वांत रहस्यमय असे यंत्र सर्वांच्या (जागेच्या) रक्षणासाठी उत्तम समजतात. ते प्रत्यक्ष असून शक्ति देणारे व साक्षात सर्व सिद्धी प्रदान करणारे आहे. (५३६)

शक्तिपीठ किंवा रुद्रपीठ असलेल्या प्रासादांतील उत्तम जागी हे यन्त्र अक्षय्य ठेवावे. त्याने हा प्रासाद अढळ होतो. (५३७)

हे यंत्र गुप्त, अत्यंत गुप्त असून सगळ्यांना दाखवू (दिसू) नये म्हणून या यंत्राच्या रेघांवर स्त्री पुरुष जोडीची मूर्ती खोदावी. (५३८)

कौलाचाराच्या मताने शोभिवंत जांघेवर, भिंतीच्यावरच्या विभागांत लोकांच्या आनंदाप्रीत्यर्थ कामबन्धाची स्थापना करावी. (५३९)

श्रेष्ठ अशा अनर्थपागावर कामबन्ध नेहमी असावा. तशाच आकाराच्या कोणक इत्यादी (अवयवांवर) शिखरापर्यंत असावा. (५४०)

अनर्थपाग (कोणकाच्या) उंची इतक्याच उंचीचा, तितक्याच विभागांचा, सारख्याच रेघांना अनुसरून (नक्षी) खोदलेला असा वर सांगितलेल्या नियमांप्रमाणे करावा. (५४१)

**राहा** (छायाचित्र ६३)

राहाच्या बाजूला विशेषत्त्वाने असलेल्या सुन्दर खान्दिची (माहिती) ऐक. { ती (अनर्थ) स्तंभाच्या प्रमाणांत असून तेथे पट्टीवर वेलबुट्टी असते. } (५४२)

[श्लोक ४६९ ते ४७५ मध्ये वर्णिलेला, अनर्थ व राहा यांच्यामध्ये असलेला, हा अनुराह आहे.]

अनर्थाच्या रुंदीच्या दुप्पट राहाची रुंदी असते. राहाची जागा अत्यंत श्रेष्ठ असून शिखर मालिनी (शिखराची उंची) दुप्पट असते. (५४३)

पूर्वी जसे पद्मगर्भाच्या बाबतीत सांगितले तसेच खालच्या भागाचे विभाग त्याच भागांना अनुसरून काळजीपूर्वक कोरावेत. (५४४)

खालच्या बाजूला पंचकर्म इत्यादी त्यांच्या (त्यांच्या) आकारांत अनुक्रमे करावेत. त्यावरील निशास्तंभावर कोनाडा व खूप शोभिवंत व श्रेष्ठ लतेची नक्षी असावी. (५४५)

[निशास्तंभ=कोनाडे असलेला खांब]

पीठापासून निशेच्या (कोनाड्याच्या) वरपर्यंत जेथे वरची वसन्तिका असते तेथपर्यंतची जागा पूर्वी सांगितलेल्या पद्मगर्भ (प्रासादा) प्रमाणे असावी. (५४६)

**राहाचे शिखर** (छायाचित्रे ६४, ६५, ६६ व आकृती १७)

गर्भगृहाच्या शीर्षावरील जे मुख्य अवयव, त्यांचे विभाग, खोदकाम, तसेच अंगोपांगांची कामे यांची सारभूत माहिती ऐक. (५४७)

जांघबन्धनापर्यंत या पागाची लांबीने जेवढी उंची असते तितकीच उंची कोनाड्याच्या वर शिखराची असते. (५४८)

**पार्श्वदेवता**

पूर्वीप्रमाणेच कोनाड्याच्या पोकळीत पार्श्वदेवता स्थापन कराव्यात. शक्तिपीठ (देवीचा प्रासाद) असेल तर तिच्याप्रमाणेच काली, कात्यायनी, तसेच (५४९)

उग्र दक्षिणाकालिका, उग्रचण्डा, कपालिका, वाराही, बगला, श्यामा ह्या बाजूंच्या कोनाड्यांत (पार्श्वपीठ) स्थापन कराव्यात. (५५०)

कोनाड्याच्या जागेच्यावर कोणत्या भागांनी गुम्फनाची नक्षी, रेघांसह खोदकाम करून वेलबुट्टी व पानांच्या गुच्छांची नक्षी करतात. (५५१)

अनर्थावर कोष्ठाच्या आकाराच्या पोकळीची जी खोली असते त्याच्या दुप्पट खोली राहाच्या बाजूच्या भागी असलेल्या (कोष्ठाच्या पोकळीची असते) अशी माहिती आहे. (५५२)

कोष्ठाच्या जागेच्या वरती (द्वाराग्रपट्टीकेचा) पहिला बन्ध झरावलींचा खोदावा. या वरच्या जागेला उठाव दिलेला असतो. (५५३)

[झरावली = पाण्याच्या थेंबांची रांग ]

कोष्ठाची जी रुंदी ती (आडव्या रेघेने) दोन भागांत विभागावी. त्या भागामधील एक भाग चूलाला (चूलाच्या आकाराच्या छप्पराला) जोडावा. (५५४)

{झरापीठापासून सुरुवात करून वरच्या चूलिकेपर्यंत, राहाचे दोन भाग करावेत व तो दुप्पट उंचीचा पुष्कळ काळजीपूर्वक करावा.} (५५५)

तेथील उपविभाग तसेच भाग कोणत्या आकाराचे करतात व वरच्या भागातील विमानमालिकेचे भाग (कसे करतात) ते ऐक. (५५६)

शिखरावरील राहाच्या विमानाच्या दुप्पट उंचीचे आडवे सोळा सारखे भाग करतात. (५५७)

त्या सोळा भागांतील प्रत्येक भाग सारख्या आकाराचे असतात. खालच्या दोन भागांचे (अनुक्रमे) पाच व सात विभाग करावेत. (५५८)

आकृती १७--राहा विमानिका
२.५५३–५८५

{पुन्हा वरच्या चार भागांनी मिळून (प्रत्येकी) दोन भागांच्या दोन जागा कराव्यात. त्या जागेत चूलाच्या स्वरूपात वज्रमस्तक खोदावे.} (५५९)

(सर्वात) खालच्या जागेपासून सुरुवात करून सिंहाच्या मुखापर्यंत अनुक्रमाने (माहिती) सांगतो. (५६०)

(सर्वात खालच्या) पहिल्या भागावर वेलीच्या नक्षींची वसन्तक (पट्टी) असून (खालच्या व वरच्या) दोन्ही बाजूंना पट्टी असतात; (व) मध्यभागी कोष्ठ असते. (५६१)

दुसऱ्या भागांत कोष्ठाच्या वर लहरी (उतरता भाग) असावा. तिसऱ्या भागाचे (आडवे) दोन भाग करून तेथे निरुंद (लहानशा उंचीचे) वीथीपीठ करावे. (५६२)

त्याच्या वरच्या रमणीय भागाला कुम्भाचा आकार द्यावा. फक्त रुंदीच्या मध्यभागी खांबांसह मोठे कोष्ठ असावे. (५६३)

(त्या कोष्ठाच्या) रुंदीच्या एक तृतीयांश रुंदीचे, त्या जागी, लहानशी (फार खोल नसलेली) पोकळी असते. त्या स्थानी, भैरवाची अथवा शिवशंकराची मूर्ती, (५६४)

खांब, पीठ इत्यादींसह असलेल्या (कोष्ठांत) प्रयत्नाने स्थापन करावी. खांबांची उंची तसेच कोष्ठाची उंची तिसऱ्या भागापासून चवथ्या भागापर्यंत असते. (५६५)

शिल्पीने त्या कोष्ठांत गर्भगृहातील मुख्य शंकराची मूर्ती स्थापावी. कोष्ठाच्या दोन्ही बाजूकडील जागेचे चार सारखे भाग करून (५६६)

त्या चार भागातील जो एक भाग तेथे मूर्ती स्थापन करावी. एका भागात सुंदर सखी त दुसऱ्या भागात गवाक्षिकेची नक्षी (असे एकामागून एक) असावी. (५६७)

अनुक्रमाने येणाऱ्या पाचव्या भागाची माहिती ऐक. (आडवे) दोन विभाग करून आलेल्या जागी (खाली) पट्टिका व (वरती) पद्मपीठ असावे. (५६८)

सहाव्या भागाचे दोन सारखे (आडवे) विभाग करून चाणाक्ष शिल्पीने खाली पट्टी व पट्टीच्या शेवटी (वरती) वेलबुट्टी असलेली वसन्तक (पट्टी) नेहमी करावी. (५६९)

त्याच्यावर सातवा व आठवा भाग मिळून जो उंच भाग होतो तेथे उंच आकाराची कमळाची पाने असून खाली पीठाचा आकार दिलेला असतो. (५७०)

(या पाकळ्या) विभाग व उपविभागांसह करतात. मध्यभागी तसेच खालच्या बाजूला कोष्ठ असून तेथे {वज्रमस्तक} असते. (५७१)

सर्व रेघा वर्तुळाकार रेखाव्यात. राहाचा दहावा भाग (काहीसा) अरुंद असतो. सिंहमुख आलम्ब इत्यादी मध्यभागी असून ते उठावदार केलेले असतात. (५७२)

नवव्या भागाचे प्रथम (आडव्या) रेघांनी दोन विभाग करावेत. (खालच्या विभागात) कमळाच्या पाकळ्या असून त्याच्या वरती पट्टी करतात. (५७३)

या पट्टीवर वेल रेखावी, त्यास ऊर्ध्ववसन्त म्हणतात. हा (पट्टीचा) भाग रेघांच्या आकारांनी बाजूंकडे काहीसा वाढवितात. (५७४)

त्याच्यावरती दहाव्या भागी अर्धकुम्भाच्या आकाराची फेणि असते. तिच्यावर वरती जाणारी व उमलणारी पाने असतात, किंवा कुम्भिका असते. (५७५)

अकराव्या भागाचे तीन (आडवे) विभाग करतात. पहिला खालचा विभाग लांबीने (उंचीने) कमी असतो. त्याच्यावर सारख्या विभागाच्या {दोन पट्टिका असून त्यांची लांबी वाढलेली असते.} (५७६)

तिसऱ्या काहीशा लांबट (लांबी वाढविलेल्या) पट्टीवर कळ्यांची रांग असते. त्याच्या वरचा बारावा भाग सिंहपीठाप्रमाणे करतात. (५७७)

हे प्रमुख बन्ध असून (सर्वांत) शेवटी वज्रमस्तक असते. त्यांच्या सर्व अंगोपांगावर, नियमाप्रमाणे, शोभिवंत नक्षी कोरावी. (५७८)

मध्यभागी दोन (समकेन्द्री) वर्तुळे असून (त्यांच्या भोवती) मोठे वर्तुळ रेखतात. त्याच्यावर भयकारी असे सिंहाचे मस्तक खोदतात. (५७९)

पहिल्या (सर्वांत आतल्या) वर्तुळाच्या दोन्ही बाजूंना सुंदर आकाराच्या वळी असतात {व त्या वर्तुळाच्या} मध्यभागी शोभिवंत असे मस्तक असते. (५८०)

दुसऱ्या वर्तुळाच्या बाजूंना कळ्यांच्या गुच्छांची नक्षी असते. पहिल्या वर्तुळात देखिल गुच्छ कोरलेले असतात. (५८१)

रुंदीच्या दोन्ही बाजूंना (वज्रमस्तकाच्या सर्वात बाहेरील वर्तुळाला अनुसरून) नक्षी कोरलेली पट्टीची आकृती असते. तिची रुंदी खालून सिंहमुखापर्यंत जसे जाऊ तशी क्रमाक्रमाने कमी होत जावी. (५८२)

अनेक प्रकारच्या नक्षी असतात तसेच सुंदर गुच्छांचे खोदकाम केलेले असते. शिल्पीश्रेष्ठाने मध्यभागी उत्कृष्ट आलंबिका (वरपासून) खालपर्यंत कोरावी. (५८३)

गर्भकास्थलाला स्पर्श करणारे जे सिंहमुख आहे ते बाजूंना जाडीकडेही असते. तसेच प्रत्येक नक्षीदेखिल त्यांच्या आकृतीप्रमाणे बाजूंना जाडीकडे असते. (५८४)

**राहाभाग**

शोभिवंत केलेला असा राहाभाग (प्रासादाचा) निश्चितच श्रेष्ठ भाग आहे. राहाच्या रेघांशिवाय प्रासाद कनिष्ठ प्रकारचा व अधु (विकल) होतो. (५८५)

राहाला अनुसरून (त्याच्या दोन्ही बाजूंना) अरुंद असे परिराह नियमाप्रमाणे असतात. ते (राहाच्या मानाने) खालच्या पातळीत असून त्यांच्यावर (त्यांच्या बाजूंवर) अलंकार खोदावेत. (५८६)

ते कुम्भाच्या आकाराचे तसेच फुले व वेली यांच्या आकाराचे (नक्षींचे) नियमाप्रमाणे असतात. वाडभी प्रकारच्या गर्भगृहात {हे स्तंभाकार} एकमेकांना जोडून नेहमी असतात. (५८७)

रथ असलेल्या रथक प्रकाराच्या प्रासादात राहाचा भाग घुमटाकृती असतो. {राहाच्या भागावर वज्रमस्तक असते.} खाकरा प्रकाराच्या गर्भगृहाच्या पुढल्या भागी (५८८)

खाकराच्या खालपर्यंन्त मुकुटाच्या आकृतींची गुंफण केलेली (नक्षी) असते. असे सर्व अंगोपांगे सुशोभित असलेली राहा लोकांना आनंद देणारी असते. (५८९)

परिराह व अनुराह हे एकाच पातळीवर असून त्यांचे भाग सारखेच असतात; त्यांच्या भूमि तसेच (भूमिमधले) लांबट क्षेत्र (दोन्हीकडे) सारखेच असतात. (५९०)

इतर सर्व विमान (राहविमान) सारख्या भागांचे असून त्यांच्यावर सर्व (खोद–) कामे सारखीच (एकमेकांस लागून) केलेली असतात. फक्त राहाचा वरचा भाग (विमानाचा भाग) गोपुराच्या आकाराप्रमाणे असतो. (५९१)

आयताकृती क्षेत्रातील वाडभी प्रासादाचे राहामुख असे असते. विमानमालिनी प्रासादाचे हे पहिले थर असतात. (५९२)

या प्रासादात लांबीने (उभे) पाच भाग (पाग) खाचांनी (खान्दिंनी) होतात. (प्रासादाच्या) बाजूंवर ते पाच भाग तसेच असतात. (फक्त) त्याची रुंदी कमी असते. (५९३)

पुढील भागातील राहाच्या भिंतीच्या जागेवर फक्त खोदकाम (नक्षी कोरू) नये. अनर्थ, दोन्ही बाजूंना असलेले कोणक इत्यादी (जसे सांगितले) तसे खोदावे. (५९४)

**गर्भगृह व मुखशाला यांच्या संधीचा भाग (मिलन स्थल)** (छायाचित्र **६६ आ**)

राहाभागाचा रुंदीकडील जो भाग ते मिलन स्थल असते. विमान हा श्रेष्ठ वर असून मुखशालिका ही वधू असते. (५९५)

वर व वधू परस्परांस सम्मुख असून जेथे जोडले जातात ते सन्धिक्षेत्र होते. त्याच्या वरती (वरचा) अर्धा राहाभाग (५९६)

सहाव्या भागाच्या वरपासून शेवटच्या भागापर्यंत (सोळा भागांच्या शेवटपर्यंत) करतात. तो (शेवटचा) भाग सिंहमुखापर्यंत शोभिवंत असा खोदावा. (५९७)

अशा रीतीने (प्रासादाच्या) चारही बाजू अनुक्रमाने शोभिवंत कराव्यात. श्रेष्ठ विमानमालिकेचे हे पहिले उत्कृष्ट आवरण (थर विभाग) असते. (५९८)

श्रीशक्ति कामरूपा, सर्व सिद्धी प्रदान करणाऱ्या हे देवी, माझ्यावर दया कर. मी आता सर्व प्रयत्नांनी, (५९९)

**दुसरा थर**

उत्कृष्ट अशा शिखराच्या दुसऱ्या थराची (आवरणाची) माहिती सांगतो, ती तू ऐक. विमानमालिकेच्या या थरांत (सर्व) विमानिका सारख्याच भागांच्या (सारख्याच उंचीच्या) असतात. (६००)

पहिल्या थराच्या वर कळस इत्यादी समपातळीत असतात. प्रासादाच्या पहिल्या थरावर असलेले बन्ध (देखिल सर्वत्र) एका रेघेत असतात. (६०१)

पहिल्या थरातील तलच्छन्दात (मण्डलम्) ज्या आकाराचे जांघ क्षेत्र असते तोच आकार पुन्हा विमानाच्या शीर्षभागी करतात. (६०२)

प्रासादाचा दुसरा थर व त्यावरील (भाग) निरुंद होत जातो. पहिल्या थराच्या शीर्षाच्या जागी दुसऱ्या थराची सीमा स्थापन करतात. (६०३)

{(देवालयाच्या) मर्यादा रेघेपासून सुरुवात करून कोणक (आतल्या बाजूने) निम्मा अरुंद करतात. त्याचप्रमाणे अनर्थ (देखिल) राहाच्या बाजूला (निम्मा) अरुंद करतात.} (६०४)

{विमानिका कोष्ठाच्या जागेच्या वर, वरच्या (दिशेला) काहीशी वाढवावी. तेथे लांबट जागेत, नियमाप्रमाणे, क्रीडाबन्ध असतात.} (६०५)

तेथल्या उंचीवर, दुसऱ्या सुंदर थराचे, सारख्या भागाच्या वसन्तपट्टीपासून सुरुवात करून जे मी पूर्वी भाग सांगितलेत ते भाग करतात. (६०६)

[आकृति १७ मध्ये दिलेल्या नवव्या भागापासून वरील भाग.]

त्याच्यावरती कमळाच्या पाकळ्या, नंतर दोन सुंदर पट्टिका (ज्यांच्यावर अनुक्रमे) गुण्डिका व दन्तुरिकांची नक्षी असते व नंतर कमळाच्या आकाराचे लहानसे पीठ {कळस} असते. (६०७)

[हे विभाग फक्त कोणकावर असतात.]

अनेक प्रकारच्या आकृत्या, सिंहमुख इत्यादी {अनर्थावर करतात.} विमानाचा हा दुसरा थर कुठलाही विभाग कमी न करता (सगळीकडे सारखाच) असतो. (६०८)

कोणकाच्या वरती असलेल्या विमानिकेचे तसेच अनर्थाच्या वर असलेल्या सुंदर विमानिकेचे विभाग खाली असलेल्या समान विभागांच्याप्रमाणे व त्याच अनुक्रमाने करतात. (६०९)

दुसऱ्या थरावरील विमानावरील पालिकांची रांग निपुण शिल्पीने जशी सांगितली आहे त्याप्रमाणे विधिपूर्वक मजबूत बांधावी. (६१०)

**गर्भकदेश (छप्पर)** (छायाचित्रे **६६ अ** व **६७**)

गर्भदेश (शिखराचे छप्पर) कोणत्या आकाराचे करतात ते तू ऐक. वेगळी अशी ही पद्धत ऐक. येथे कोणक इत्यादी नसतात. (६११)

अनर्थ (देखिल) नसून मध्यभागील राहाचा आकार निराळा असतो. विमान बांधून झाल्यानंतर गर्भ (गृहा-) वर उत्कृष्ट खान्दि असते. (६१२)

[श्लोक ६११ व ६१२ श्लोक ६१६ नंतर यावयास हवेत]

तिच्या (खान्दिच्या) मध्ये असलेल्या त्रिकोणाकृती भागात अलसा नारींची स्थापना करावी. खांबांच्या वर तसेच (त्यांच्या) मध्ये दीर्घाकार असून खान्दिच्या आकृतीप्रमाणे (मापाच्या प्रमाणांत) असाव्यात. (६१३)

विमानावरील अलसा स्त्रीया या एकाच रेघेत (समपातळीत) असतात. दर्पणा, चामरा, लेख्या व शोभिवंत डालमालिका (इत्यादी) (६१४)

अनेक प्रकारच्या स्त्रीया गर्भदेशावर रेखतात (व म्हणून) त्यास नारीबन्ध म्हणतात. दुसऱ्या थरावर देखिल बन्धनाच्या मध्ये भूषणभूत असा नारीबन्ध असतो. (६१५)

हा दुसरा थर झाला, याच्यावर उत्कृष्ट खान्दि असते. हा भाग निस्संशय गर्भकवेढ या नावाने प्रख्यात आहे. (६१६)

[गर्भक वेढ = भिंतीचा उभा भाग]

विमानाच्या शोभिवंत शीर्षाची खालून वरपर्यंत जी उंची तिचे तीन भाग करावेत, त्यातील एका भागाइतकी उंची वेढाची असते. (६१७)

{त्या बेढाच्या उंचीचे तीन सारखे भाग केले असता खालच्या भागांत भिंत नंतर फेणी व (नंतर) जाळीची जागा अशा क्रमाने (हे भाग) असतात.} (६१७)

{रुंदी वाढविलेल्या अशा फेणिकेच्या जागेला वेदवर्तिका म्हणतात. तिच्या खालच्या भागी भिंतीचा भाग असून वरचा भाग जाळीसह असतो.} (६१८)

[वेदवर्तिका = वेढाचा उठावाचा भाग किंवा वेढाची सीमा]

चारी बाजूंना हा कणीचा भाग सिंहाच्या मजबूत दाढेच्या आकाराचा असतो. हे (सर्व) पहिल्या (छप्पराच्या सर्वात खालच्या) भागांत असून त्याच्यावर त्याच्या दुप्पट उंचीची जागा असते. (६१९)

{खान्दि व भिंत मिळून असलेल्या जागी अनेक (प्रकारच्या) नक्षी कोराव्यात}, गर्भाच्या (गर्भदेशाच्या) खालच्या बाजूला असलेल्या वेढाच्या (सिंह-) दन्ताच्या भागावर कमळाच्या पाकळ्या कोराव्यात. (६२०)

दन्तभागाच्या खाली तेथे पट्टी असावी व वरच्या बाजूला मानेचा आकार (कंठस्थलाकृति) दिलेला असतो. काही वेळेला दन्तभागाच्या रेघांच्या आधाराने (रेघांना अनुसरून) कमळाच्या पाकळ्या खोदाव्यात. (६२१)

कंठप्रदेशावर (कंठदेशे) अनेक प्रकारच्या मूर्ती व गवाक्षिका कोरतात. प्रासादाचा कंठ नेहमीच बराच खोलगट असतो. (६२२)

**खर्परभेद** (छायाचित्रे **६७ आ** व **६८ अ**)

त्याच्यावर खर्परदेश (खुद्द छप्पराचा भाग) असून तो अनेक अलंकारांनी भूषविलेला असतो. त्या जागेच्या उंचीचे प्राधान्याने विशेष करून चार भाग करतात. (६२३)

हा रमणीय भाग उत्कृष्ट मुद्रकस्थल (झाकावयाची जागा) आहे. या प्रासादाचा (सर्वात) वरचा भाग श्रेष्ठ पाषाणांचा बनवितात. (६२४)

या गर्भदेशात (छप्पराच्या भागी) एकमेकांवर ठेवलेल्या शिला वर वर जातांना आतमध्ये येतील अशा (अंतर्गमन असलेल्या) असतात. (६२५)

[छंदाकार शिला म्हणजे त्या जागी जशा पाहिजेत त्या आकाराच्या मुद्दाम घडविलेल्या शिला.]

हे पाषाण सारख्या आकाराचे असून (खालच्या) पाषाणावर निम्म्या भागापर्यंत आत गेलेले असतात. प्रत्येक पाषाणाच्या बाजूंना (परस्परांवर न येणाऱ्या भागावर) नियमानुसार छिद्र पाडावे. (६२६)

तांब्यापासून तयार केलेला दोन टोकांचा खिळा या छिद्रांत बसवावा. अशा रीतीने गर्भकदेशी असलेले पाषाण अत्यंत मजबूतीने बसवितात अशी माहिती आहे. (६२७)

पाषाणांत आकडे घालून वरच्या भागातील पाषाण असे जोडतात की {काहीही पोकळी (तेथे) नसून जणू काही एकच पाषाण आहे असे दिसावयास हवे.} (६२८)

फक्त असे छप्पर असलेला, अलंकारिलेला, प्रासाद मजबूत असतो. वर शेवटपर्यंत अशी मजबूती केलेली असून राहावरील विमानिका अशीच मजबूत करतात. (६२९)

तेथे बाहेर व आतला भाग रमणीय, सर्व अलंकारांसह असून अनेक दागिन्यांनी भूषविलेल्या मदनाच्या सुंदर कांतीप्रमाणे (छवि) असावा. (६३०)

त्या गर्भदेशाचा नक्षीशिवाय जो भाग असतो त्याच्या चार भागांवर रेघा कोरणे इत्यादी माहिती तू ऐक. (६३१)

कोणत्या भागी कोणत्या आकाराने मुद्रकस्थल (झाकावयाची जागा) खोदावे (ते ही ऐक.) खालच्या थराची जी उंची तितकीच उंची विमान इत्यादींची (सर्वात वरच्या भागाची) असते. (६३२)

(खालच्या) कंठभागापासून वर असलेल्या सिंहापर्यंत जी उंची तिची रुंदी {गाईच्या तोंडाप्रमाणे} (क्रमाक्रमाने) लहान होत जाते. (६३३)

रुंदीचे उभे सहा भाग करावेत. मध्यभागील दोन भागांनी मिळून एकच भाग करावा. (६३४)

दोन्ही बाजूंना असलेल्या रेघा तसेच विभाग अरुंद असतात. मात्र पुढच्या व पाठीमागच्या भागी असल्याप्रमाणे (त्याचेही) पाच विभाग करतात. (६३५)

सारख्या विभागांनी मुखटा सारखाच (एकाच पातळीत) वरच्या बाजूला वाढविलेला असतो. दोन्ही बाजूंना चूल आडव्या पाच विभागांत असतो {पाच फेणिंसह असतो} (६३६)

फक्त कोणकांच्या बाजूंवर शोभिवंत मूर्ती वगैरे असतात. मधल्या जागेच्या दोन्ही बाजूंना सुंदर केरिवकाम करावे. (६३७)

केरि किंवा इतर नक्षी ही निरनिराळ्या प्रकारांची व रेघांची असते. त्याच्या वरती दोन्ही कोणकांच्या दोन्ही बाजूंना खोदकाम करू नये. (६३८)

**केरकर्म**

खूप कौशल्यपूर्ण असे केरिचे काम सांगतो (ते) तू ऐक. आडकेरि आडवी असून तिच्या शेवटी कमळांच्या पाकळ्याप्रमाणे नक्षी असते. {व ठिया केरि वरच्या बाजूला जाणारी असते.}(६३९)

(केरि कामाच्या) मध्यभागी अरुंद वळी असून वरच्या भागांत तीन वळी असतात. मध्यभागी कुम्भ असून खालची बाजू पाने इत्यादींनी भूषवावी. (६४०)

[हे वर्णन समजलेले नाही]

कोपरे सुंदर पानांनी व अनेक अलंकारांनी (नक्षींनी) भूषवावे, खाली (वरती ?) याच प्रमाणे अलंकारिलेला मुखटा चंद्राप्रमाणे वर्तुळाकार असतो. (६४१)

मध्यभागानंतरचे जे बाजूंचे भाग ते रासात (मग्न आहेत अशा) मूर्तीनी भूषवावे. (किंवा तेथे) राम, कृष्ण अथवा रास, कामक्रीडेत मग्न इत्यादी प्रकार (मूर्ती) असतात. (६४२)

प्रत्येक चौकटीत अगदी लहान आकाराचे त्रिकोण रेखावेत. त्यांच्या मध्ये रमणीय फुले, कळ्या इत्यादी खोदाव्यात. (६४३)

(प्रासादाच्या) दोन्ही बाजूंना वरीलप्रमाणेच कौशल्याचे काम केलेले असते. दोन्ही बाजूंना वरच्या भागी खूप शोभिवंत अशा तीन वळी असतात. (६४४)

त्या भागांच्या दोन्ही बाजूंचे आडवे पाच विभाग करून वळींमधील सारख्याच (उंचीच्या) भागांत वरच्या बाजूला तीन कोनाडे (वेदगृह) असतात. (६४५)

**मुद्रक भाग** (शिखराची छप्पर झाकावयाची जागा)

पहिल्या (खालच्या) भागी ज्या मुद्रा (झाकणाऱ्या शिला) असतात त्यांच्या बाजू अंतर्गमन करणाऱ्या असतात (मुद्रक गंभीरा). {वरच्या बाजूला असलेली जी शिला ती पाठीमागे (पिच्छिलः) पीठाच्या आकाराप्रमाणे असते} (६४६)

[मुद्रकगंभीरा = छप्पर झाकण्यास योग्य अशा जडशीळ शिळा असाही अर्थ होऊ शकेल.]

कोपऱ्यांच्या दोन्ही बाजू सोडून उरलेल्या जागी जणू उडत आहेत असे दाखविलेले किन्नर इत्यादी चारी बाजूंना खोदावेत. (६४७)

या भागाला देशी भाषेत ' गेलबाईचूलि ' (खेळकर स्त्रिया असलेले छप्पर) असे म्हणतात. मध्यभागी लांबीने (उंचीने, सिंहमुखापासून निघालेली) गुंफलेली नक्षी (हार) दाखवावी. (६४८)

**निराळ्या प्रकारचे छप्पर (हस्तलिखित २)** (छायाचित्र **६८ आ, इ**)

तळापासून सुरुवात करून खाकर गर्भकाच्या (खाकर पद्धतीच्या छप्पराचा) बेढ भागाच्या वरच्या जागेचे सहा (आडवे) विभाग करावेत. (६४९)

सुरुवातीपासून जे उपविभाग आहेत ते काळजीपूर्वक ऐक. पहिल्या भागाचे दोन विभाग करून खालच्या विभागांत पीठाप्रमाणे पट्टी असते. (किंवा खालच्या विभागात पट्टी व वरच्या विभागांत पीठ असते.) (६५०)

त्याच्यावरती खांचेच्या स्वरूपाची सुन्दर खान्दि असते. हा दुसरा भाग खान्दिसह असून तिचे स्वरूप गर्भकोदराप्रमाणे असते. (६५१)

[गर्भकोदर = पोटाच्या खळगीप्रमाणे पोकळी]

वरच्या तिसऱ्या भागांत खान्दिच्या रेघांना अनुसरून वरच्या भागासह मनोहर वसन्तक असलेली पट्टी असते. (६५२)

या पट्टीवर लहान लहान पाने, वेली, यांची नक्षी पुन्हा पुन्हा कोरलेली असते. चौथ्या भागाचे दोन विभाग करून त्याच्या (आडव्या) मध्यरेषेवर (६५३)

चूलकेचा आकार खोदावा. वरच्या विभागांत रेघा रेखाव्यात. पाचव्या भागात दोन्ही बाजूंना वेलींच्या आकृतीत चन्द्रिका (मोराच्या पिसावरील डोळा) असावी. (६५४)

फक्त मध्यभागी रेखलेल्या कमळांची रांग असलेली वळी असते. मध्यभागील पट्टीच्या दोन्ही बाजूंना अर्धे वलय असते. (६५५)

त्या अर्धवर्तुळात उत्कृष्ट कमळ खोदावे. बाजूवर त्रिकोणाकृतीत पाण्याचा आकार दर्शविणारी (लाटांच्या स्वरूपात?) सुंदर वेलीची नक्षी असते. (६५६)

(रचनेच्या) या निरनिराळ्या रेघा झाल्यात; इतर विभागांची माहिती ऐक. शीर्षाच्या जागी भिंतही नसते व छप्परही नसते. (६५७)

दोन्ही बाजूना (पुढे व मागे) मध्यभागी मकराच्या आकाराचा सिंह असतो. दोन्ही बाजूंना मध्यभागी उद्यता प्रकारच्या सिंहमूर्ती असतात. (६५८)

**छप्पराचा निराळा प्रकार (हस्तलिखित ३)** (छायाचित्र **६८ आ, इ**)

{तळापासून सुरुवात करून खाकर गर्भापर्यंत (मुखटा) भागाचे सहा (आडवे) भाग एकावर एक असे करावेत. (६४९)

विभागांची, पहिल्यापासून सुरुवात करून, सांगितलेली (माहिती तू) काळजीपूर्वक ऐक. पहिल्या भागाचे दोन विभाग करून त्यातील खालच्या भागात पट्टी व वरच्या भागात पीठ असते. (६५०)

त्याच्यावरती खांचेच्या स्वरूपाची सुन्दर खान्दि असते. दुसऱ्या भागात असलेली ही खान्दिची जागा गर्भकोदराप्रमाणे असावी. (६५१)

तिसऱ्या भागाच्या वरच्या विभागात मध्यभागी असणाऱ्या खान्दिच्या रेघा असाव्यात; वरच्या विभागात शोभिवंत पट्टी असून ती वसन्तकाप्रमाणे कोरावी. (६५२)

चवथ्या भागाचे दोन भाग करून, मध्यभागी (असलेल्या आडव्या) रेघेच्या आधाराने वेली, पाने इत्यादी असलेली पट्टी असते. (६५३)

किंवा प्रथम चूलि असून वरच्या पाचव्या भागी पीठाची आकृती असते. पाचव्या भागापासून पुढच्या व मागच्या बाजूंना वेलींच्या आकारामध्ये चन्द्रिका असावी. (६५४)

फक्त (खालच्या व वरच्या) बाजूंना रेखलेल्या कमळांची रांग असते. मध्यभागील जागी तीन रेघांसह फेणि असते. (६५५)

तलापाशी असलेल्या खोल भागात तसेच खान्दिच्या मध्यभागी, पाणी दर्शविणाऱ्या (लाटांप्रमाणे) रेघा आखतात. त्यांच्यामध्ये अर्धवर्तुळाकार कमळ खोदतात. (६५६)

(या रचनेच्या) निरनिराळ्या रेघा झाल्या; (आता) वरच्या भागाचे वर्णन ऐक. उरलेल्या भागात शिखरही नसते व भिंतही नसते. (६५७)

पुढच्या तसेच मागच्या बाजूंना मकराच्या आकाराचा सिंह असतो. दोन्ही बाजूंना मध्यभागी उडी मारण्याच्या बेतात आहे (उद्यता) अशा सिंहांच्या मूर्ती असतात.} (६५८)

उग्ररूप सिंहाची मूर्ती उत्कृष्ट प्रासादाचा सर्वात श्रेष्ठ अलंकार असतो. सिंहाशिवाय ते काम (प्रासाद) असेल तर ते निरीह व कनिष्ठ प्रकारचे असते. (६५९)

(काव्य-) रस व (त्यातील) गुण इत्यादी ही कवि वाक्यांच्या प्रभावाने ज्याप्रमाणे प्रकाशात आणतो; वीर, करूण इत्यादी रस जसे वाक्यांमुळे प्रदर्शित होतात, (६६०)

त्याचप्रमाणे वीरभाव, त्यातल्यात्यात विशेषतः रौद्र रस प्रदर्शित करणारे असे अनेक आकाराचे सिंह तसेच सिंहारूढ गण यांची प्रासादावर योजना करतात. (६६१)

सुंदर स्वरूपाचे सिंह भिंतीवर, जांघेवर, चूल (–शिखरा) पर्यंत असतात. सिंह सगळीकडे शोभून दिसतात. सिंह हे नृसिंहाचे स्वरूप असते. (६६२)

**सिंहांचे प्रकार**

सिंहांचे चार श्रेष्ठ प्रकार आहेत. विरता, जाग्रता, उद्यता व गजकान्ता. हे प्रमुख चार श्रेष्ठ सिंह आहेत. (६६३)

**विराजा.**——विराजा वक्राकार असून, नियमाप्रमाणे, पाठीमागे पहातो आहे असा (वळलेला) असतो. पाठीमागच्या पायावर उभा असतो असा विराज प्रकारचा श्रेष्ठ सिंह असतो. (६६४)

**जाग्रता.**——सिंह पाठीमागच्या पायावर उभा असतो. त्याच्यावरचा स्वार भयाकारी, सुंदर वीर वेश धारण केलेला असून (जाग्रता प्रकारचा सिंह) मदोन्मत्त असा दाखवितात. (६६५)

**उद्यता.**——पाठीमागचे दोन पाय पीठावर असून त्याच्या पृष्ठभागावर (धरणीतले) बसलेला असतो. जणू काही जमिनीवर उडी मारणार आहे अशा अविर्भावात असतो. (६६६)

**गजक्रान्ता.**——श्रेष्ठ हत्तीवर बसलेल्या सिंहाचे तीन पाय हत्तीवर असतात व एक पाय त्याच्या छातीवर जणूं काही त्याला संकटांत टाकीत आहे (त्रासित) असा दाखवावा. (६६७)

भव्य उद्यता (प्रकारची सिंह मूर्ती) प्रासादाच्या वरच्या भागी, राहावर व प्राधान्याने वाडभी प्रासादाच्या मस्तकावर निरनिराळ्या स्वरूपांत ठेवतात. (६६८)

(प्रासादाच्या उंचीच्या व रुंदीच्या) मध्यभागी मकरिका सिंह असतो. खालचे (शरीर) मकराच्या आकाराप्रमाणे व वरती सिंहाचे मुख असते. (६६९)

मकरिका (सिंहा–) च्या मुखापासून अरुंद वेली (वेलबुट्टी) दाखवितात. मकरिकाच्या आकाराच्या सिंहाची पुढच्या भागी स्थापना करावी. (६७०)

(त्याचे) नाक लांबलचक व उग्र स्वरूप असून मकराच्याप्रमाणे तोंडाची पोकळी बरीच खोल (गौव्हरा) असते. नाकाच्या खाली असलेला केसांचा पुंजका (केशगुच्छ = मिशी) दुर्दुर फुलांच्या प्रमाणे असावा. (६७१)

हत्तीच्या सुंदर सोंडेप्रमाणे असलेला टिळा कपाळावर असतो. मुखाच्या पोकळीत खाली भयंकर दाढा व जीभ कोरावी. (६७२)

अशाच प्रकारच्या सिंहाचे मस्तक पाठीमागच्या बाजूला, विमानमालिनीच्या (प्रासादाच्या) मध्यभागी, खूपच शोभिवंत दिसण्यासाठी स्थापावे. (६७३)

दोन्ही बाजूंच्या (त्यांच्या लांबीच्या) मध्यभागी उद्यता (प्रकारची) सिंहमूर्ती उत्तम असते. दोन्ही (दक्षिण व उत्तर) दिशांकडे (जणूं काही) उडी मारत आहे (अशा सिंहमूर्ती दाखवाव्यात.) (६७४)



एन ४१३३–१०

**सिंहयंत्र** (छायाचित्र ६८ इ व आकृती १८)

**उद्यता.**——जास्त लांबी असलेल्या आयताकार जागी, लांबीने (उभे) दोन भाग व रुंदीने (आडवे) तीन भाग करावेत. वरच्या उजव्या विभागापासून सुरुवात करून डाव्या कोपऱ्यापर्यंत सर्पाच्या तोंडाप्रमाणे (वळणदार) रेघ आखावी. (६७५)

उजवीकडील (वरच्या आडव्या) रेघेसह दुसऱ्या (खालच्या आडव्या) रेघेला अनुसरून वरच्या बाजूला मस्तक असते व डाव्या कोपऱ्यात गुडघा असतो. (६७६)

आकृती १८

**उद्यता**
२.६७५–६७७

**विरजा**
२.६७९–६८३

पाठीमागच्या बाजूला शेपटी असून आखूड केसाची सुंदर आयाळ असते. भयकारी दात असून उग्रस्वरूप असा भव्य उद्यता प्रकारचा पशूंचा राजा (सिंह) (६७७)

विमानमालिनीच्या मस्तकावर दोन्ही बाजूंना शोभिवंत करणारा असतो. मध्यभागी यूपाच्या आकाराचा उत्कृष्ट कलश करावा. (६७८)

**विरजा.**——लांबीच्या बाजूने आयताकार असलेल्या पाषाणाचे रुंदीने (आडवे) तीन भाग करावे. सर्वात वरच्या (मधल्या) बिंदूपासून सुरुवात करून (खालून) पहिल्या आडव्या रेघेला जोडणारी. (६७९)

वळणदार (कुटिल) रेघ, छातीचा भाग पुढे येईल अशी रेखावी. वरती डोके असून पाय व पोट इत्यादी खाली असतात. (६८०)

आयाळ आखुड (कुरळ्या केसांची) असते, तिच्याखाली तिरप्या (छेद) रेघेवर वर उचललेले पाय असतात. मस्तक, हा प्रमुख भाग, सुंदर असते. (६८१)

पाठीमागच्या बाजूला जो आयताकार भाग त्याच्या एका विभागात (केसांच्या) गोंड्यासह वळणदार शेपटी प्रयत्नाने खोदावी. (६८२)

नखे, आयाळ, दाढा, मिशा इत्यादींनी शोभिवंत दिसणारा, विक्राळ व उग्र (दर्शन) अशी सिंह (मूर्ती) कळसाच्या दोन्ही बाजूना असते. (६८३)

**कळसांचे प्रकार** (छायाचित्र **६८ ई, उ**)

कळस दोन प्रकारचे सांगतात; प्रामुख्याने कुम्भ व यूप. यूपाच्या आकाराचा केलेला कुम्भ शक्तिच्या (देवीच्या) देवालयासाठी उत्कृष्ट असतो. {यूप सगळ्या जागी, (सगळ्या देवालयांवर) व तसेच शक्तिच्या देवालयावर कुम्भ श्रेष्ठ असतो.} (६८४)

[दोन्ही हस्तलिखितांत परस्पर विरुद्ध मत दिले असल्याचे वाटते. चौऱ्यासी येथील वाराहीच्या देवळावर लांबट कुम्भाकृति साधा कळस आहे.]

शंकराच्या देवालयावर तसेच विष्णूच्या देवालयावर भव्य कुम्भ असतो. तेथे खूप शोभिवंत अशा पिण्डिकेवर कुम्भाकृती असते. (६८५)

यूपांचे प्रकार तसेच ते कोणत्या आकाराचे करतात, कुम्भाच्या आकाराच्या कळसाचे प्रकार काय असतात, ते ऐक. (६८६)

**यूप**

याचा खालचा (पिच्छिल) लांबट भाग फक्त लिंगाच्या आकाराचा असतो. वरच्या भागात सुंदर व शोभिवंत मणि-देश (अर्धवर्तुळाकार) असतो. (६८७)

अशा प्रकारचा महान पुण्यकारक, सर्व कामनांची पूर्ती करणारा, सर्व लक्षणांसह असा यूपकुम्भ स्थापावा. (६८८)

मुख्य शिल्पी व ब्राह्मण यांनी विड्वंगन्यास (यूपन्यास) पूर्वक रुद्राध्यायात दिल्याप्रमाणे पूजा व नैवेद्य इत्यादी करावीत. (६८९)

[रुद्राध्याय–शुक्लयजुर्वेदातील रुद्राच्या स्तुतीपर असलेला सोळावा अध्याय. विड्वंग किंवा यूपन्यासाचा मन्त्र आहे–ॐ स्थिरो भव विड्वङ्ग अशुर्भव वज्यर्वन । पृथुर्भव सुषदस्त्वमग्नेः पुरीषवाहनः ।। शुक्लयजुर्वेद २.४४.]

(यूपाचे) मूळ व अग्र धरून वाहून नेत (प्रासादाला) तीन प्रदक्षिणा घालाव्या. अनेक प्रकारची वाद्ये वाजवीत व उत्सवाची गाणी म्हणत (यूपाची) स्थापना करावी. (६९०)

शास्त्रात दिल्याप्रमाणे हा (विधी) काळजीपूर्वक करावा. शिखरावरील खड्ड्यांत यूपकुम्भाची काळजीपूर्वक स्थापना करावी. (६९१)

शिल्पीश्रेष्ठाने गाईच्या मुखाच्या आकाराप्रमाणे असलेल्या शिखरावर (यूप कलश) स्थापावा व मण्डपाच्या शिखराप्रमाणे शिखर असलेल्या (देवालयावर) कुम्भ कलश स्थापावा. (६९२)



एन ४१३३–१०अ

**कुंभ**

कुंभ प्रकारच्या कळसाचे तीन भाग तसेच त्याच्यावरील कोरीव काम ऐक. कळसाचे चार भाग असतात. पाद, कुंभ, वलि व इतर. (६९३)

तांब्याच्या जागेच्या (भाण्डदेश) वरती भांड्याच्या आकाराचे शीर्ष असते. पाद भाग वीथीपीठाप्रमाणे असून कर्णिका (मधला भाग) लहान कुम्भाच्या आकाराची असते. (६९४)

कुम्भाच्या भागावर सुंदर नररुंडांची रांग असलेली वलि असते. तांब्याच्या भागाच्यावर उपडे भांडे ठेवलेले असते. (६९५)

[मुण्डालिका = नररुण्डांची माळ. इंग्रजी भाषांतर मृणालाकृते म्हणजे कमळाच्या केसराप्रमाणे अशा अर्थाचे केले आहे.]

अशा भागांनी कळस आणि इतर निर्माण करावेत. तंत्रात सांगितल्याप्रमाणे मंडपाच्या (शिखराच्या) आकाराच्या शिखराच्या प्रकारावर त्याची स्थापना करावी. (६९६)

**शिखराचा अन्य प्रकार** (छायाचित्रे ४० व ४१)

सौधिकागमात जसा सांगितला आहे तशा निराळ्या प्रकारच्या शिखराचे विभाग आणि रेघा याची माहिती सांगतो, तू ऐक. (६९७)

कंठभागापर्यंत कामामध्ये काही फरक नसतो. {त्याच्यावर शिखराचे (चूडादेश) तीन भाग करतात.} (६९८)

खर्पराचा वरचा भाग दोन्ही बाजूनी आकाशाकडे, चूलिकेच्या आकाराप्रमाणे, काहीसा अरुंद करीत न्यावा. (६९९)

[कंठ देशाच्यावर पहिल्याभागी जसजसे वर जावे तसतशा दोन्ही बाजू कांहींशा अरुंद करीत नेतात.]

त्याचा वरचा भाग दोन सारख्या विभागात विभागावा. तेथे खाली पट्टीवर नेहमी कुंभाच्या आकृती असतात. (७००)

या पट्टीच्यावर कमळाच्या पाकळ्या वगैरेंनी शोभिवलेली सुंदर चूलिका असते. या तीन लांबट भागातील चूलिकेच्यावर एक भाग पीठ असते. (७०१)

पहिल्या चालाच्या (पीढ चाल) वर चारी दिशांना चार सिंह असतात. सिंहांच्या पाठीमागे दुसऱ्या {तिसऱ्या} विभागांत वरती चालमुद्रक (शिखर झाकणारा भाग) असतो. (७०२)

चाल (भागाच्या) नंतर चौरसाकार लहान पीठिका असते. पीठिकेच्या वर शुभ असा कुम्भकलश तेथे शोभत असतो. (७०३)

हत्तीश्रेष्ठावर चढून बसलेले उत्तम सिंह चारी {दोन्ही} बाजूंना असावे. पीठासाठी (देवाच्या देवालयासाठी) केलेल्या या चाल (भागावर) कलश इत्यादींनी अलंकरण करावे. (७०४)

भव्य चालाच्या आकाराच्या ह्या पीठाची ही योग्य क्रमानुसार माहिती सांगितली. वाडभी जातीच्या प्रासादांमध्ये विमानमालिनी (प्रासाद) (सर्व) श्रेष्ठ असतो. (७०५)

**प्रासादाची स्तुती**

ज्याच्या गर्भगृहात (योग्य ते) यंत्र ठेवलेले असते व जो तंत्राला अनुसरून बांधलेला असतो असा भव्य व मनोहर प्रासाद कल्पाच्या शेवटच्या युगापर्यंत अक्षय्य (व) स्थैर्यपूर्ण रहातो. (७०६)

अम्बेचे हजार यज्ञ केले असता किंवा अश्वमेघ यज्ञ करून जे पुण्य मिळते त्याच्या तिप्पट पुण्य देवीकरता देवालय वगैरे बांधल्यास मिळते. (७०७)

सौधिकागमात सांगितल्याप्रमाणे जर मजबूत स्वरूपाचे देवालय बांधले तर या जन्मी तसेच मागच्या (अनेक) जन्मांत केलेल्या पापापासून (देवालय बांधणाऱ्याची) तत्क्षणी मुक्तता होते. (७०८)

त्याचक्षणी या जन्मी तसेच मागच्या (अनेक) जन्मात केलेल्या पापापासून त्याची सुटका होते व त्याला जन्म देणारी त्याची आई देखिल अक्षय्यपणे पवित्र होते. (७०९)

हजार कोटी जन्मांमध्ये केलेले पाप नाहीसे होते. तो (प्रासाद) अक्षय्य कीर्ति व पुण्य देणारा तसेच सर्व सिद्धींची पूर्ती करणारा होतो. (७१०)

भव्य प्रासादाची स्थापना करणे हे नेहमीच उत्कृष्ट व उत्तम पुण्य देणारे असते. प्रासाद बांधून झाल्यावर उरलेले काळात (म्हणजे अक्षय्य) विधिपूर्वक पूजा इत्यादी करावयास हवे. (७११)

[देवाची पूजा सतत अनंत काळपर्यंत चालू रहाण्यासाठी योग्य त्या धनाची व्यवस्था करावयास हवी.]

गर्भागारांतील मूर्तीची, (दरवाज्यावर असलेल्या) लक्ष्मीबंधाची इत्यादींची पूजा करावी. तसेच पूर्वेकडील तोरणाची व नाटमन्दिरांत (मुखशालेत) पूजा करावी. (७१२)

**तोरणाची कामे**

वाघ (किंवा सिंह) यांचे मुख असलेल्या भैरवीची व इतरांच्या मूर्ती प्रासादाच्या खालच्या बाजूला असलेल्या चांगल्या जागी (म्हणजे दरवाजाच्या उभ्या चौकटीवर खालच्या बाजूला) कोराव्यात. (७१३)

गेलवनारीबन्ध, जलपत्र इत्यादींची नक्षी ही दाराच्या चौकटीवर असते. ही चौकट (वरच्या बाजूस) गजलक्ष्मीने अलंकारिलेली असते. (७१४)

खालच्या बाजूला नन्दावर्त असून तेथे मजबूत तीन पायऱ्या असतात. दरवाजा अशा क्रमाने केला म्हणजे तो उत्तम काम केलेला शोभिवंत असा होतो. (७१५)

बुद्धीमान शिल्पीने, अनेक आकृत्या, वेलींची नक्षी तसेच ध्यानांत इत्यादी दिल्याप्रमाणे (कोरलेल्या) मूर्तींनी प्रासाद भूषवावा. (७१६)

कोनाड्यांच्या जागी, पुढच्या बाजूला, भिंतीच्या अंगोपांगांवर, शिखरावर, गर्भागारावर अनेक मूर्तींचे प्रकार व वेली इत्यादी तसेच कमळे इत्यादींची नक्षी कोरावी. (७१७)

**प्रतिमेचे माप**

**गर्भागारातील मूर्ती.**––आता गर्भागारांतील मूर्तीची सर्व प्रकारची माहिती (तसेच) देवालयाच्या उंचीच्या प्रमाणात मूर्तीची उंचीही ऐक. (७१८)

गर्भगृहाची उंची जर एक हात असेल तर मूर्तीची उंची अकरा अंगुले असावी. गर्भगृहाच्या चार हातापर्यंत (उंचीच्या प्रत्येक एक हात वाढीस) मूर्तीची उंची दहा अंगुलांनी वाढते. (७१९)

[गर्भगृहाची उंची = गर्भगृहाच्या जमिनीपासून ते वरच्या वितानापर्यंतचे अंतर.

| गर्भगृहाची उंची (हात) | १ | २ | ३ | ४ |
|---|---|---|---|---|
| (अंगुले) | २४ | ४८ | ७२ | ९६ |
| मूर्तीची उंची (अंगुले) | ११ | २१ | ३१ | ४१ ] |

पाच हातांपासून दहा हातांपर्यंत उंचीच्या गर्भगृहातील मूर्तीची उंची प्रत्येक हात वाढीस दोन अंगुलांनी वाढवावी व तेथून गर्भागाराची उंची ५० हातांपर्यंत वाढविल्यास मूर्तीची उंची एका अंगुलाने वाढवावी. (७२०)

| [गर्भगृहाची उंची (हात) | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | २० | ३० | ४० | ५० |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मूर्तीची उंची (अंगुले) | ४३ | ४५ | ४७ | ४९ | ५१ | ५३ | ६३ | ७३ | ८३ | ९३ ] |

**कोनाड्यातील मूर्ती.**––कोनाड्याच्या उंचीचे सात भाग करावेत. शेवटला भाग टाकून देऊन, सहा भाग उंचीची मूर्ती हे कोनाड्यातील मूर्तीचे माप आहे. (७२१)

**नक्षींचे खोदकाम**

शिल्पशास्त्रांतील मूर्तींच्या अध्यायात जसे वर्णन केलेले असते त्याप्रमाणे नेहमीच शोभिवंत मूर्तींची रांग स्थापन करावी. (७२२)

शिल्पशास्त्रात जसे वर्णन केले आहे त्याप्रमाणे अनेक आकाराच्या नक्षी, प्राणी, पक्षी, वेली यांची नक्षी, वेलबुट्टी, लहान कुंभांची रांग, (७२३)

वळी, पाण्याचे थेंब इत्यादी, कुंभ, फेणि, खर्पर (कवटी) इत्यादी करावीत. {वर्तुळाकृति जागेत} त्या जागेप्रमाणे (प्रमाणात) उत्कृष्ट वज्रमस्तक कोरावे. (७२४)

खूप काळजीपूर्वक रेघा इत्यादींच्या साहाय्याने अनेक मनोज्ञ, रमणीय बंध कोरावेत. त्यांच्यात वानरबन्ध उत्कृष्ट समजतात. (७२५)

पीठावरती सिंहबन्ध तसेच उत्कृष्ट कुंजरबन्ध (हत्तींची नक्षी) करावी. हरीणांचे कळप इत्यादींसह रामगायत्रीचे खोदकाम करावे. (७२६)

[रामगायत्री = स्त्रिचा चेहरा असलेली गाय]

फुले व कळ्या यांच्यासह शोभिवंत आकृतीत (नक्षीत) फुलांची रांग (फुलांचे हार) इत्यादींनी भिंतीवरील बन्धना सर्वोत्कृष्ट अशी करावी. (७२७)

**देवालय बांधल्याने मिळणारे पुण्य**

सर्व लक्षणांसह बांधलेला शिखरमालिनी (विमानमालिनी) प्रासाद हा भव्य व श्रेष्ठ असून शिल्पीजनांना आनंद देणारा असतो. (७२८)

विश्वकर्म मताप्रमाणे अंगोपांगांचे काम केलेला प्रासाद (बांधला तर परजन्मी) नक्कीच मोक्षाचा व या इहलोकांत नेहमीच शान्ति, धन, धान्य तसेच पुत्र यांचा लाभ होतो. (७२९)

शिल्पशास्त्रात ज्याने सिद्धी मिळविली आहे त्याला पुनर्जन्म नसतो. शिल्प विद्या ही नेहमी (सर्व विद्यांमध्ये) श्रेष्ठ असून नेहमी आनंद देणारी असते. (७३०)

प्रासाद बांधण्याच्या कामी कौशल्य मिळविल्यास अक्षय्य पुण्य मिळते, ज्याच्या ताब्यात शंभर राज्ये (मांडलिक) आहेत तसेच ज्याच्याकडे शंभर गावे आहेत; शंभर भार सुवर्णाने जो भूषविलेला आहे, शंभर सोनपुतळ्या अशा स्त्रिया ज्याला आहेत व शंभर हातांचे बळ ज्याच्यांत आहे अशा राजश्रेष्ठाने जर प्रासाद बांधला नाही तर हे सर्व कायमचे विनाश पावते. सर्व धन, धान्ये, पुत्र ही जसा काळ जातो तसे क्षय पावतात मात्र प्रासाद हा कालसापेक्ष शाश्वत असतो. (७३१-७३३ १/२)

राजसूय (यज्ञाचे) जे फळ, सोमयागाचे जे फळ तेव्हढेच फळ संपूर्णपणे शक्तीचे (देवीचे) भवन बांधल्याने मिळते. शिल्पशास्त्राला अनुसरून बांधलेला प्रासाद सर्व प्रकारच्या मनोकामनांची पूर्ती करणारा असतो.[१] (७३४, ७३५)

[१] टिप्पणी पहा.

सौधिकागमात, देवालयाच्या प्रकारानुसार, नक्षी, विभाग इत्यादींची कामे (यांची माहिती) यथायोग्य अनुक्रमाने प्रासादावरील (प्रकरणांमध्ये) सांगितले आहेत. (७३६)

शुद्ध मनाने जो राजा प्रासाद स्वरूप बांधतो, तसेच जो राजा शुभ लग्न इत्यादी असताना शक्तीचे (देवीचे) मंदिर बांधून पुरे करतो तो निर्विघ्नपणे शिवलोकास जातो. ज्या गर्भागारात परमेश्वरी (देवी) { विराजमान } झालेली असते तेथील पीठाची (माहिती) तू ऐक. (७३७, ७३८)

**(मूर्ती)पीठाची लक्षणे** (छायाचित्र **७१ उ**)

मूर्तीच्या स्थापनेसाठी असलेल्या आसन इत्यादींची लक्षणे, मणिपीठाचा आकार जसा गर्भगृहाप्रमाणे असतो इत्यादी माहिती सांगतो. (७३९)

गर्भगृहाच्या रुंदीचे बाजूंनी सारखे दोन अर्धे भाग करून, लांबीने तीन भाग पाडावेत. (७४०)

दाराच्या (रुंदीच्या) मध्यभागी मध्यबिन्दूची कल्पना करावी. या कल्पिलेल्या (मध्य–) बिन्दू पासून आसनाकडे त्रिकोण रेखावा. (७४१)

मध्यभागी असलेली जी भुजा तिचे जे तीन सम भाग झाले आहेत त्यातील मधला भाग व (इतर) भुजा मिळून समभुज त्रिकोणाच्या (अ ब क) तीन भुजा मिळतात. (७४२)

त्रिकोणाच्या वरती जी आयताकार जागा त्या जागेचे तीन सारखे भाग करावेत. (७४३)

वरचा {मागचा} भाग सोडून देऊन (उरलेल्या) दोन भागांनी (प भ क ब) उत्कृष्ट आसन होते. या जागेला अनुसरून रत्नगर्भाची स्थापना करतात. (७४४)

**रत्नगर्भ**

जी इष्ट मूर्ती स्थापन करावयाची तिच्याप्रमाणे महान यंत्राची स्थापना करावी व यंत्राला अनुसरून जे बिंदू असतील त्या सर्व ठिकाणी खोलवा ठेवावा. (७४५)

त्या खोलव्यांमध्ये अनेक रत्ने इत्यादी पुरावीत. त्या रत्नांच्या खड्यांची स्थापना करताना ब्राह्मणश्रेष्ठाने त्यांची पूजा करावी. (७४६)

लहान हिरा, पारा (पारद), मनःशीळ, गन्धक, वैदूर्य, मोती, उत्तम प्रवाळ तसेच हिंगुळ, (७४७)

गोमेद इत्यादींसह व हरतालाच्यासह ही रत्ने पीठाची स्थापना करावयाच्या मंत्रांनी त्या खोलगट भागात पुरावीत. (७४८)

त्यानंतर उत्कृष्ट पाषाणांनी ते आसन बांधावयाचे काम, देवाचा अनुग्रह व्हावा अशी इच्छा करणाऱ्या शिल्पीने, करावे. (७४९)

**आसनांचे प्रकार** (छायाचित्र ७१ ऊ)

आसनांचे अनेक प्रकार आहेत. कणिपीठ व पद्मपीठाप्रमाणे इष्ट देवतेच्या प्रमाणात त्याचे उत्कृष्ट भाग करावेत. (७५०)

आसनाकरिता जी जागा आहे तिचे रुंदीने दोन अर्धे भाग करावेत. ती उत्कृष्ट आसनाची उंची असून तिला वेधभाग म्हणतात. (७५१)

**कणिपीठ**

आसनाचा जो वेध (उंची) तिला चार भागांत विभागावे. पहिल्या (सगळ्यात खालच्या) भागी पट्टी असते व वरचा भाग ही त्याचप्रमाणे (पट्टी असलेला) असतो. (७५२)

चारी भागाचे उंचीने (उभे) पाच भाग पाडावेत व त्यांच्या अनुसार उंचीत (उभ्या) सुंदर खाचा पाडाव्यात. (७५३)

मध्यभागी असलेले (आडवे) दोन भाग तिरपे असतात. (मधल्या दोन भागानी डमरु-भाग करावा.) त्यांच्या मध्यभागी निरुंद अशी पट्टी असते. तिला मेखला म्हणतात. (७५४)

आतमध्ये गेलेल्या तिरप्या भागाला आसनगर्भ म्हणतात. अशारीतीने केलेल्या (या पीठाला) कणिपीठ म्हणतात, दुसऱ्या मताने रेखपीठ म्हणतात. (७५५)

**पद्मपीठ**

दुसरा प्रकार जे महान पद्मपीठ ते ऐक. त्याच्या वेधाच्या उंचीचे आडवे तीन भाग करतात. (७५६)

पूर्वीप्रमाणेच लांबीने, उभे, पाच भाग करतात. मधल्या (उभ्या) दोन भागात विराजबन्ध असावा. (७५७)

[विराज प्रकारच्या सिंहांची नक्षी असावी.]

खालचा (आडवा) भाग दोन सारख्या भागात विभागावा, खालच्या बाजूला एक पट्टी, मग एक निरुंद पट्टी व वरच्या विभागांत कमळ असावे. (७५८)

सर्वात वरचा भाग याच अनुक्रमाने सुंदर पद्मपीठाप्रमाणे करतात. (उभ्या भागांच्या) मधल्या दोन भागांच्या मध्यभागी सुंदर सिंह इत्यादींची स्थापना करावी. (७५९)

उभ्या भागांच्या कोपऱ्यापाशी उत्कृष्ट विराज सिंह अतिशय कौशल्याने कोरावेत; यास उत्कृष्ठ पीठ म्हणतात. (७६०)

वरच्या जागेचे रुंदीने (आडवे) दोन भाग करतात. खालच्या भागाला निम्नपिण्डिका व वरच्या भागाला ऊर्ध्व-पिण्डी म्हणतात. (७६१)

गर्भगृहाच्या जमिनीवर पाषाण बसविल्यावर त्यांच्यावर हे महान आसन बांधावे. आसनावर, शुभ मुहूर्तावर, इष्टमूर्तीची स्थापना करावी. (७६२)

**मूर्तीचे प्रकार** (आकृती १९)

मूर्तींचे प्रकार ऐक. प्राधान्याने त्यांचे तीन प्रकार असतात. उत्तमा, मध्यमा व कनिष्ठा असे मूर्तींचे प्रकार असतात. (७६३)

**उत्तमा.**---गर्भगृहाच्या दाराची जी उंची तिचे आठ भाग पाडले असता, वरचा भाग वगळून खालच्या सात भागांच्या (जागेचे) तीन भाग करतात. (७६४)

{व त्यांचे प्रत्येकी तीन भाग करतात}

सर्वात वरच्या भागाच्या तीन विभागांपैकी दोन भाग वगळावेत आणि उरलेल्या विभागांची केलेली मूर्ती उत्तमा प्रकारची असते. (७६५)

**मध्यमा.**---दाराचे (उंचीचे) नऊ भाग करावेत व त्यातील (सर्वात वरचा) एक भाग वगळावा. उरलेल्या आठ भागांचे (जागेचे) पूर्वीप्रमाणेच तीन भाग (व प्रत्येकी तीन उप-विभाग) करतात. (त्या नऊ विभागांपैकी चार (वरचे) विभाग वगळून उरलेल्या विभागांनी मूर्ती करावी.) (७६६)

[दुसऱ्या हस्तलिखिताचा श्लोक ७६७, पहिला चरण दिला आहे ' परित्यक्त युगांशं च वंचिते मध्यमा तनुः । ' वरती याचे भाषांतर कंसांत दिले आहे.]

**अधमा.**---मध्यमा मूर्तीकरिता केलेल्या तीन भागांपैकी (फक्त खालच्या) एक भागाने अधमा मूर्ती होते. (७६७)

[श्लोक ७६७ ची पहिली ओळ व दुसऱ्या हस्तलिखितातील या श्लोकाची दुसरी ओळ मिळून हा गोळाबेरीज अर्थ दिला आहे.]

अशी लहान मूर्ती प्रासादात, मंडपात किंवा गर्भगृहातील मध्यभागी किंवा आसनावर स्थापू नये. (७६८)

देवघराच्या प्रमाणाने पाच हातांपर्यंत उंचीची मूर्ती करावी, ती चांगली मूर्ती समजतात. बारा अंगुलांची (उंचीची) मूर्ती कनिष्ठ असते. (७६९)

पाषाणाची मूर्ती आठ हातांपर्यंत करतात, त्याहून जास्त उंचीची (मूर्ती) कधीही करू नये. मूर्ती नेहमी गुळगुळीत केलेली व अनेक अलंकारांनी भूषविलेली असावी. (७७०)

मूर्तीची नजर खाली नैवेद्याकडे वळलेली (भोगदृष्टी) व शांत भावाची असावी. पिच्छिल (पाठीमागचा भाग) व अंगोपांगे गुळगुळीत व ऐटदार असावीत. जसे ध्यान असेल तशी स्मित करणारी किंवा भयकारी अशी मूर्ती असावी. (७७१)

आकृती १९—मूर्तींचे प्रकार
२.७६३—७६९

मुख जर यथायोग्य केले नाही तर वाईट फळ मिळते. (हातातील) आयुधे, (डोक्यावरील) मुकुट व कपाळावरील टिळा ही नियमाप्रमाणे असावीत. (७७२)

शक्तीची मूर्ती योगनेत्रासह (कपाळावरील तिसऱ्या डोळ्यासह) करावी. सुंदर शंखनिधी इत्यादी धारण केलेल्या हातांचे पंजे योग्य त्या मुद्रेत असावेत. (७७३)

सर्व अंगोपांगे सुंदर असलेली मूर्ती तयार केल्याने मोक्ष निश्चितच मिळतो. जर फटी, वज्र इत्यादी दोष शिळेत असतील तर ती मूर्ती अधु (विकलीकृत) असते. (७७४)

मूर्ती कधीही ध्यानाशिवाय करू नये; तसे केल्यास तो शिल्पी नरकात जातो. या मुद्यानुसार मुर्तीचे ताल, माप इत्यादींची माहिती ऐक. (७७५)

**शक्तीच्या मूर्ती**

शिष्याच्या समजुतीसाठी फक्त शक्तीच्या मूर्तींची माहिती मी सांगतो. देवीची मूर्ती प्राधान्याने आठ ताल (उंचीची) असते. (७७६)

[एक ताल = १२ अंगुले]

दुर्गा, कात्यायनी, काली, पार्वती व सरस्वती, महाकाली तसेच रौद्री, वाराही (व) मुण्डमालिनी. (७७७)

या सर्व माता आठ ताल मापाच्या असतात. आठ ताल मूर्तीच्या अवयवांचे अंगुले व मात्रांमध्ये मापे अनुक्रमाने देतो. (७७८)

शरीराच्या प्रकाराने आठ भागात शरीर कसे विभागावे (ते) तू ऐक. पायापासून (डोक्यावरील) केसापर्यंत तीन (प्रमुख) भाग करतात. (७७९)

[पायांपासून कंबरेपर्यंत, कंबरेपासून खांद्यांपर्यंत व खांद्यांपासून केसांपर्यंत असे तीन असमान भाग.]

शक्तीचे मनोहर पाय पाच अंगुलांच्या मापाचे (उंचीचे) असतात. तीन भागाची घोट्यापासून गुडघ्यापर्यंत पायाची नळी २१ अंगुले असते. गुडघा तीन अंगुलांचा व शक्तीमान मांड्या (कंबरेपर्यंत) २१ अंगुले (लांबीच्या) असतात. (७८०, ७८१)

मध्यभागी योनीसह ओटीपोट नऊ अंगुलांचे, पोट बारा अंगुलांचे व वक्षभाग नऊ अंगुलांचा असतो. (७८२)

मान साडेतीन अंगुले व मस्तक १२ अंगुले असते. या अनुक्रमाने आठ ताल उंचीची देवीची मूर्ती घडवावी. (७८३)

**मूर्तीच्या स्थापनेनंतरची कामे**

मूर्तीच्या स्थापनेचे काम झाल्यानंतर बुद्धीमान शिल्पीश्रेष्ठाने सरोवराच्या पाण्याने भक्तिपूर्वक स्नान इत्यादी करावे. (७८४)

काळी मिरी, कापूर, दूध व गूळ यांचे पेय असलेले मडके डोक्यावर घेऊन त्याने (शिल्पीने) गर्भगृहात प्रवेश करावा. (७८५)

(गर्भागाराच्या) मध्यभागी ते मडके फेकून फोडावे. त्यातील निर्मळ द्रव पदार्थाने त्या दैवी मूर्तीवर प्रोक्षण करावे. (७८६)

हविष्य अन्न भक्षण करून विधीप्रमाणे तत्वपूजा[१] करावी. त्यानंतर विधिपूर्वक प्रासाद-भवनाची पूजा करावी. (७८७)

**शिल्पशास्त्राची स्तुती**

विश्वकर्माच्या मतानुसार असलेले शिल्पशास्त्र महान पुण्यकारक आहे. या ग्रंथांत शुक्र इत्यादी तसेच जैमिनीमत[१] मी सांगू शकलो नाही. (७८८)

[शुक्र हा दैत्यगुरु व जैमिनी हा पूर्वमीमांसाकार, याचा कदाचित शिल्पशास्त्रावर ग्रंथ असावा. ]

खर्पराकृती वाडभी प्रासाद व विमानमालिनी या फक्त (दोन) प्रकारांचे ज्ञान कुठल्याही संदेहाशिवाय मी सांगणार आहे (सांगितले आहे.) (७८९)

(प्रासादांमध्ये) विमानमालिनी प्रकाराची शिल्पशास्त्राला अनुसरून मापे, माझ्या अल्प ज्ञानानुसार, फक्त प्रासादाचा भाग, त्याच्या भिंतीचा भाग व तिची उंची तसेच अनुक्रमाने येणारे बन्धना इत्यादी (अवयव) शिखराचे विभाग व प्रकार व इतर प्रासादांची लक्षणे (सांगितली.) (७९०, ७९१)

शक्तीचा प्रासाद प्रामुख्याने यंत्र इत्यादींसह करावा. यंत्रांचे प्रकार व मंत्र इत्यादी नेहमीच गुप्त असावेत. (७९२)

[मंत्र याचा अर्थ प्रासादाचे निरनिराळे विभाग व त्यांची मापे असा अर्थ इंग्रजी भाषांतरकारांनी केला आहे.]

शिष्याला शिकविण्यासाठी केवळ मी आता ही माहिती सांगितली, कारण प्रासादाच्या विभाग इत्यादींच्या (यथायोग्य) ज्ञानाशिवाय बांधलेला प्रासाद लक्षणानुसार असणार नाही. (७९३)

---

[१] टिप्पणी पहा.

आंधळ्या माणसाच्या काळोख्या रात्रीत (दिशाहीन) भटकण्याप्रमाणे शास्त्राला अनुसरून नसलेली (प्रासादाच्या) विभागांची माहिती व्यर्थ असते. (७९४)

प्रासादांत वाडभी (प्रासाद) उत्कृष्ट असून मुखशाला (व) विमानिका या दोन प्रकाराची माहिती दोन भागांत, ज्यांना प्रकाश म्हणतात दिली आहे. (७९५)

शिल्पप्रकाश नावाचा हा ग्रन्थ केवळ शिष्याला शिकविण्यासाठी (लिहिला) आहे. इतक्या संक्षिप्त (पद्धतीने लिहिलेल्या या ग्रंथांत प्रासादाचे) ज्ञान व त्यांच्या प्रकारांची माहिती (फक्त) काहीशीच देता येणार. (७९६)

[ग्रंथातली माहिती संक्षिप्त असल्याने प्रत्यक्ष प्रासाद बांधावयास कदाचित त्याचा उपयोग नाही मात्र शिष्याला प्रासादाची केवळ माहिती शिकविण्यासाठी हा ग्रंथ उपयोगी पडेल.]

प्रासादाची लक्षणे इत्यादी (सर्व) सौधिकागमाप्रमाणे दिली आहेत. देवीच्या अनेक प्रकारच्या प्रासादांमध्ये विमानमालिनी (प्रासाद) सर्वोत्कृष्ट आहे. (७९७)

**ग्रंथकाराचा परिचय**

त्या शक्तीचे, जी स्वतः भट्टारिका आहे, तिचे मी पादवन्दन करतो. तसेच ऐरत मण्डलाचा अधिपती, राजा, भट्टारक, (७९८)

अत्यंत तेजस्वी अशा वीरवर्म्याचे माझ्या रक्षणासाठी, (माझ्या भरणपोषणासाठी), पुनः पुन्हा त्यालाही (नमस्कार करतो). पुरुषोत्तम (जगन्नाथ) ज्याचा रक्षणकर्ता आहे त्याच्या पायांना माझा परत एकदा नमस्कार असो. (७९९)

अनेक शिल्पांमध्ये प्रवीण अशा सद्गुरु माधव भट्ट यांच्या आज्ञेने व प्रेरणेने केवळ शिष्याला शिकविण्यासाठी म्हणून (हा ग्रंथ लिहिला आहे.) (८००)

अनेक शास्त्रांच्या मतांप्रमाणे शिवाय देशांप्रमाणे (प्रासादांचे) प्रकार होतात. देशांप्रमाणे व त्या न्यायाने नाना आकारांचे शिखर असतात. (८०१)

लौकिक कामाच्या पद्धतीप्रमाणे त्यांचे निरनिराळे प्रकार होतात. त्यांच्याप्रमाणे तसेच कौलाचाराच्या मतांना अनुसरून, (८०२)

जरी (याबाबत) माझे ज्ञान अल्प असले तरी प्रत्यक्षानुभवाच्या जोरावर व गुरुने जे ज्ञान दिले त्या माहितीला अनुसरून, (८०३)

अनेक शास्त्रांना अनुसरून, आगमग्रंथांचा मागोवा घेऊन, विभाग वगैरेंची माहिती देणारा व शिष्याच्या माहितीकरिता, हा ग्रंथ प्रसिद्ध केला. (८०४)

विश्वकर्म मताप्रमाणे असलेले शिल्पशास्त्र सर्व शास्त्रांत श्रेष्ठ आहे. प्रासाद हा श्रेष्ठत्त्व, मोक्ष व सर्व सिद्धीदाता असतो. (८०५)

सर्व भागांसह, सर्व विभागांच्या कामांची माहिती देणारा शिल्पप्रकाश नावाचा हा शिल्पशास्त्रावरील ग्रंथ सांगितला. (८०६)

**लेखनिकाची ओळख** (हस्तलिखित २ लिहिणाऱ्या)

उत्कृष्ट अशा मञ्जूषा गावच्या ब्राह्मणश्रेष्ठाच्या कुलात जन्मलेला, महेन्द्र पर्वतांनी वेढलेल्या व भूलोकीच्या देवांची (ब्राह्मणांची) संपूर्ण वस्ती असलेल्या श्रीनिवासपुरात रहाणारा कौशिक गोत्री, सर्व नीतीशास्त्रांत प्रवीण असा गोविंददास नाव असलेला मी महाशक्ति दुर्गेच्या पदकमलांना नमस्कार करतो. श्रीनिवास राजाकरीता हे पुस्तक लिहिले आहे. (८०७–८०९)

शके बाण (५), इन्दु (१), सिंधु (७), नक्षत्रनायक (१) मध्ये जसा शास्त्रांत दिला आहे तसा हा ग्रन्थ मी लिहिला आहे. (८१०)

[अंकानां वामतो गतिः या नियमानुसार शके १७१५ म्हणजे इ.स. १७९३ मध्ये हा ग्रंथ लिहिला.]

श्री कौलाचार परायण, भट्टारक, उद्गाता, रामचन्द्र महापात्र या शिल्पीश्रेष्ठाने रचलेल्या शिल्पप्रकाश (ग्रंथाचा) दुसरा प्रकाश संपला.

हा ग्रंथदेखील समाप्त झाला.

□ □

# टिप्पणी

१.२३

पिशाच, गुह्यक, किन्नर, गंधर्व, यक्ष व सिद्ध हे शंकराचे गण आहेत. (महानिर्वाण तंत्र). मात्र येथे त्यांच्या आकृत्या निरनिराळ्या दिक्पालांशी संबंधित असाव्यात.

१.४४

विष्णु किंवा शंकर यांचे लहान मंदिर बांधतांना गर्भगृहाच्या जमिनीवर यंत्र आखले नाही तरी चालते. मात्र देवीचे देऊळ, मग ते कितीही लहान असो तेथे यंत्राची आखणी आवश्यक असते. त्यामुळे देवीच्या प्रासादाला ' यंत्र-वास्तु ' म्हणतात. देवीच्या मूर्तीसाठी जे आसन-पीठ असते तेथे देखील यंत्र असणे आवश्यक असते.

**शंकूची स्थापना, १.४९.**

अपर्ति महापात्राच्या मताने देवालयाच्या जमिनीच्या केंद्रस्थानी शंकूची स्थापना करून, जमिनीच्या लांबीच्या १/४ लांबीच्या त्रिज्येने वर्तुळ आखतात. तेव्हा हे वर्तुळ देवालयाच्या जमिनीची परिमिती दर्शवीत नाही. परंतु सूर्याच्या उन्हाने केंद्रस्थानी असलेल्या शंकूच्या टोकाची छाया जेथे वर्तुळावर पडते त्यावरून फक्त पूर्व-पश्चिम दिशा ठरविण्यास या वर्तुळाचा उपयोग होतो.

**नरसिंहाची पूजा, १.५०**

पुरोहितसर्वस्व (३.४९) वरून या पूजेच्या वेळी म्हणावयाच्या मन्त्राचा अर्थ असा : ओं, मी भगवान नृसिंहाची स्तुती करतो. कोटी कोटी सूर्यांइतकी त्याची प्रभा आहे, त्याची नखे वज्रासमान असून त्याची फिस्कारलेली दाढी जगाची पसरत जाणारी शक्ति आहे. त्याची गर्जना प्रलयकालाच्या समुद्रगर्जनेप्रमाणे आहे. आमच्या संरक्षणासाठी सर्व मन्त्रांची देवता असलेल्या आणि सर्व विघ्नांचा नाश करणाऱ्या तुझी मी प्रार्थना करतो. मूर्तीच्या समोर हा मन्त्र म्हणून दिग्बली दिला जातो व सर्व दिशांकडून संरक्षण करण्याबद्दल त्याची प्रार्थना करतात.

यास पाताल-नरसिंह मन्त्र म्हणतात. पाताल-नरसिंह ही शिल्पींची इष्ट देवता आहे. ती योगासनात बसलेली असून तिच्या डोक्यावर अनंत नागाची फणा पसरलेली दाखवतात.

**नागवन्ध, १.५५**

नागराजाने पृथ्वी डोक्यावर तोलून धरली आहे अशी कल्पना आहे. तो स्वतःभोवती एका वर्षात एक प्रदक्षिणा पूर्ण करतो. दर तीन महिन्यात एका दिशेकडे त्याचे तोंड असते अशा रीतीने वर्षभरांत चारी मुख्य दिशांना त्याचे तोंड असते. त्याच्या शरीराची ठेवण निरनिराळ्या महिन्यांत खाली दिल्याप्रमाणे असते.

| महिने | दिशा | | | |
|---|---|---|---|---|
| | डोके | पोट | पाठ | शेपूट |
| भाद्रपद, आश्विन व कार्तिक | पूर्व | उत्तर | दक्षिण | पश्चिम |
| मार्गशीर्ष, पौष व माघ | दक्षिण | पूर्व | पश्चिम | उत्तर |
| फाल्गुन, चैत्र व मेष(वैशाख) | पश्चिम | दक्षिण | उत्तर | पूर्व |
| ज्येष्ठ, आषाढ व श्रावण | उत्तर | पश्चिम | पूर्व | दक्षिण |

या बाबतीत ' Cannons of Orissan Architecture ' या पुस्तकात भुवनप्रदीपातील उल्लेखावरून निर्मलकुमार बोस यांनी दिलेली माहिती अशी :



एन ४१३३-११

भाद्रपद, आश्विन व कार्तिक महिन्यांत नागाचे डोके पूर्व दिशेकडे असते. या तिमाहीच्या पहिल्या दिवशी नागाचे डोके बरोबर ईशान्य दिशेकडे असते व शेवटच्या दिवशी ते आग्नेय दिशेकडे असते. अशा रीतीने नागाचे डोके एका दिवसाला एक अंश असे प्रदक्षिण क्रमाने फिरते.

वर उल्लेखिलेल्या परिच्छेदांत असे म्हटले आहे कीं नाग आपल्या शरीराने मध्यबिंदूपाशी २७० अंशांत फिरलेला असतो व ९० अंशांचा भाग सोडून दिलेला असतो.

शिल्पसारणींत या नागाला गृह-नाग म्हटले आहे, कारण देवालयाच्या दरवाजाची दिशा त्याच्या (मुखाच्या) स्थानावरून निश्चित केली जाते. देवालय त्याच्या छातीपाशी असून देवालयाची लांबी त्याच्या शेपटीच्या दिशेकडे असते. त्याचे डोके ज्या दिशेला असेल त्या दिशेला दरवाजा ठेवतात.

या सापास काल-सर्प देखील म्हणतात. त्यास ३६० हाडे (दिवस व रात्री), ६ अवयव (ऋतू), १२ वळसे (महिने) असतात. त्याच्या शरीराचा वरचा गडद रंगाचा भाग रात्र व खालचा फिक्या रंगाचा भाग दिवस दर्शवितात. अशा रीतीने एक वर्षाचा कालावधी या नागाने दर्शविला जातो.

**पीठ, १.७९**

दक्षाच्या यज्ञांत शंकराला आमंत्रण न दिल्याने पित्याने शंकराचा अपमान केला असे समजून शिवपत्नी सतीने स्वतःला जाळून घेतले. तेव्हा सतीचे प्रेत खांद्यावर घेऊन शंकर जगभर (भारतभर) फिरला. तो असा फिरत असताना विष्णूने आपल्या चक्राच्या सहाय्याने पार्वतीच्या शरीराचे तुकडे केले, ते निरनिराळ्या ५१ जागी पडले. त्या जागांना शक्तिपीठ समजतात. हीच कल्पना पुढे ओढून देवीच्या प्रत्येक देवालयाला शक्तिपीठ समजतात.

**योगिनी, १.१०६ (सौधिकागमाप्रमाणे)**

दिवस व रात्र मिळून ३० मुहूर्त होतात. दिवसाची देवता रौद्र दिवौकस व रात्रीची देवता कालरात्री आहे. प्रत्येक मुहूर्तावर दोन योगिनींचे अधिराज्य असते. तेव्हा दिवस रात्र मिळून साठ योगिनी होतात. परंतु सकाळ व संध्याकाळ यांच्या संधिकालातील मुहूर्तांवर प्रत्येकी चार योगिनींचे वर्चस्व असते. योगिनींची एकूण संख्या अशी ६४ आहे.

योगिनींबद्दल वर दिलेल्या खुलाशांवरून कालचक्रावर प्रकाशित दिवस व अंधारी रात्र यावर योगिनींचे वर्चस्व असते असे दिसते.

कौलाचारात दुय्यम व मदतनीस देवता म्हणून या योगिनींची पूजा करतात.

**तोरण छन्द, १.११६, १९४**

दरवाजाची संपूर्ण चौकट म्हणजे ' छन्द ' असे कांहींचे मत आहे. शिल्पसारणीत मात्र दरवाजाच्या चौकटीला ' बंध ' म्हटले आहे. कांहींच्या मताने रतिकेराची नक्षी असलेल्या भागास छन्द म्हणतात. स्कन्द पुराणांतील उत्कल खण्डांत ' दोन भागांचा छंद ' असा उल्लेख आहे. ज्याचा अर्थ नक्षीकाम केलेल्या दोन पट्ट्या असा असू शकेल. तेथे ' सप्तछंदा ' चाही उल्लेख आहे, ज्याचा अर्थ असावा सात पट्ट्या. प्रासाद मंडन या राजस्थानी वास्तुशास्त्राच्या ग्रंथांत दरवाजाचे तीन, पाच, सात व नऊ शाखांचा (त्रिशाख, पंचशाख, सप्तशाख व नवशाख) म्हणजे त्या त्या संख्यांच्या पट्ट्यांचा उल्लेख आहे. येथील शाखा व ओरिसा शैलीतील ग्रंथांतील छंद हे एकाच अर्थाचे शब्द आहेत.

**१.३३३**

शिल्पसारणीप्रमाणे वास्तूंचे दोन प्रमुख वर्ग आहेत. त्यातील देवालये १४ प्रकारची असून घरांचे आठ प्रकार आहेत, त्यातच मंडप व पोटल हे प्रकार येतात. चार, आठ किंवा बारा खांबांच्या आधारावर सूच्याकार शिखर असलेल्या लहान देवालयाला मंडप म्हणतात.

खांब नसून, भिंतींच्या आधारावर घुमटाकृती शिखर असलेल्या लहान देवालयाला पोटल म्हणतात.

**कौतूहल, १.३६०**

हत्ती म्हणजे बुद्धी. सिंह म्हणजे शक्ति (विभूति), हरिण म्हणजे वेग, मनुष्य म्हणजे मूर्तिमंत ज्ञान व मकर म्हणजे (जणू) स्थैर्यता अशी कल्पना केलेली आहे. जेव्हां बुद्धी विभूतीवर स्वार झालेली असते म्हणजेच शरीर सिंहाचे व डोके हत्तीचे अशी मूर्ती करतात तेव्हां तीस ' गजसिंह ' म्हणतात व ती सिद्धी निर्माती (दात्री) आहे असे समजतात. याच प्रमाणे जेव्हा विभूती व ज्ञान यांचे मिलन होते म्हणजे सिंहाचे शरीर व माणसाचे डोके, तेव्हा त्यास ' नारविराल ' म्हणतात व ती मूर्ती धर्माची प्रतिनिधी समजतात. जेव्हां विभूति व वेग (किंवा सूक्ष्म विचार) एकत्र येतात (हरिणाची शिंगे असलेला सिंह) तेव्हां त्या मूर्तीस ' मृगविराल ' म्हणतात व ती साक्षात प्रज्ञा असते.

जेव्हा स्थैर्य व बुद्धी हे एकत्र येतात (शरीराचा खालचा भाग मकराप्रमाणे व वरचा भाग मनुष्याप्रमाणे) तेव्हा त्या मूर्तीस दुसरा ' नारविराल ' म्हणतात व ती मोक्षाची प्रतिनिधी समजतात. (या विशिष्ट प्रकारच्या विरालाची मूर्ती आजपावेतो कोठेही आढळलेली नाही.)

**रामगायत्री.**––गाईच्या स्वरूपातील गायत्रीमंत्र. स्थपतींमध्ये अशी वदंता आहे की जेव्हा राम वनवासात रानटी टोळ्या व प्राणी यांच्या समवेत रहात होता तेव्हां तो पूजाविधी विसरून गेला. तेव्हां गायत्री (मंत्र) गाईच्या स्वरूपात रामाकडे आली व तीने त्यास उपासना मार्ग सांगितला.

**सिंह मकराकृती.**––चेहरा सिंहाचा मात्र तोंड व शरीर मकराचे अशी मूर्ती. ती सूर्य किंवा अग्नि व सोम, जे जगाच्या निर्मितीचे प्रधान गुण आहेत, त्यांची प्रतिनिधी असते. विमर्श शक्तीस ' अग्नि–सोम-रूपिणी ' म्हटले आहे.

**नवगुंजर.**––श्रीकृष्णाचे विश्वरूप. यात आठ प्राणी व नववा मनुष्य अशी संयुक्त मूर्ती असते. ती अर्जुनाच्या पुढ्यात असून मनुष्यरूपाच्या हाताने त्याला कमळ देत आहे अशी नेहमी दाखवितात.

**२.१६९**

वलभी या मूळ संस्कृत शब्दाचा उरिया भाषेत वाडभी असा अपभ्रंश झाला आहे. त्याचा अर्थ होतो छप्पराची लाकडी चौकट, सपाट छप्पर, घराचा वरचा भाग, वरची खोली, वरचा मजला, बाल्कनी. वास्तू करताही हा शब्द वापरतात व त्याने सपाट छताच्या देवालयाचा निर्देश होतो.

**पवमान सूक्त, २.२४२**

ऋग्वेदातील नवव्या मंडळांत तसेच अथर्व वेद १९.७.११ मध्ये हे सूक्त असून सोमवल्लीचा रस गाळतांना किंवा शुद्ध करतांना त्याचे पठन करतात.

**२.२४६**

पीठाची उंची काढावयाची ही रीत आजच्या स्थपतींना देखिल माहिती आहे. शिल्पसारणीप्रमाणे प्रासादाच्या निरनिराळ्या अवयवांची मापे ही मापांच्या विशिष्ट एककांच्या पटीत दिलेली असतात, ज्यास मूळसूत्र किंवा मूलभाग म्हणतात. प्रासादाचे सर्व अवयव या मूळ भागाच्या दिलेल्या पटीतच असले पाहिजेत असा नियम आहे.

**आवरण देवता, २.३०४**

आवरण म्हणजे जे वेढून टाकते, जे दृष्टीला पडू देत नाही. ज्याप्रमाणे ढगाचा तुकडा, जरी फार लहान असला तरी, जसा सूर्यास दृष्टीस पडू देत नाही त्याप्रमाणे आवरण देवता या देवीचे दर्शन माणसाला घडू देत नाहीत. (कामकला विलास, श्लो. ३५).

जेव्हा सर्वोत्तम, महान अशी शक्ति चक्राचे मूर्तीरूप धारण करते तेव्हा तिच्या शरीराच्या अवयवांचे मूर्ती देवतांमध्ये रूपांतर होते.

यावरील टीका खाली दिल्याप्रमाणे आहे.––

शक्तीचे शरीर तेजपुण्यात्मक आहे, तिच्या शरीराचे अवयव त्याचे किरण होत. आवरण देवता म्हणजे असंख्य शक्ती आहेत, जशा वासिनी, अणिमा इत्यादी. या देवता संज्ञा समुद्राचा भाग आहेत. चक्र अशा तेजापासून बनलेले आहे व शक्ती या त्या समुद्राच्या तरंगांप्रमाणे आहेत.

**मन्थना शक्त शक्ति, २.३१०**

सर्वोच्च शक्ति ही निराकार व सूक्ष्म स्वरूपात असून मूलाधारातील बिंदूभोवती विळखा घालून निद्रिस्त असते. येथेच स्वयंप्रज्ञ योगिनी फक्त झोपेचीच इच्छा करून असते. तिच्या फुगलेल्या पोटांत चंद्र, सूर्य, अग्नि, तारे, चौदाही भुवने असून ती मूर्छितावस्थेत असते. अनाहत नादाने व तिच्या पोटातील अग्नीच्या घुसळण्याने ती तिच्या बंधनातून मुक्त होऊन केवळ ज्ञानरूपिणी होते. हे घुसळणे वर्तुळाकार असून शक्ति जागी होईपर्यंत चालूच रहाते. जेव्हां प्रथम भेदाची निर्मिती होते तेव्हा बिंदूचे रूपांतर नादांत होते. अशा रीतीने ही कुण्डलिनी, ही कालसूक्ष्मा जागृत होते.

[आर्थर अवलोन यांनी संपादित केलेल्या कामकलाविलास या तंत्रविषयक ग्रंथावरून]

तेव्हां मन्मथाशक्तशक्ति म्हणजे जगाच्या उत्पत्तीच्या वेळेला जाणिवेला जागी करणारी जी शक्ति तिला म्हणत असावेत.

**प्रासादाचे आयुर्मान, २.७३४**

प्रासादाचे त्याच्या आयुर्मानाप्रमाणे तीन प्रकार होतात.––

**ध्रुव.**––१४ पिढ्यांपर्यंत टिकणारा,

**कल्प.**––७ पिढ्यांपर्यंत टिकणारा व

**क्षुण.**––३ पिढ्यांपर्यंत टिकणारा.

शिल्पसारणीच्या मताने ध्रुव प्रकारच्या प्रासादाचे आयुर्मान एक युग असते व क्षुण प्रकारचा प्रासाद फक्त एक पिढीपर्यंत टिकणारा असतो. या कालमर्यादांमधील ज्याचे आयुर्मान असते तो कल्प प्रकारचा प्रासाद.

**तत्त्वपूजा, २.७८७**

ओरिसा राज्यातील कृष्णदेवाने लिहिलेल्या ' श्यामार्चन तरंगिणी ' प्रमाणे तत्त्वपूजा म्हणजे महाकालीची पूजा. ही पूजा करण्याचा विधी असा.

देवीचे भक्त वर्तुळात बसतात आणि त्यांच्या समोर ठेवलेल्या पंचवीस कलशातील पवित्र मद्य पितात. वर्तुळाकृतीत ठेवलेले हे पंचवीस कलश पराशक्तीच्या पंचवीस तत्त्वांचे प्रतिनिधीत्व करतात; त्यांचे ध्यान भक्त करतात व या वर्तुळाला आनंद मेखला म्हणतात. केन्द्रस्थानी एक व चार कोपऱ्यांवर चार असे पाच मोठे कलश ठेवतात. ते पांच प्रकृतींचे प्रतिनिधीत्व करतात. ब्रह्मवैवर्त पुराणाप्रमाणे दुर्गा, लक्ष्मी, राधा, सरस्वती व गायत्री या त्या पाच प्रकृती आहेत. केंद्रस्थानी ठेवलेला कलश हा त्रिकोणात ठेवतात. या त्रिकोणाला अर्धमात्राकृति योनी म्हणतात.

२.७८८

जैमिनीने पूर्वमीमांसेत प्रासाद प्रतिष्ठेवर काही प्रकरणे लिहिली असल्याने त्यांचा उल्लेख येथे आला असावा.

# शब्दकोश

## अ

अच्छिद्र भित्ती

अच्छिद्र-भित्ति-गर्भगृह व मुखशाला यांच्या भिंतींच्या आतील (पृष्ठ-) भाग ज्यावर काहींही नक्षी कोरलेली नसते. (१.१५४).

अनर्थ

**अनर्थ.**––कोणक व राहा यांच्यामधील मुखशालेच्या बाबतीत पीठ ते छप्परापर्यंत गेलेला व गर्भगृहाच्या बाबतीत पीठ ते शिखरापर्यंत गेलेला अवयव. (१.२४८; २.१२५)

अनुराह

**अनुराह.**––कोणक व अनर्थ आणि अनर्थ व राहा यांच्यामधला भिंतीचा अरुंद भाग (१.३३५, २.११६, २८१)

अमलक

**अमलक किंवा अमलशिला.**––चक्री भोपळ्याच्या आकाराचा शिखराचा सर्वात वरचा अवयव.

अमलकी

**अमलकी.**——कोणकाच्या विभागातील एक थर (२.१०८).

**अमृत कलश.**——अमृत भरलेला कलश, शिखरावरील सर्वात वरचा अवयव.

**अलसा कन्या.**——अळसावलेली किंवा खेळकर मुलगी. देवळाच्या भिंतीच्या बाहेरील भागी असतात. (१.४०७)

अलंसा बाड

**अलसाबाड किंवा चय.**——कोनाड्याच्या पुढे आलेल्या भिंती. (१.२०६)

**अर्धगर्भक**——खोबण. (१.५३१)
**अष्टताल**——चेहऱ्याच्या आठपट उंचीची मूर्ती. देवीची मूर्ती आठ तालांची असते. (२.७७६–७८३)

**आगमा.**——वेलींची उभी नक्षी. (१.२९९)

आडकेरी

**आड-केरी.**——थर विभागातील आडवी नक्षी (२.६३९), केरकर्म पहा.

आड छेद

**आडछेद.**——गर्भगृहाच्या अधोच्छन्दांत बाहेरील आयतांच्या सीमा दाखविणाऱ्या रेषा. (१.६६)

**आडरेखा.**——१.६६ प्रमाणे.

आलम्ब

**आलम्ब.**——मण्यांची लोंबत्या हाराची नक्षी (१.१४३, २३०).

आलंम्बिका

**आलम्बिका.**——सिंहमुखापासून किंवा कंबरपट्ट्यापासून मण्यांच्या लोंबत्या हारांची नक्षी. (१.४१७, २.२७९)

**आवरण देवता.**——गर्भगृहाच्या भिंतीवर मुख्यतः अनर्थावर व मुखशालेच्या भिंतीवर या दुय्यम देवतांच्या मूर्ती असतात. त्यांची प्राणप्रतिष्ठा तसेच पूजा अर्चा केली जात नाही. (१.२५६–२५९; २.३०४–३१६)

## उ

**उत्पला.**——फुललेल्या कमळाची नक्षी. (१.३२८)

**उपरथ.**——दोन मुख्य रथांच्या मध्ये असलेला दुय्यम रथ.

उरु

**उरु.**——त्रिकोणाकृती लहान खुर. (२.२८५)

उर्ध्वगर्भिका

उर्ध्वपिण्डि

**ऊर्ध्वगर्भिका.**——कोनाड्याच्या वरच्या बाजूला भिंतीवर केलेली नक्षी. (२.३७०)

**ऊर्ध्वपिण्डि.**——देवमूर्तीच्या आसनाचा सर्वात वरचा थर विभाग. (२.७६१)

**ऊर्ध्वबंधना.**——भिंतीच्या वरच्या भागी व शिखराच्या खाली असलेला नक्षीदार पट्ट. याला भित्तिबन्धनाही म्हणतात. (२.३७९, ४३२)

**ऊर्ध्वबिंदू.**——आकृतितील सर्वात वरचा मध्यबिंदू.

## क

**कंठ, कंठस्थान.**—–भिंत व घुमटाकार छत यांच्या मधील अंतर्गमन असलेला भाग (२.५७, ६२२).

**कणिका.**—–लहान कणी.

**कणी.**—–कंगोरा.

कणीपीठ

**कणीपीठ.**—–कणीचा थर विभाग असलेले पीठ. (१, २०९, २१६, २.७५२)

कलश

**कलश.**—–कळसाच्या आकाराचा दगडी शिखरावरील सर्वात वरचा अवयव. (२.६८४)

**कलियुक्ता.**—–कळ्यांसह फुलांची नक्षी. (१.३१२)

कलिकावलि

**कलिकावलि.**—–कळ्यांची रांग.

**कामबन्ध.**—–कामलीलात मग्न असलेल्यांची रांग. (२.४९८)

कीर्तिमुख

**कीर्तिमुख.**—–वज्रमस्तकाच्या केंद्रस्थानी असलेल्या वर्तुळातील मनुष्याचा चेहरा. (१.१४२) (सिंहमस्तक)

**कुञ्चिता.**—–उभी पाने रांगेत कोरून काढलेली नक्षी. (१.२८८)

**कुट.**—–दोन अवयवांमधली फट (२.१६८)

**कुटिला.**—–लांब देठांच्या पानांच्या वेलीची लांब व तरंगाप्रमाणे नक्षी. (१.३०७)

कुंभ

**कुंभ.**---पंचकर्माचा दुसरा थर विभाग, पीठाचा एक प्रकार. (१.२१३) खांबावरील कुंभ थर. (१.२२२)

कुंभ केरी

**कुंभकेरि.**---कुंभाच्या मुखातून खाली लोंबणाऱ्या पानांची नक्षी.

कुंभ कलश

**कुंभ कलश.**---कळसाचा एक प्रकार. (२.६९३)

**कुंभ स्तंभ.**---वरती व खाली कुंभ असलेला खांब. (१.२२२)

कुंभिकाबन्ध

**कुंभिकाबन्ध.**---कुंभांची उभी अथवा आडवी रांग. (१.५१६, २.१२२, १२९)

**कूट.**---कोठलाही बाहेर आलेला भाग. (२.१०४, १६७)

कूर्म पृष्ठ

**कूर्म पृष्ठ.**---कासवाच्या पाठीप्रमाणे दिसणारा थर विभाग, पीठाचा एक प्रकार. (१.२११, २१८)

**केन्द्ररेखा.**---व्यास किंवा त्रिज्या. (१.५१)
**केर, केरि.**---कोरीव नक्षी. (२.६९३)

कोणक

**कोणक.**—–गर्भगृहाचा बाहेरील स्तंभ. (१.२३४, २.१०७, २६९)

**कोणछेद.**—–चौरसाचा किंवा आयताचा कर्ण.

**कोणरेखा.**—–म्हणजेच कोणछेद.

**कोणवर्ग.**—–कोपऱ्यावर उभा असलेला चौरस, समभुज चौकोन.

**कोणिका.**—–रथयुक्त देवालयाच्या अधोच्छन्दांत कोपऱ्यापाशी असलेली लहानशी कर्णपट्टी. (२.७२)

**क्रमछेद.**—–निरनिराळ्या पातळींवरील समांतर रेघा.

**कौतूहल.**—–दोन प्राण्यांच्या जोडणीने होणारा (विचित्र) प्राणी. (१.३४५, ३६०)

**कौणप.**—–पिशाच्च.

## ख

खांदि

**खांदि.**—–फट, चीर, संस्कृत मध्ये विश्रान्ति-स्थळ.

खर्पर

**खर्पर.**—–(उडिया भाषेत खपुरि)—कवटी, कांहीशी वक्राकार अशी शिळा, छप्पर किंवा अमलक झांकण्यासाठी (२.९२,९५) देवी (शक्ती)च्या देवळावरील घुमटाकार शिखर. (२.६२३)

खुर

**खुर.**—–पंचकर्माचा सगळ्यात खालचा थर विभाग.

## ग

**गर्भक.**——शिखर, गर्भगृहाच्या भिंतीच्या वरच्या बंधनापासून बेकिपर्यंतचा भाग, याचे तीन प्रकार आहेत, रेखा, पिढा व खाकरा.

**गर्भन्यास.**——गर्भगृहाची पायाभरणी.

**गर्भक पट्टी.**——खांदि अथवा फट यावरून जाणारी लहान पट्टी.

**गर्भयंत्र.**——गर्भगृहाचा अधोच्छंद. (१.६१)

गर्भ रेखा

**गर्भरेखा.**——गर्भगृहाच्या अधोच्छन्दात गर्भगृहाच्या आतल्या भागाची आडवी सीमा दाखविणाऱ्या व लांबीतील भिंतीची बाहेरील सीमा दाखविणाऱ्या रेघा. (१.६६-६७)

गर्भशंकर

**गर्भशंकर.**——राहाच्या पुढच्या भागांत असलेली शंकराची मूर्ती. (२.१८०)

**गर्भकसिंह.**——गर्भगृहाच्या शिखराच्या राहाभागाच्या मध्यभागी असलेली सिंहाची मूर्ती. (२.२८, ६६६)

**गर्भिका.**——राहाच्या कोनाड्याच्या खालचा अवयव-तलगर्भिका (२.३३७) व वरचा अवयव-ऊर्ध्वगर्भिका.(२.३७०)

गवाक्ष

**गवाक्ष.**——जाळीदार खिडकी. (१.३६५)

**गवाक्ष-मण्डन.**——गवाक्षावरील कोरीव काम केलेला भाग. (१.३७३–३९०)

**गवाक्षिका.**——दगडामधले जाळीचे कोरीव काम. (१.४९३)

गुण्डिकां

**गुण्डिका.**——मण्यांची नक्षी. (२.३५५)

**गुण.**——अनुराह व राहाचा एक प्रकार. (२.१२१, १४३)

**गुणरेखा.**——परस्परसापेक्ष खालच्या खालच्या पातळीवरील समांतर रेषा. (२.३५४, ३५५)

**गुंफन.**——एकमेकांत गुंफलेल्या रांगा.

गुल्म.

**गुल्म.**——पानांचा गुच्छ.

**गेलब.**——वेलबुट्टीमध्ये स्त्रीची मूर्ती. (१.१९७)

**गेलबनारी.**——१.१९७ प्रमाणे.

## च

चंद्रिका

**चंद्रिका.**——मोराच्या पिसावरचा डोळा, त्या आकाराच्या नक्षीला म्हणतात. (१.१२६. १५१; २.६५४).

चम्पक दल

**चंपकदल.**——कुंभाच्या तोंडापासून खाली लोंबणाऱ्या चाफ्याच्या पानाची नक्षी (१.२४०), किंवा पंचकर्मावरील खान्दिवरील नक्षी. (२.२६४)

**चातुकी.**——डोळे किंवा वडी यांची धावती नक्षी. (१.३२१)

**चापशिला.**——जड आडवे दगड, (मुखशालेच्या) छप्परावरील दगडांना स्थैर्य देणारे. (१.५२५)

**चाल.**——छप्पराचा अवयव (२.७०२),
दोन प्रकारचा असतो-पिढा-चाल व लहराचाल.

चूल

**चूल.**——शिखा, घुमटाकार छप्पराचा सर्वात वरचा भाग. (२.५७)

**चूलि.**——अनर्थातील कोनाड्याचे वर्तुळाकार छप्पर.

**चूलिका.**——नक्षी कामातील लहान गोलाकार वरचा भाग. (२.३२१, ३२६, ७०१)

## छ

छन्द

**छन्द.**——एकमेकावर छेदून जाणारे भाग. (१.४६२, ४६४, २.६२५)

**छेद.**——फट, खांच, आकृतीतील आडवी, उभी अथवा तिरपी रेघ.

**छेदकोण.**——उतरता किंवा कलता भाग. (२.१४१)

**छेदबिंदू.**——दोन रेघा ज्या बिंदूत परस्परांस छेदतात तो बिंदू. (१.१७८, २६५)

## ज

जलपत्र

**जलपत्र.**——दरवाजावर पाणवनस्पतीची अलंकरणार्थ नक्षी. (१.२००)

## झ

झरा

**झरा, झरावलि.**——लोंबत्या थेंबांची नक्षी. (१.५०६, २.३७७, ५३३).

## ड

डमरु भूमि

**डमरूभूमि किंवा डमरुगर्भ.**—डमरुच्या आकाराचा अवयव. (१.२३८, २.२६४)

डोरि

**डोरि.**—आडवी लहान पट्टी. (१.२२८)

## त

तल गर्भिका

**तल.**—पातळी, कुठल्याही वास्तूचा, वास्तूच्या अवयवाचा आधारभूत भाग, मजला.

**तलगर्भिका.**—मध्यभागी असलेल्या कोनाड्याच्या खालच्या बाजूला केलेले अलंकरण. (२.३३७)

तल बन्धना

**तलबंधना.**—पंचकर्माच्या वर व भिंतीच्या खालच्या बाजूस असलेला नक्षीचा पट्ट. (२.४३०)

**ताल.**—मूर्तीच्या मापाचे एकक, मूर्तीच्या मुखाच्या मापावरून ठरविलेले. (२.७७५)

त्रिछेद

**त्रिछेद.**—बाहेर आलेल्या आयताकार भागाची सीमा दाखविणाऱ्या तीन रेघा. (१.६८)

## थ

थियकेरि

**थियकेरि.**—आडाकेरिप्रमाणे पण उभी नक्षी.

## द

**दंति.**—दाताच्या टोकाप्रमाणे बाजूने दिसणारा थर विभाग.

दंतुरिका

**दंतुरिका.**—दंतुर नक्षी.

**देश.**—कोणताही भाग, अवयव किंवा क्षेत्र.

## ध

**धार.**—आधार, खांब.

**धारिणी शिला.**—चापशिलेच्या खोबणीत ज्या दगडाचे कूस बसविलेले असते असा उभा दगड. (१.५३५)

## न

**नन्दावर्त.**—देवालयाच्या प्रवेशद्वारापाशी असलेल्या अर्धवर्तुळाकार पायऱ्या.

नन्दिकामुख

**नन्दिका मुख.**—लहान वज्रमस्तकाच्या मध्यभागी वक्षभागासह स्त्रीचे मुख. (१.१४७, १४८)

**नागस्तंभ.**—एक किंवा दोन नागमूर्तींनी लपेटलेला खांब.

**नाटाम्बर.**—गर्भकाच्या पुढच्या भागी असलेली नटेशशिवाची मूर्ती. (२.१८७–२३९)

**नारिबन्ध.**—स्त्रियांची रांग.

**निम्नबन्धना.**—पंचकर्माच्या वर पण भिंतीच्या सगळ्यात खालच्या पातळीवर असलेला नक्षीदार पट्ट.

**निम्नबिन्दू.**—आकृतीतील सगळ्यात खालच्या आडव्या रेघेचा मध्यबिंदू.

निशागर्भक

**निम्नरेखा.**——आकृतीतील सगळ्यात खालची रेघ.

**निशा.**——(मूर्ती करिता) कोनाडा.

**निशागर्भक.**——मोठ्या रेखा प्रकारच्या प्रासादाच्या मागच्या व दोन्ही बाजूस लहान देवालये असतात त्यांना म्हणतात. (२.२८, ४१).

**निशामूर्ती.**——या लहान देवालयातील मूर्ती

## प

**पंकजा.**——उमललेल्या कमळाचे अलंकरण. (१.३२५)

**पंचकर्म.**——देवालयाच्या भिंतींच्या सर्वात खालच्या भागातील पाच थर विभाग.

पट्ट

पट्टी

**पट्ट.**——नक्षीशिवाय असलेला थरविभाग.

**पट्टी.**——दगडाचा अरुंद पट्ट.

**पद्मपत्र.**——कमळाच्या पानाप्रमाणे आकार असलेला थरविभाग.

पद्मपीठ

**पद्मपीढ.**——छप्परासारखा खालच्या बाजूस चक्राकार असून त्याच्यावर कमळाच्या पानांची नक्षी कोरलेली असते.

पद्मपृष्ठ

**पद्मपृष्ठ.**——दोन वक्र असून कमळाच्या पानांची नक्षी असते.

**परिराहा.**——राहाच्या बाजूला असलेला अरुंद उभा पट्ट, शिखरावर अनुराहाला सलग असतो. (२.५८६,५९०)

**पल्लव.**——पानांची नक्षी (१.३१०, ३११)

**पाग.**——भिंतीचा व शिखराचा उभा विभाग, खांब, रथाप्रमाणे.

**पाट.**——सपाट दगड. (१.५२१–५२३)

**पार्श्वदेवता.**——देवालयातील मुख्य देवमूर्तीशी संबंधित इतर देवता, राहावरील तीन कोनाड्यांत त्या ठेवलेल्या असतात. त्यांची प्राणप्रतिष्ठा केलेली असून त्यांची पूजा केली जाते. (२.३५६)

**पिण्डिका किंवा पिण्डि.**——बैठक, आसन.

पीढ

**पीढ.**——इमारतीच्या अग्रभागातील त्रिकोणाकृती भाग जो उतरता व वक्राकार आकाराचा असतो. इमारतीचा वरचा भाग झाकणारा अवयव. (२.३२०–३२५)

**पीढ-चाल.**——एकावर एक पीढ ठेवून बांधलेले छप्पर. (२.७०२)

**पूर्णदभित्ति.**——प्रासादाची पायाची भिंत.

पोटल

**पोटल.**——खांबाशिवाय, भिंती व घुमटाकार छप्पर असलेले देवालय.

**प्रस्थ.**——रुंदी, आडवे माप.

**प्रस्थबिंदू.**——आकृतीत, ज्या बिंदूपाशी आडवी रेघ उभ्या रेघेस येऊन मिळते तो बिंदू.

**प्रस्थरेखा.**——आकृतीत आडवी रेघ.

**प्रान्तरेखा.**——उभी बाहेरची सीमा दाखविणारी रेघ. (२.६०४)

**फ**

फुलि

**फुलि.**——भूमी किंवा तरंगाप्रमाणे अथवा दंतुर पृष्ठभाग.

फेणी

**फेणी.**——उलटा पद्म थर.

फेणी चूलिका

**फेणी-चूलिका.**——फेणींनी बनविलेली चूलिका. (२.४६०)



एन ४१३३–१२

## ब

**वड.**——खालचा पंचकर्म व वरची बंधना यामधला भिंतीचा भाग.

**बन्ध.**——नक्षीदार पट्ट. (१.१९४, ५०७; २.३८६)

**बन्धना.**——माळेसारखा थरविभाग, कंगोरा, भिंतीवरील एकावर एक ठेवलेले आडवे थर विभाग. (१.४८२, २.३७९)

**बल.**——वळी. (१.५०४)

**बलि.**——लहान वळी. (१.१२३, १३६, १४३)

**बाहू.**——हात. रेघ, आकृतीतील तिरपी रेघ, त्रिकोणाची बाजू.

**बेकि.**——कंठदेश, देवालयाचा मानेचा भाग, शिखर व आमलक यांच्यामधला भाग. (२.४०५)

**बेकि भैरव.**——आमलकाला जणू कांहीं आधार देत आहे अशी बेकीवरील मूर्ती. (२.४०५)

**बेकिसिंह.**——बसलेल्या सिंहाची मूर्ती. (२.४०५)

**बेढ.**——घुमटाकृती छप्पराच्या खालचा भिंतीचा उभा भाग. (२.६१७)

## भ

**भंगि.**——शरीराचा बांक. (१.२७९)

**भद्रपीठ.**——कैलास व पंचरथ प्रकारच्या देवालयांचा अधोच्छंद या प्रकारचा असतो. (२.३१)

**भूमी.**---जमीन, इमारतीची जागा (१.३९) इमारतीच्या कुठल्याही अवयवांची बैठक.

## म

मकर

**मकर.**---लहानशी सोंड असलेला मगर, दंतकथेतील प्राणी, वरूण व गंगा यांचे वाहन.

मकराकृति हरि

**मकराकृति हरि.**---मकराचे अवयव लावलेले सिंहाचे तोंड. देवालयाच्या पुढच्या बाजूला अलंकरण म्हणून ठेवतात. (२.६५८)

मंडप

**मण्डप.**---गर्भगृहाच्या पुढच्यातील मुखशाला किंवा सूच्याकार शिखर असलेले लहान देवालय.

**मणिबिन्दू.**---कामकलायंत्रातील मध्यबिन्दू (२.५०९, ५१०)

**मध्यप्रस्थ.**---आकृतीतील आडवी मध्यरेघ. (१.२६५, ४०५; २.२०६, २१२, २३४)

**मध्यबन्धना.**---भिंतीच्या मध्यभागी असलेला नक्षीदार आडवा पट्ट.

**मध्यरेखा.**---आकृतीतील उभी मध्य रेघ. (१.१६१, १७७, १९०, २.२१९, २२९ वगैरे).

**महाविद्या.**---पराशक्तीचे दहा निरनिराळे अवतार. (१.२५९)

**मातृका.**---कांहीं देवांच्या शक्ती, या सात किंवा आठ आहेत. (१.२५९)

मुखटा

**मुखटा.**---खाकरा प्रकारच्या देवालयाच्या रुंद छप्पराच्या पुढच्या बाजूस घुमटाकार असलेला पुढे आलेला भाग. (२.६३६, ६४१)



एन ४१३३-१२अ

मुद्रका

**मुद्रका.**——छप्परावरील सर्वात वरची शिला; आमलकावरील पोकळी झाकणारी शिला.

**मूर्तीयंत्र.**——मूर्तीच्या आंखणीची आकृती.

**मेघा.**——ढगांप्रमाणे दिसणारी नक्षी. (१.३१४)

### य

**यन्त्र.**——पूजेसाठी विशिष्ट भौमितिक आकृती (१.९०), मूर्तीच्या आखणीची आकृती (१.१५९, १७२ वगैरे).

**यूप.**——यज्ञीय खांब, देवीच्या मंदिरावरील लिंगाच्या आकाराचा कळस. (२.६८४)

### र

**रतिकेर.**——उभ्या जागेवर पानांच्या नक्षीचे केलेले अलंकरण. (१.३०१)

रत्नगर्भ

**रत्नगर्भ.**——दगडाचे यन्त्र. यात मूल्यवान रत्ने ठेवण्यासाठी खोबण्या असून ते यन्त्र मूर्तीच्या बैठकीच्या खाली तिच्या प्रतिष्ठाविधीच्या वेळी ठेवतात. (२.७४५)

**रथ.**——देवालयाचे उभे विभाग, त्रिरथ, पंचरथ, सप्तरथ व नवरथ असे देवालयांचे प्रकार आहेत. (२.४४)

रथक

**रथक.**——रेखा प्रकारच्या देवालयाच्या भिंतींवर पिढा प्रकारच्या लहान शिखरांनी अलंकरण केलेले असते. कांहीं वेळेला शिखरावरती लहान लहान शिखर दाखवितात. त्यांना ही रथक म्हणतात.

**रंगणी.**——लहान चौरसांत दाखविलेली फुलांची नक्षी. (१.३२०)

**राजबंध.**——मुखशालेच्या भिंतीवर सर्व बाजूंवर कोरलेला नक्षीदार पट्ट. यावर राजाची मिरवणूक, शिकारीची दृश्ये, सैन्याचे संचलन इत्यादि दृश्ये दाखविलेली असतात. (१.५०७)

राम गायत्री

**रामगायत्री.**——मनुष्याचा चेहरा असलेली गाय. (२.७२६)

**राहा.**——आधार, भिंत व शिखरावर उभा, मध्यभागी पुढे आलेला विभाग. (२.१३६, ३३०, ५४३)

राहागर्भक

**राहागर्भक.**——राहाच्या पुढच्या बाजूस जेथे वज्रमस्तक असते ती जागा.

**राहा-सिंह.**——राहापासून पुढे आलेली सिंहाची मूर्ती.

## ल

**लता-दंड.**——वेलीचे कांड.

**लक्ष्मीस्थल.**——दरवाजाच्या उत्तरंगावर मध्यभागी लक्ष्मीची मूर्ती असते ती जागा. (१.८३, १७२)

**लहर.**——तरंग, छप्पराचे दगड आत आत घेऊन बांधलेल्या छप्पराचा प्रकार. (१.४८३)

**लहरीतल.**——Corbelled छप्पराचा तळ. (१.४८५)

## व

**वज्रबिन्दू.**——वज्रमस्तकाच्या वर्तुळाच्या खालच्या बाजूचा मध्यबिन्दू. (१.१२२)

**वज्रमस्तक, वज्रमुखी किंवा वज्रमुण्ड.**——राहापागाच्या पुढच्या बाजूला असलेले प्रमुख अलंकरण, तसेच खुर वगैरे भागांवर लहान प्रमाणांत असते. (१.१२०, २.५७८)

वर्त

**वर्त अथवा नंदावर्त.**——मंदिराच्या प्रवेशद्वारापाशी असलेल्या अर्धवर्तुळाकृती पायऱ्या. (१.७५)

**वर्तुला.**——वर्तुळाकृतीत पानांची नंक्षी. (१.२९६)

वर्तुलकणी

**वर्तुलकणी.**——वृत्ताकार कणी. (२.४७३)

**वल्लभि.**——वेलींची नक्षी. (१.२८४)

**वसन्त.**——पाने व वेली यांची नक्षी असलेला आडवा पट्ट.

**विग्रहबन्ध.**——मूर्तींची रांग. (२.४७)

**विमान.**——मंदिराचे शिखर, कांही वेळेला संपूर्ण देवालय.

विमानिका

**विमानिका.**——खांबाच्या वरच्या टोकावर दाखविलेले लहानसे शिखर, त्यावर फेणि, पिढा, कलश व वज्रमस्तक दाखवतात. (२.४४९)

**विश्रांतिस्थळ.**——खांदि.

**वीथीपीठ.**——साधे, नक्षी नसलेले पीठ. (१.२१४–१५)

**वीरासन.**——एक गुडघा जमिनीवर टेकलेला व दुसरा गुडघा वर उचललेला अशी बसण्याची तऱ्हा. (१.३५२)

**वेध.**——जाडी, खोली, कांहीं वेळेला उंची देखील.

**वैताल.**——लांबट गोल शिखर. (२.४५–६६)

**वृत्तवज्रांग.**——वज्र मस्तकांचा प्रकार. (१.१३३)

## श

शिखर

**शालारन्ध्र.**——शालेच्या दोन छप्परांमधल्या उभ्या भिंतीच्या जागेत असलेली भोके.

**शिखर.**——विमान, गर्भक, गर्भमन्दिर हे प्रतिशब्द आहेत.

**पाग–शिखर.**——गर्भगृहाच्या शिखरावरती प्रामुख्याने अनर्थावरती असलेले लहान शिखर.

**निशा-शिखर.**——कोनाड्यावरील लहानसे शिखर.

## स

**सगुंफा.**——प्राण्यांसह लतावेलींची नक्षी. (१.३०५)

**समभद्रपीठ.**——रत्नसार देवालयाचा अधोच्छन्द या प्रकारचा असतो. (२.१३)

**समभागिक.**——दिलेल्या क्षेत्राचे दोन समान भाग करून त्यात दोन निरनिराळ्या नक्षी कोरलेल्या असतात. (१.३०९)

**समक्षेत्र पद्मपीठ.**——महामेरू देवालयाचा अधोच्छन्द या प्रकारचा असतो. (२.२३)

संधिस्थल

**संधिस्थल किंवा स्थान.**——मुखशाला व विमान यांना जोडणारी भिंत. (१.७४)

**सर्वतोभद्र पीठ.**——मंजुश्री देवालयाचा अधोच्छंद या प्रकारचा असतो. (२.९)

**सिंहमुख.**——वज्रमस्तकावरील किंवा इतर स्थानांवरील सिंहाचे तोंड.

**सूत्र.**——माप घेण्यासाठी दोरी, शिल्पविषयक नियम.

## ह

**हंस, हंसलता.**——हंसांची रांग. (१.२९३)

श्री गणेशाय नमः

ॐ विश्वकर्मणे नमः । श्री नीलाद्रिनाथायनमः ।

## शिल्पप्रकाशे

### प्रथमः प्रकाशः

विश्वकर्मप्रतिमाध्यानम् —

ऐरावतसमारूढं नानामणिविभूषितम् ।
चतुःषष्टिकलाविद्यानिपुणं वदनोज्ज्वलम् ॥ १ ॥

पीतवस्त्रपरीधानं केयूरहारमण्डितम् ।
चतुर्भुजधरं देवं प्रशान्तवदनं महत् ॥ २ ॥

भुजद्वये सुगर्भा च अपरे मानधारकम् ।
वन्दे विष्णुं महातेजो विश्वकर्मन् नमोस्तु ते ॥ ३ ॥

यंत्रकालिकास्वरूपम् —

यंत्रामूर्तिः महाकाली सर्वविद्यास्वरूपिणी ।
सर्वशिल्पमयी नित्या सर्वानन्दप्रदायिनी ॥ ४ ॥

सर्वविघ्नहरीं देवीं नमामि यंत्रकालिकाम ।

शिल्पभेदाः —

शिल्पविद्या तु महती तन्मध्ये पंचधोत्तमा ॥ ५ ॥

दारु पाषाण लौहञ्च स्वर्णं लेख्या तथैव च ।
पोतकर्म गृहाधारं व्यावहारिकदारुणि ॥ ६ ॥

प्रासादे मंडपे दुर्गे पुरे पाषाणमेव च ।
प्रासादरक्षणे युद्धे लौहं लांगलकर्मणि ॥ ७ ॥

व्यसने भूषणे चैव स्वर्णं मुद्रा विनिर्मिते ।
प्रतिमागठने शुद्धं फलकोत्कीर्णने तथा ॥ ८ ॥

काष्ठपाषाणपात्रे वा प्राचीरे तोरणान्तरे ।
नानारससमायुक्ता लेखविद्यासु शोभना ॥ ९ ॥

श्रृणु तत्र प्रवक्ष्यामि प्रासादशिल्पमुत्तमम् ।
शिल्पप्रकाशग्रन्थोऽयं प्रासादविधिवर्णना ॥ १० ॥

भूमिनिर्वाचना --

प्रासादगठने मुख्या देशस्थानविचारणा ।
नदीहीनभूमिवर्ज्यं पाषाणमयमृत्तिका ॥ ११ ॥

सैकतबहुला भूमिः श्रेष्ठा प्रासादमण्डने ।
पंकिलां च परित्यज्य दाहभूम्या विवर्जिता ॥ १२ ॥

भूमिलक्षणानि --

एतानि देशभेदानि ग्राह्याग्राह्यं विचारयेत् ।
मृण्मयरजोयुक्ता च मुक्तापांशुसमप्रभा ॥ १३ ॥

मधुरगंधयुता या सा भूसुरा भूमिरेव हि ।
आरक्तवर्णभूमिश्च सद्योरक्तसमप्रभा ॥ १४ ॥

अम्लगंधसमायुक्ता क्षत्रिया भूमिरुच्यते ।
वालूकायुक्तभूमिश्च पीतवर्णा च पंकिला ॥ १५ ॥

क्वचित् सूक्ष्मा क्वचित् तीक्ष्णा क्षारगंधसमा च या ।
कथिता वैश्यभूमिः सा शिल्पशास्त्रानुमोदिता ॥ १६ ॥

अतिपंकिला च या भूमिः असितवर्णमृत्तिका ।
पूतिगन्धयुता भूमिः शूद्रेति समुदीर्यते ॥ १७ ॥

ब्राह्मणी क्षत्रिया सौम्या प्रासादार्थं शुभप्रदा ।
अन्यां तु वर्जयेत् नित्यम् श्रृणु शोधननिर्णयम् ॥ १८ ॥

वास्तुभूमिपरीक्षा --

आद्ये मध्यस्थले कृत्वा यंत्रगर्भं विनिश्चयेत् ।
मध्यबिन्दुं समालम्ब्य षोडशांशेन भाजयेत् ॥ १९ ॥

पूर्वे तथा न्यसेदिन्द्रमाग्नेय्याम् अग्निदैवतम् ।
दक्षिणे दण्डधृक् चैव नैर्ऋते नरवाहनम् ॥ २० ॥

प्रतीच्यां वरुणं वायुं वायव्ये कल्पयेत् सदा ।
उत्तरे दिशि कौवेरं ऐशान्यामीशमेव च ॥ २१ ॥

मध्यनिम्ने अनन्तञ्च ऊर्ध्वे ब्रह्माणमेव च ।
यमपार्श्वे पिशाचञ्च गुह्यकं वायुदेवताम् ॥ २२ ॥

किन्नरं नैर्ऋताधीशं गंधर्वं शंकरस्य च ।
यक्षासिद्धद्वयं वायुदेवतायाः प्रलम्बकम् ॥ २३ ॥

मध्यकेन्द्रे ताम्रदीपे करंजतैलसन्निभे ।
शिखाप्रज्ज्वलनम् कृत्वा पूजयेत्ज्योतिरूपिणीम् ॥ २४ ॥

अनूढावामहस्ते तु करणीया सुवर्त्तिका ।
तथा प्रज्ज्वलिते दीपे पूजयेत् ज्वलनाम्बराम् ॥ २५ ॥

अस्थिमालाधरां देवीम् असिखर्परधारिणीम् ।
ॐ ह्रां ह्रीँ ह्रूँ ह्रैँ ह्रौं ह्रः इति मंत्रेण पूजयेत् ॥ २६ ॥

पूजान्ते मापतिलं च शर्करां दर्भमृत्तिकाम् ।
आज्येन सह समालेप्य दिग्बलिकरणं ततः ॥ २७ ॥

अतः परं निरीक्षेत शिखां दीपस्य चोत्तमाम् ।
ऊर्ध्वमुखी यदि शिखा सर्वदानन्ददायिनी ॥ २८ ॥

कौवेराभिमुखी यत्र कीर्त्तिश्रीवृद्धिकारिणी ।
अस्थिरा सर्वदा यत्र शिखा तत्र न कारयेत् ॥ २९ ॥

यक्ष सिद्ध द्वयोर्हीना वर्जनीया सदा ध्रुवम् ।
यदि स्यात् कुंचितशिखा पाण्डुरवर्णसंनिभा ॥ ३० ॥

तदा निश्चितभावेन अस्थि तत्र न संशयः ।
स्वर्णवर्णशिखा यत्र दक्षिणाग्रे क्षणे क्षणे ॥ ३१ ॥

धनगर्भा च सा भूमिः यशःकीर्त्तिविवर्धिनी ।
कृच्छभूमिः सदा हीना दारिद्रयं जायते तथा ।
धूम्रवर्णशिखा यत्र शिखाग्रे धूम्रमंडलम् ॥ ३२ ॥

भूमिगर्भे मृताधारो वर्जनीया तु सा सदा ।
शवयुक्ता भूमिरेव कथिता शास्त्रविस्तरे ॥ ३३ ॥

सहसा दीपशिखया यदि भूमिः प्रचुम्बिता ।
निष्फला भूमिराख्याता न कार्या मन्दिरादयः ॥ ३४ ॥

श्रृणु कालं ततो गुणा भेदाः सिद्धान्तसम्मताः ।
रिक्ता त्यक्ता सदा वर्ज्या अशुद्धाः करणादयः ॥ ३५ ॥

नृपतिः सचिवः शिल्पी कर्मकारः पुरोहितः ।
सर्वे ते सम्भवा यत्र तत्र प्रासादसम्भवः ॥ ३६ ॥

शिल्पी पुरोहितो मुख्यौ वास्तुनिर्माणकर्मणि ।
आद्ये निर्वाचनं कुर्यात् वास्तुभेदं तथैव च ॥ ३७ ॥

स्थानभेदे वास्तुभेदं मतानुसारभेदयोः ।
केवलं तु प्रवक्ष्यामि शास्त्रानुसारतो यथा ॥ ३८ ॥

वास्तुभूमिभेदाः —

चतुरस्रं समं चैव विषमं चतुरस्रकम् ।
वृत्तं कुटिलरेखा सा शकटाकारकुंचिता ॥ ३९ ॥

ध्वजभूमिं तथा वज्रं वज्राकारेण कारयेत् ।
शरं च छत्रभूमिं च द्विभागीकृतमेदिनी ॥ ४० ॥

ततो व्यजनभूमिं च द्विमुखशीर्षगामिनी ।
मीनं च कूर्मपृष्ठं च शंखमर्धेन्दुशोभनम् ॥ ४१ ॥

पूर्णकुंभः तथा खड्गः अथवा कमलादयः ।
एतानि वास्तुभेदानि षोडशास्य विनिश्चयः ॥ ४२ ॥

कूर्मपृष्ठं तथाकारे कुंभं शंखं तथैव च ।
विष्णुभूमौः तथा शैवेकमलंवास्तुकर्मणि ॥ ४३ ॥

विषमं चतुरस्रं तु मीनं वज्रं तथैव च ।
खड्गवास्तु सदा देवि यंत्रवास्तु* तदुच्यते ॥ ४४ ॥

*शक्तिवास्तु

अपरे गृहभेदेन मध्यमं वास्तुनिर्णयः ।
अवश्यकरणं कर्म वास्तुभेदे न संशयः ॥ ४५ ॥

एतन्मध्ये चतुरस्रं धनधान्यादिवर्द्धने ।
सिद्धभूमिरिति ख्याता वाराहमतपुंगव ॥ ४६ ॥

इति वाराह संहितायाम् ।

भूमिमार्जनपद्धतिः —

वास्तुस्थापनकर्मान्ते भूमिमार्जनशोधनम् ।
करणं सूत्रपातार्थं शंकुः मध्यस्थलस्थितः ॥ ४७ ॥

वास्तुमध्ये गतो बिन्दुः गर्ते द्वादश चांगुलम् ।
गर्भे निपातयेत् शंकुं काष्ठे वा वेणुखंडक ॥ ४८ ॥

मध्यदेशे तथा सूत्रं द्वात्रिंशमुष्टिसम्मतम् ।
वृत्ताकारे तथा कुर्यात् मंडलं वेष्टनी यथा ॥ ४९ ॥

विश्वकर्मा द्विजश्रेष्ठः शंकुपार्श्वे च वेष्टनी ।
आराधयेत् तथा दिव्ये नृसिंहं विघ्ननाशनम् ॥ ५० ॥

केन्द्ररेखोपरियदि सूत्रं जायेत वर्द्धितम् ।
तदा ह्याचरते कीर्त्तिम् लेशमात्रं न संशयः ॥ ५१ ॥

अशुभं यदि तत्स्थाने सूत्रं संकीर्णं जायते ।
परित्याज्या तदा भूमिः नात्र कार्या विचारणा ॥ ५२ ॥

सूत्रधारणकाले चेत् विकटो जायते रवः ।
परित्याज्या तदा भूमिः नात्र कार्या विचारणा ॥ ५३ ॥

सूत्रविस्तारमात्रेण सुगन्धादिः भवेत् यदि ।
शुभक्षेत्रमिति ख्यातं प्रासादार्थं मनोहरम् ॥ ५४ ॥

नागबन्ध : ––

वास्तुशंकुसमाहारे भूमिमार्जनशोधनम् ।
अन्ते शृणु तदा नागक्षेपविधिं विधानतः ॥ ५५ ॥

नागबन्धक्रमे द्वारं निर्णयेत् विधिपूर्वकम् ॥
तोरणं पूर्वभागे च* सिद्धिः साधारणं यथा ।

* द्वारदेवानुसारतः ।

न कुर्यात् वास्तुपूजादि श्रावणे भाद्रके तथा ॥ ५६ ॥

मार्गशीर्षे च पौषे च दक्षिणे नागमस्तकम् ।
शुभकाले ततो नीत्वा यथाशास्त्रानुसारतः ॥ ५७ ॥

नागबंधानुसारेण शंकुस्थापनमुत्तमम् ।
अन्ते करणीयं गर्तं प्रासादभित्तिस्थापनम् ॥ ५८॥

यतो दैर्घ्यं भवेत् शीर्षं ततो भागत्रयं तथा ।
तदा गर्भभूमिमध्ये तिर्यक् गर्भे न संशयः ॥ ५९ ॥

गर्भभूमिगर्भपीठे यंत्रं कुर्यात् मनोरमम् ।
तदनुसारतो गर्भं पूरयेत् गठनान्तरे ॥ ६० ॥

तदनुसारतः गर्तभित्तिशिलां प्रपूरयेत् ॥

गर्भयंत्रनिर्णयः —

सावधानं शृणुष्वात्र गर्भयंत्रादिनिर्णयम् ।
विषमं समं वा क्षेत्रं चतुरस्रं सुनिश्चितम् ॥ ६१ ॥

मध्यच्छेदद्वयं कृत्वा भागत्रयं तथा पुनः ।
अन्ते एकछेद भाग प्रस्थादि क्रमं वर्द्धयेत् ॥ ६२ ॥

विषमं चतुस्रं च भूमिः सा तत्र जायते ।
अंते भागत्रयं कृत्वा दैर्घ्यभावेन छेदितः ॥ ६३ ॥

मध्यभागे द्वयस्थानं गर्भगृहार्थं निश्चितम् ।
मध्यभागद्वयोर्मध्ये देवस्थानं च निर्मलम् ।
मध्यभागे प्रस्थबिन्दुमारभ्य समभावतः ॥ ६४ ॥

तदनुसारतो बाहू वर्द्धयेत् पार्श्वयोः तथा ।
तत् पार्श्वार्धे तत् क्षेत्रं द्विभाग ऊर्ध्व निम्नगे ॥ ६५ ॥

रोधयेत् रेखा पार्श्वेण अर्धभागे सुनिश्चिते ।
आड़रेखां समारभ्य गर्भरेखान्तचालनम् ॥ ६६ ॥

विषमं चतुरस्रं च मध्यपार्श्वद्वयं तथा ।
वर्द्धयेत् दैर्घ्यपार्श्वेण समभागे न संशयः ॥ ६७ ॥

द्विभागांशे तथा कृत्वा पूर्ववत् बाहुयुग्मयोः ।
योजयेत् सह त्रिच्छेद निम्ने गर्भे गृहे ॥ ६८ ॥

तथासच्छेदभेदयोः बाहुचतुर्थे ऊर्ध्वभागतः ।
योजयेत् पूर्ववत् बाहु गर्भगृहे ततः परम् ॥ ६९ ॥

तदनुसारतः पार्श्वे मध्यबाहुद्वयं तथा ।
वर्द्धयेत् समरूपेण क्षेत्रं तदनुसारतः ॥ ६६ ॥

आड़रेखां समारभ्य गर्भक्षेत्रासमन्विते ।
योजयेत् गर्भरेखांशे क्षुदक्षेत्रविधानतः ॥ ६७ ॥

द्विभागांशे तथा कुर्यात् कोणवत् बाहुयुग्मयोः ।
गर्भगृहसमायुक्ते क्षेत्राणि वसुसंख्यकम् ॥ ६८ ॥

त्रिच्छेदभेदयोः भागगृहादि निर्णयेत् सुधीः ।
योजयेत् पूर्ववत् क्षेत्रं गर्भवाह्ये विशेषतः ॥ ६९ ॥
योजयेत् समभागेच त्रयांशं विधिपूर्वकम् ।

योजयेत् समाभागेन निम्ने च त्रितयादपि ।
ततः षड्भागदीर्घे च प्रस्थे च पंचधा तथा ॥ ७० ॥

एतानि यंत्रभेदानि विमाने शिखरेपि वा ।
अत्राहं तु प्रवक्ष्यामि शालायंत्रादि निर्णयम् ॥ ७१ ॥

बाहुः द्वितीया मुख्या च*पूर्वेच सम्मुखे तथा ।
रेखा दैर्घ्ये च प्रस्थे च वेधमानानुसरतः ॥ ७२ ॥

* वर्द्धितक्षेत्रमुख्यश्च ।

द्वारदेशं च गर्भस्य कथयामास यत्नतः ।
द्वारदेशचतुर्भागे द्विभागं द्वारमुत्तमम् ॥ ७३ ॥

द्वारशेषं द्विबाहुं च अर्धभागेन वर्धयेत् ।
तत्र जायेत यत्क्षेत्रं संधिस्थानं तदुच्यते ॥ ७३ ॥

द्वारदेशं द्विबाहुभ्यां वर्द्धयेत् तोरणावधि ।
तत् क्षेत्रम् उभयोः पार्श्वे संधिस्थानम् तदुच्यते ॥ ७४ ॥

त्रिभागं कुरुते संधिं द्वितियावर्त्तसन्निधौ ।
तत्र निम्ने द्वयावर्त्तः अर्धचन्द्रसमाकृतिः ॥ ७५ ॥

तोरणं प्रथमावर्त्तो वाड़मध्ये तथोपरि ।
संधिबिन्दुं समारभ्य त्रिगुणं वेधं वर्धयेत् ॥ ७६ ॥

यथा गर्भगृहप्रस्थं तथा शाला द्विगुणिता ।
ततो निर्धारणं* कुर्यात् वेद्यां तु चतुरांगणे ॥ ७७ ॥

* दैर्ध्य वेधश्च ।

अंते नीत्वा मध्यबिंदुं गर्भविन्दुं* समाचरेत् ।

* गर्भक्रियां समाचरेत् ।

पूर्ण भित्तिस्वरूपं च गठेत् दृढ़ोत्तमे शुभे ॥ ७८ ॥

अंते भूमिसमीपे च पीठं कृत्वा तथाशुभम् ।
भूमिपार्श्वे तथा भित्तिं प्रोत्थाप्यं गर्भमन्दिरम् ॥ ७९ ॥

बालुकां मृत्तिकां वापि पाषाणं च दृढ़ोत्तमम् ।
भरयेत् भूमिगर्त्तानाम् दृढ़े दृढ़ोत्तमे सदा ॥ ८० ॥

मुखशालायंत्रकारिका —

अत्र शृणु मुखशाला वाड़ क्रियादि निर्णयम् ।
मध्यबिन्दुं समाश्रित्य भागनिर्धारणं महत् ॥ ८१ ॥

संधिविन्दुं समारभ्य सम्मुखे द्वारदेशतः ।
रेखाविभाजनम् कुर्यात् द्वये पार्श्वे यथाक्रमम् ॥ ८२ ॥

ततो लक्ष्मीस्थलारभ्य रेखां वर्धयेत् तथा ।
योजयेत् पूर्वभागेन तोरणं तोरणादपि ॥ ८३ ॥

अंते प्रस्थक्रमे भागरेखाः सप्तानु कल्पयेत ।
कोणान्तं कोणपर्यंतं द्वयरेखादि* छेदयेत् ॥ ८४ ॥

*रेखद्वयं ।

मध्ये प्रस्थं यथा बाहुवेधे त्रिबाहुसंगमे ।
गवाक्षस्थानमेतानि शालारन्ध्रः स कथ्यते ॥ ८५ ॥

अग्रे सम्मुखभागे च तोरणं धार्यते महत् ।
वर्तद्वयं तथा दृढ़े कारयेत् च प्रयत्नतः ॥ ८६ ॥

त्रिधान्ते दशछेदानि अथवा ऊर्ध्वसंख्यकः ।
चतुष्कोणसन्निधौ च त्रिकोणं कारयेत् सुधीः ॥ ८७ ॥

एतानि कोणकादीनि शिल्पशास्त्रानुसारतः ।
अनन्तरमनर्थं च अनुराहादि निश्चितम् ॥ ८८ ॥

परस्परं समं स्थानम् कार्यभेदे मनोरमे ।
प्रतिबाहुमूलस्थाने यवत्रयं विभाजयेत् ॥ ८९ ॥

सुखोदयेत् ।

खादी विश्रान्तिस्थानं प्रतिपागे पदे पद ।
शृणु शाक्तिकभूमि च योगिनीयंत्रमुत्तमम् ॥ ९० ॥

योगिनीयंत्रम् —

योगिनीपीठमुख्या च तंत्रशास्त्रानुसारतः ।
भूमौ बिन्दुत्रयं नीत्वा समभागेन विस्तृते ॥ ९१ ॥

एक त्रिकोणयोः कुर्यात् आद्यबिन्दुसमाश्रिता ।
सत्त्वत्रिकोणम् एतच्च रजस्त्रिकोणसन्निभम् ॥ ९२ ॥

बिन्दुक्रान्ता तदा रेखा रजोरेखा हि कथ्यते ।
बाहुप्रांतं समारभ्य योजयेत् तमसापि वा ॥ ९३ ॥

निम्ने तमोगुणा छेदा त्रिकोणविपरीतगा ।
ततः सत्त्वं मध्यभागे रेखाकरणमुत्तमम् ॥ ९४ ॥

तद्वत् तामसिके चैव निम्नरेखा च निम्नगा ।
योजयेत् त्रिभुजाकारे रजोबिन्दुं समाचरेत् ॥ ९५ ॥

उर्ध्वे निम्ने च पंचभ्यः त्रिकोणं यंत्रमुत्तमम् ।
अंते पार्श्वद्वये तद्वत् त्रिकोणं रजसन्निभम् ॥ ९६ ॥

मध्ये योगिनीरेखा च सर्वयंत्रसुभाविनी ।
सर्वत्रिकोणबिन्दुश्च छेदिनी दंडरूपिणी ॥ ९७ ॥

एतत् श्री योगिनीयंत्रं तंत्रपीठानुसारतः ।
प्रासादयोगिनी यत्र क्रियते सिद्धिनिश्चयः ॥ ९८ ॥

षोडशमातृकायंत्रं योगिनीबिन्दुमाश्रितम् ।
प्रतिबिन्दु समाक्रम्य योगिनीनां चतुष्टयम् ॥ ९९ ॥

एतत् यंत्रं महाशक्ति गर्भगृहान्तवर्त्तनम् ।
मध्यगृहे कृतं यंत्रं देवीपीठसमानतः ॥ १०० ॥

प्रतीच्युदीचीदिशयोः यंत्रस्य पूर्वपश्चिमे ।
गर्भभूमिं समारुध्य यंत्रं कार्यं विचक्षणः ॥ १०१ ॥

शृणु त्वं तान्त्रिक भूमि योगिनी यंत्र कल्पितम् ॥ ९० ॥

योगिनीपीठं मुख्यञ्च तंत्रशास्त्रानुसारतः ।
भूमौ बिन्दुत्रयं लिख्य समांशे त्रिभुजद्वयम् ॥ ९१ ॥

मध्य रेखान्वये सर्वा रेखा विन्यासयेत् तत ।
निम्ने ऊर्ध्वमुखी क्षेत्रं त्रिभुजं वह्निकल्पितम् ॥ ९२ ॥

ऊर्ध्वदेशे तदाकारं पयःक्षेत्रं च कारयेत् ।
पार्श्वबिन्दुद्वयाक्रम्य ऊर्ध्वे च अध एव च ॥ ९३ ॥

उद्वृत्त क्षुदक्षेत्राभ्यां न्यूनाकारं तदाकृति ।
योजयेत् मध्यबिन्दुञ्च मध्ये पिण्डीस्थलोत्तमम् ॥ ९४ ॥

पुनश्च दक्षिणे चैव केवलं त्रिभुजोत्तमम् ।
क्षुदक्षेत्रद्वययुक्ते रचयेत् विशदाकृतिम् ॥ ९५ ॥

पृष्ठे अग्रे तथाकारं पार्श्वयुक्ते विधानतः ।
पूर्वे च पश्चिमे मध्ये त्रिभुजं पक्षमाचरेत् ॥ ९६ ॥

मध्यबिन्दुस्थले न्यसेत् त्रिभुजाग्रद्वयं क्रमात् ।
एतानि सप्त क्षेत्राणि पार्श्वे च बाणसंख्यकम् ॥ ९७ ॥

पूर्वे पृष्ठे द्वयोर्युक्ते बिन्दुत्रयसमाश्रिते ।
आद्ये सत्त्वं तथा मध्ये रजः प्रांते तमस्तथा ॥ ९८ ॥

एतत् श्री योगिनीयंत्रं पीठदेशानुसारतः ।
पूजयेत् यंत्र प्रासादसिद्धिर्भवति निश्चितम् ॥ ९९ ॥

षोडशमातृका अत्र योगिनी बिन्दुरूपिणी ।
प्रतिबिन्दु समाश्रित्य योगिनीनां चतुष्टयम् ॥ १०० ॥

प्राच्यां तु पश्चिमे चैव उदीच्यां दक्षिणे तथा ।
गर्भभूमिसमाहारे यंत्रं न्यासेत् विचक्षणः ॥ १०१ ॥

भूसुरेण कृते न्यासे यंत्रसूत्रादिरेखयोः ।
अपरे * कुंकुमे चैव रक्तचंदनमिश्रिते ॥ १०२ ॥

* अगुरु ।

यंत्रन्यासं तथा पूजां कारयेत् नृपतिना सह ।
यंत्रस्य प्रतिबिन्दूनां पूजयेत् योगिनीं तथा ॥ १०३ ॥

नानारत्ने तथा मूले गर्भबिन्दुं च पूरयेत् ।
धातुमूर्त्ति * तथा बिन्दु गर्भस्य पूजनं महत ॥ १०४ ॥

* धातुचक्र ।

पूजनान्ते बलिं दत्वा गर्भाधारं च रोधयेत् ।
यंत्रराजस्य पूजायां जायते विघ्ननाशनम् ॥ १०५ ॥

नृपस्य विजयाकांक्षा सर्वसिद्धिप्रदायिनी ।
पीठशुद्धिः स्थलशुद्धिः जायते नात्र संशयः ॥ १०६ ॥

शालानिर्णयः (तोरणपद्धतिः) —

शालायाम् यंत्रपूजान्ते शिखरोर्ध्वविवर्धनम् ।
क्रिया जायेत श्रेष्ठांशे शृणु शालादिनिर्णयम् ॥ १०७ ॥

सर्वादौ कारयेत् कर्म तोरणद्वारसन्निधौ ।
शृणु भागदिकं दिव्यं तोरणदेशमाश्रितम् ॥ १०८ ॥
लक्षणाम् ।

पूर्वस्थाने तोरणस्य पृथगभावेन कारयेत ।
क्वचित् स्थलविभागेन विशेषाद् रुद्रमन्दिरे ॥ १०९ ॥

द्विभागतोरणं ध्येयं विष्णुगृहे तथैव च ।
कुत्रचित् पंच वा भेदाः कुत्रचित् सप्त वा तथा ॥ ११० ॥

द्विभागतोरणं मध्ये द्वारपालचतुष्टयम् ।
कुत्राचित् त्रयछेदानां मुखत्रायी विशेषतः ॥ १११ ॥

अन्यथा तु द्वयं स्थाप्यं द्वारनिम्ने तथैव च ।
सुखावहः ।
शृणु तत्र द्विभागाभ्यां द्वारबन्धस्य वर्णनम् ॥ ११२ ॥

द्वारदेशस्य क्षेत्राणि भाजयेत् रेखात्रयी कृते ।
दैर्घ्ये प्रस्थे तथा निम्ने भागाः षोडशसंख्यकाः ॥ ११३ ॥

द्वितीयेन तृतीयेन चतुर्भागेन दैर्घ्यतः ।
त्रयोदशं षोडशञ्च द्विभागं प्रस्थभागकैः ॥ ११४ ॥

त्रयोदशं षोडशार्धे द्वारपालं च स्थापयेत् ।
अपरे वज्रमुण्डञ्च कुर्यात् तत्र न संशयः ॥ ११५ ॥

प्रथमं चतुरं पञ्च अष्टमं द्वादशावधि ।
व्योम वेद तथा बाण वसु सूर्यः तथैव च ।
ग्रहादिगृहयुक्तञ्च कारयेत् छंदमुत्तमम् ॥ ११६ ॥

अवधिं च द्वितीयार्धे तृतीयार्धे समाचरेत् ।
नानाविधद्वारपाला नानायंत्रसमाश्रिताः ॥ ११७ ॥

भैरवं नागराजञ्च व्याघ्रसिंहानने तथा ।
द्विभुजश्चतुरश्चैव नानाशास्त्रानुसारतः ॥ ११८ ॥

केवलं शास्त्रमाश्रित्य यद् यंत्रं सिद्धिभाजनम् ।
तदनुसारतो यंत्रं प्रवक्ष्याम्यत्रा बोधत ॥ ११९ ॥

वज्रमस्तकभेदाः —

शृणुष्वाद्ये प्रवक्ष्यामि वज्रमंडलधारणम्* ।
नानाभेदानि यंत्राणि वज्ररक्षार्थमाचरेत् ॥ १२० ॥

*लक्षणम् ।

द्विवर्त्तमेकवर्त्तञ्च त्रिवर्त्तं छेदशोभनम् ।
निश्चित्य प्रथमं क्षेत्रं चतुर्भागे विभाजयेत् ॥ १२१ ॥

आद्यप्रस्थच्छेदभागे पट्टिकार्यं मनोरमे ।
अपरे वज्रविन्दुं च दीर्घरेखासमाश्रितम् ॥ १२२ ॥

द्विबलिप्रस्तरे तत्र खोदयेत् वर्त्तुलं तथा ।
आद्यरेखास्थले तत्र बलिसंधिः स उच्यते ॥ १२३ ॥

द्विबलेः किञ्चिदूर्ध्वे तु कलिकाकार मध्यम ।
बलिमारभ्य प्रस्थेन पार्श्वे ऊर्ध्वे बलिं तथा ॥ १२४ ॥

ऊर्ध्वबलिस्तथा वक्रे तृतीयं बिन्दुमाश्रिता ।
निम्नपत्रं तथा निम्ने कलिकोर्ध्वे विशेषतः ॥ १२५ ॥

अपरे ऊर्ध्वदेशे च चन्द्रिकाकृतिपल्लवाः ।
अन्तपंचमबिन्दुभ्यामारभ्य निम्नगा बलिः ॥ १२६ ॥

तृतीयच्छेदपर्यन्तमर्धवृत्ताकृतिः सदा ।
तृतीयबिन्दुकोणे च स्थापयेत् किन्नरादिकान ॥ १२७ ॥

बलीश्च खोदयेत् शिल्पी पुष्पालंकरणं तथा ।
एतानि शास्त्रकार्याणि ज्ञानापेक्षीणि सर्वदा ॥ १२८ ॥

अलंकारादिकं शिल्पी कुर्यात् ज्ञानानुसारतः ।
नानाभेदे विमाने वानर्थे वा वाड़सन्निधौ ॥ १२९ ॥

कुंभे खुरे निम्नभागे पृथग् रीतिस्तु जायत ।
शृणु भेदान् तथा वज्रमस्तके रेखानिश्चयम ॥ १३० ॥

केन केन प्रकारेण भेदस्तत्र स जायते ।
किरीटतोरणार्धे च राहे च शिखरे तथा ॥ १३१ ॥

वृत्तवज्रशीर्षभागं निशायाः शिखरे मंडयेत् ।
लता वज्रमुखी निम्ने खुरदेशेऽतिशोभने ॥ १३२ ॥

रेखे च द्वारदेशे वा स्तम्भभागे विशेषतः ।
अत्र शृणु द्वितीयञ्च वृत्तवज्राङ्गलेखनम् ॥ १३३ ॥

रेखात्रयविभागेन पृथग् रीतिस्तु जायते ।
शिखरे मध्यभागे च निशोर्ध्वे वर्गक्षेत्रागे ॥ १३४ ॥

अत्र द्विभाजितं कृत्वा विषमं चतुरस्रगम् ।
निम्ने पट्टी लता क्षेत्रं रेखोर्ध्वे प्रथमांशके ॥ १३५ ॥

अपर त्रयविभागे च दीर्घे च समभावतः ।
प्रथमां बलिं द्विभागे च निम्ने चैव तृतीयिकाम ॥ १३६ ॥

बलिमाद्यद्विभागे च ऊर्ध्वे चैव द्वितीयिकाम् ॥ १३६ ॥

तदूर्ध्वे तृतीयां दिव्याकारेण कारयेत् सुधीः ।
ऊर्ध्वदेशे दीर्घरेखां मध्ये सिंहमुखं तथा ॥ १३७ ॥

प्रथमावरणे भूमिः तत उच्चा तु जायते ।
वृत्ताकारे बलिः सर्वा भूमिदेशे विधानतः ॥ १३८ ॥

ऊर्ध्वे सिंहमुखं कुर्यात् अधोदृष्टिसमन्वितम् ।
अधोदेशे तु संस्थाप्या तृतीया बलिसन्निधौ ॥ १३९ ॥

निम्ने आलम्बमाला च तले आलम्ब एव च ।
अलंकरणछेदैस्तु युक्ते स्याद् दृश्यमुत्तमम् ॥ १४० ॥

अन्ते तु द्विवलिच्छेदः तृतीयावृत्तसन्निभः ।
त्रिभुजाकृतिपीठे च लतां कुर्याद् विधानतः ॥ १४१ ॥

सा लता वृत्तनिकटे भूमिस्पर्शे गुणैः कृता ।
वज्रबिन्दुस्थले कीर्तिमुखस्य खोदयेन् मुखम् ॥ १४२ ॥

अन्ते एकबलिं दत्वा आलम्बं लम्बने तथा ।
ऊर्ध्वरेखा द्वयोः संधौ लता कार्या सुशोभना ॥ १४३ ॥

अन्ते समक्षेत्रयुक्ते लता च विविधा भवेत् ।
मध्यवृत्तं समारभ्य मुखस्यान्ते च जायते ॥ १४४ ॥

द्वितीयच्छेद*मालंब्य करणीया लता तथा ।
ऊर्ध्वे तु किन्नरीर्दिव्याः स्थापयेत् शिल्पिपुंगव : ॥ १४५ ॥

*तृतीयच्छेद ।

एते तु वृत्तभेदाः स्युः वज्रमस्तकभेदतः ।
शृणु लता वज्रमुण्डं खुरदेशे च शोभनम् ॥ १४६ ॥

लतां वज्रांगिनीं कुर्यात् खुरदेशे मनोरमे ।
कीर्तिमुखस्य स्थाने तु खोदयेत् नन्दिकामुखम् ॥ १४७ ॥

